# :१: मुंबईला निरोप

गाडीच्या इंजिनानें भगभगाट केला नाहीं अगर शिट्टीहि वाजवली नाहीं. गार्डानें शिट्टी वाजविली असावी, पण ती आम्हांला ऐकूं आली नाहीं. गडबड नाहीं. गोंधळ नाहीं. धांवपळ नाहीं. गाडी सुरू झाल्याचें आम्हांला नीटसें समजलें नाहीं. मीं खिडकीबाहेर पाहिलें तों स्टेशनवरचा एक खांब मागें सरकत होता.

मी उद्गारलों, "अरे! गाडी सुरू झाली वाटतें?"

वासंती म्हणाली, "अय्या!" मग तिनें हात हलवला. "Bye, bye, Bombay. Bye, bye."

आमचा प्रवास सुरू झाला. अभावितपणें आम्हीं आमच्या घड्याळाकडे पाहून गाडी वेळेवर निघाली असल्याची खात्री करून घेतली. कां कोण जाणे, गाडींत बसल्यावर वेळाच्या बाबतींत माणसें मोठीं कद्रू होतात. जणुं एखादा उत्पात झाला असा गंभीर चेहेरा करून गाडी दहा मिनिटें लेट असल्याचें एकमेकांना सांगत असतात, पुन्हा पुन्हा उद्गारत असतात आणि गार्ड हा कोणी गुन्हेगार आहे अशा थाटांत त्याला विचारतात, "दहा मिनिटें लेट आहे गाडी आज?"

गार्ड म्हणतो, "नाहीं, अकरा मिनिटें."

आणि हातांतला बावटा हलवीत शिटी वाजवतो.

असो. सगळ्या गाड्यांप्रमाणें आमची गाडी वेळेवर सुटली होती आणि पुण्याच्या दिशेनें धांवूं लागली होती. इतके दिवस आम्हीं प्रवासाला निघण्याचे बेत करीत होतों. चौकशा करीत होतों. किती पैसे खर्च होतील याचा हिशेब करीत होतों. खरेद्या करीत होतों. आम्हीं जाणार असल्याची जाहिरात करीत होतों. आणि आतां प्रवास सुरू झाला होता. अगदीं सहजपणें, पिस्तुलांचे बार न होतां आणि तटबंद्या न ओलांडतां आम्हीं रोजच्या जीवनाच्या चाकोरींतून बाहेर पडलों होतों आणि तेंच आम्हांला खरें वाटत नव्हतें. आमच्या रुळलेल्या जीवनाच्या वेळापत्रकांतून आम्ही बाहेर उडी घेतली आहे हें पटत नव्हतें. मनावरची मरगळ दूर होण्यासारखें कांहीं अजून झालें नव्हतें.

ती मरगळ घालविण्याकरितांच कीं काय, प्रधान सिगारेट ओढूं लागला. प्रवासांत अनिर्बंधपणें धूम्रपान करायचें असें त्यानें ठरवलें होतें. अशा सत्संकल्पांत मी समभागी नसेन हें शक्यच नव्हतें. मींदेखील सिगारेट घेतली आणि आळशी कुतूहलानें सोबतच्या चार प्रवाशांकडे पाहूं लागलों. आमच्यासमोर दोघे मद्रासीच बसले होते—कमरेला धोतर गुंडाळलेलें, अंगांत शर्ट आणि खांद्यावर पांढरें फडकें. पायांत चपला होत्या त्या मुंबईच्या संपर्कामुळें. सामानाची अडगळ बरोबर घेणें त्यांना मान्य नसावें. दोघांच्याजवळ छोट्या पिशव्या होत्या. एकाजवळ लहानशी वळकटी होती. मात्र दोघांच्याहिजवळ मोठाले फडक्यांत बांधलेले ॲल्युमिनियमचे खाण्याचे डबे होते. त्या डब्यांना आपल्या शेजारीं घेऊन दोघेहि निर्विकार मुद्रेनें मख्खपणें बसले होते. चेहेऱ्यावर विकार दाखविणें हीदेखील त्यांना उधळपट्टीच वाटत असावी!

त्यांच्या चेहेऱ्याकडे फार वेळ दृष्टि ठरली नाहीं. ती खिडकीबाहेर मुंबई-पुणें रस्त्याच्या ओळखीच्या चेहरेपट्टीकडे वळली. कर्जतपर्यंत सपाट मैदानांतून गाडीनें दौड केली. वाटेंत उन्हाच्या रखरखाटांतून माथेरानच्या टेकडीनें डोकें उंच केलें होतें आणि वरच्या विरल थंड वातावरणांत ती बोलावीत होती. पण तिनें निरोप घेऊन पाठवलेली वाऱ्याची झुळूक गाडींत पोहोंचेपर्यंत गरम होत होती.

मग संथ झुलत्या चालीनें, वळसेदार मार्गानें गाडी घाट चढली. बोगद्यांच्या काळ्या पडद्यांपलीकडे नवीन दृश्यांचा अनपेक्षित पट उलगडत होता. दृष्टि डोंगरमाथ्यावरून खोल दऱ्यांत कोसळत होती आणि उतारावरून चढत पुन्हा पलीकडच्या शिखरांकडे पहात होती. पुन्हा गाडी बोगद्यांतून जात होती आणि मग ती दरी अदृश्य होऊन पलीकडल्या बाजूला दुसरी दरी आपलें गुह्य उघडें करीत होती. त्या दरींतल्या टेपाडावर चार आवळीं जावळीं घरें तोल सांवरून बसलीं होतीं. खालीं नदीच्या प्रवाहाची कृश रेषा वळसे घेत दूरवर पुसट होत गेली होती. तिचा पाठलाग करतांना नजर एकदम एका उंच डोंगरावर आदळली आणि तो वेंधून वर गेल्यावर एका ठिसूळ, छोटयाशा दिसणाऱ्या दगडी पुलाच्या कमानींत थबकली. (सुदैवानें ती डोळ्यांत खुपणारी जाहिरात तेथें नव्हती.)

पापणींत अश्रु घोटाळावा तसा हवेंत गारवा घोटाळत होता आणि उल्हासाचें merry-go-round मनांत फिरूं लागलें होतें

खंडाळ्याला वृक्षांच्या छायेंत एक गाढव चरत होतें. अशा थंड हवेच्या ठिकाणीं जन्मायचें आपल्याला भाग्य लाभलें ह्याची यत्किंचितहि जाणीव त्याच्या चेहेऱ्यावर नव्हती. मग ड्यूकस् नोजच्या खालून, म्हणजे ड्यूकसाहेबांच्या मिशीवरूनच म्हणा ना, तोल संभाळीत गाडी गेली. पलीकडच्या ड्यूकसाहेबाच्या तोंडाच्या दरींत पडली नाहीं हें नशीबच म्हणायचें !

ड्यूक्स नोजवर चढण्याचा विक्रम वासंतीनें केलेला असल्याकारणानें त्याला ती आपली खाजगी मालमत्ताच समजते. मीं तिला तें दाखवलें नाहीं आणि तिकडे बोट दाखवून "आपण इतक्या उंच गेलों होतों?" असें तिला म्हणायला मिळालें नाहीं म्हणून तिला थोडासा राग आला.

मीं तिला तें दाखवलें नाहीं ह्याचें कारण मीं तिला नुकतेंच वरच्या बर्थवर चढवलें होतें. आणि तेथून तिला खालीं उतरविण्याचा शक्तीचा प्रयोग इतक्या लवकर पुन्हा करण्याची माझी तयारी नव्हती.

बायकोला वरच्या बर्थवर चढविण्याचा प्रयोग तुम्हीं कधीं केलाय् का? केला नसल्यास मी तुम्हाला सांगतों कीं, पुरुष जातीची सारी मुत्सद्देगिरी आणि चापल्य पणास लावणारें तें काम आहे.

तुम्हीं गाफीलपणें बसलेले असतांना बायको जांभई देत म्हणते, "मला आला कंटाळा. मला वर जाऊन झोंपायचें आहे."

तुम्ही सांवरून बसत म्हणतां, "आं? इतक्यांत?"

बायको आवाजांत निश्चयाची धार आणीत म्हणते, "हो. इतक्यांत."

मग तुम्ही बावळटपणें उभे राहून एकदां वरच्या बर्थकडे पहातां आणि एकदां बायकोकडे पहातां. आणि खिडकीच्या गजांवर पाय देऊन वर चढण्याचें तंत्र तिला समजावून सांगतां.

ती मान हलवून म्हणते, "अं, तुम्ही नका मला सांगूं. मी—मीं माझें बघतें."

असें म्हणून ती समोरच्या बांकावर चढते आणि तुमच्या खांद्याचा आधार घेऊन डगडगत उभी रहाते. मग वरच्या बर्थकडे निरखून पहात ती म्हणते, "ती बॅग बाजूला करा. तीं केळीं खालीं घ्या."

तुम्हीं तिच्या हुकुमांची अंमलबजावणी केल्यानंतर ती संदिग्धपणें पुढेंमागें पहात तशीच डगमगत उभी रहाते.

तुम्ही म्हणतां, "अग, चढ कीं."

ती रागावून म्हणते, " थांबा. तुम्ही घाई करूं नका मला. मी विचार करतें आहें."

कांहीं वेळ ती असा विचार करते. तोंपर्यंत तुम्ही खांबासारखे उभे रहातां आणि समोरच्या त्या बाकांवरचीं माणसें अंग चोरून बसलेलीं असतात.

मग अनपेक्षितपणें बायको वरच्या बर्थची सांखळी पकडते आणि एक पाय वर टाकते. अशा लोंबकळत्या स्थितींत ती ओरडूं लागते, " अहो, अहो—"

त्या वेळीं तुम्ही एकदम चपळाई दाखवून आणि आपल्या चष्म्याला इजा होऊं न देतां नेट देऊन तिला वर ढकलतां आणि मग तिचा खालीं लोंबकळणारा हात व पाय वर ढकलून तिच्या स्वाधीन करतां. आपले सारे अवयव गोळा करतां करतां ती म्हणते, " माझी पर्स द्या. आणि तीं केळीं! त्यांच्यावर बसून चिरडाल तुम्ही त्यांना. आणि ' रीडर्स डायजेस्ट.' "

हें सगळें तिच्या स्वाधीन करून तुम्ही स्वस्थपणें खालीं बसतां न बसतां, तोंच बर्थच्या फटींतून हात घालून ती तुमचें डोकें हलवते व विचारते, " कुठचें स्टेशन आलें हो ?"

मग कांहीं ती फार वेळ वर रहात नाहीं, आणि तुमच्या आधारानें होल्डऑल खालीं कोसळावा तशी ती खालीं येते.

हें अर्थात् पहिल्यानें. पुढें ती आपण होऊन वर चढण्याइतकी कुशल होते.

लोणावळें गेल्यावर गाडी फटाटत पळूं लागली. देहू रोडचे आणि खडकीचे मोटाले लष्करी तळ लागले. कांटेरी तारांचीं कुंपणें, करडीं खाकी माणसें, करड्या खाकी जीप्स, लॉऱ्या, रणगाडे, आंखीव रस्ते आणि पांढऱ्या रंगानें रंगवलेले नंबर!

आपण फार प्रवास केला असें आम्हांला वाटूं लागलें. खाण्याचे डबे उघडायला आम्हांला नैतिक बळ आलें. आपण अजून चहा घेतला नाहीं ह्याचा अचंबा वाटला. प्रधानच्या आईनें दिलेले वेसनाचे लाडू आम्हीं खाल्ले. मग चकल्या खाल्ल्या. मग पुन्हा लाडू खाल्ले. नंतर निश्चयानें डबे बंद केले आणि आतां चहा घेतलाच पाहिजे म्हणून सिगरेटी शिलगावल्या.

वासंती आपल्या नाकाजवळ येणाऱ्या सिगरेटच्या धुराला चापट्या मारूं लागली.

पुणें आलें. चहा घ्यायच्या इराद्यानें मी दरवाजापाशीं गेलों. तेवढ्यांत एक बॅग आंत ढकलली गेली. माझ्या डोक्यावर एका होल्डऑलचा टणक धक्का

बसला आणि मग माणसांचा एक लोंढाच आंत शिरला. अल्पावधींत सामानाचे ढिगारे रचले गेले. माणसें दाटीवाटीनें बाकांवर बसलीं. सामानावर बसलीं. अवघडून मध्येंच उभीं राहिलीं. दाराशीं गर्दी करून राहिलीं.

स्वस्थपणें चहा घेण्याचें आमचें स्वप्न विरलें. मी त्या गर्दीतून कसाबसा झोकांड्या खात बाहेर पडलों. दोन चहाचे कप आंत दिले. मग स्वतः चहा प्यायलों आणि गाडींत पुन्हा बुडणाऱ्या माणसासारखे हातवारे करीत शिरलों.

गाडीनें पुणें सोडलें. संध्याकाळहि झाली. आणि कां कोण जाणे, मी प्रवास करीत आहें हें एकदम मला खरें वाटूं लागलें. आपल्या दिनक्रमाच्या वेळापत्रकांतून आपण बाहेर उडी घेतली आहे हें पटलें. अंगांतून एक उन्मादाची, बेफिकिरीची शिरशिरी धावली. आणि पुढें सगळा प्रवास ह्याच धुंदींत केला.

असें कां झालें? कदाचित् गाडींतल्या गर्दीमुळें आणि खेंचाखेंचीमुळें असेल. आणि दुसरें असें कीं मुंबई-पुणें हा टापू आपला वाटतो. त्या नेहमीं घडणाऱ्या प्रवासाचें नावीन्य वाटत नाहीं आणि मनावरचीं बंधनेंहि गळून पडत नाहींत. पण पुणें सुटलें म्हणजे वाटतें, “आतां कोण आपल्याला पहातो? आतां स्वच्छंदपणें वागायला हरकत नाहीं.”

पुण्याच्या आसपास प्रसन्न हिरवळ आहे. भाजीपाल्याची लागवड आहे. पाणी मधून मधून झुळझुळतें. पण पुढें सपाट काळा माळ अस्ताव्यस्तपणें पसरलेला आहे. तेथें सह्याद्रींतले चढउतार नाहींत आणि तेथली हिरवी झाडी पण नाहीं. नाहीं म्हणायला एक टेंगण्या टेकड्यांची रांग गाडीबरोबर दूरवर निरोप द्यायला येते.

सूर्य मावळला आणि उजाड माळावर उजाड संधिप्रकाश भरकटूं लागला. रंगांची विविधता लोपली होती. छायाप्रकाशांचा खेळ संपला होता. आणि अस्फुटता सर्वत्र भरून राहिली होती. टेकड्यांच्या रांगेपलीकडे एक टपोरी चांदणी उगवली होती आणि बरोबर त्या चांदणीच्या खालीं टेकडीच्या माथ्यावर एक शुभ्र सुबक देवालय एकाकीपणें उभें होतें. हा विजनवासी देव कोण, असा मला प्रश्न पडला. एका सहप्रवाशानें सांगितलें कीं, तें शंकराचें देवालय आहे. कुठच्या असुराचें निर्दाळण करून तो शीघ्रकोपी कैलासनाथ तेथें एकांतांत विसांवला होता, कोण जाणे!

एव्हांना पुण्यास डब्यांत चढलेलीं परकीं माणसें आपलीं झालीं होतीं. समजुतीनें सारे एकमेकांची सोय पहात होते. त्या माणसांनीं भरलेल्या डब्यांत

झोंपण्याची उमेद बाळगीत होते. अंमळ बाजूला सरकून एकमेकांना खाण्या-पिण्याकरितां जागा करून देत होते.

तेवढ्यांत आमच्या मद्रासी मित्रानें आपला भला मोटा ॲल्युमिनियमचा डबा उघडला आणि कोरड्याच दिसणाऱ्या भाताचे मोठाले गोळे तो भसाभसा तोंडांत कोंबूं लागला, गिळूं लागला. असें थोडा वेळ केल्यावर त्यानें डबा बंद केला आणि फडक्यांत बांधून ठेवला. मग शेजाऱ्याकडून भांडेंभर पाणी घेऊन तें घटाघट प्यायला आणि पुन्हा मख्खपणें बसून राहिला.

प्रवासांत अशाच प्रकारचें जेवण आमच्या नशिबीं आहे कीं काय, ह्या कल्पनेनें आम्ही जरा हादरूनच गेलों.

अल्पोपाहार फार झाल्यामुळें जेवायला पोटांत जागा नव्हती; म्हणून आम्हीं पुन्हा मोठ्या प्रमाणावर अल्पोपाहार केला आणि झोंपण्याची तयारी केली. वरच्या बर्थवर झोंपण्याची बायकोनें नाखुषी दाखविली म्हणून मी वर झोंपलों. पण तें सुख फार वेळ लाभलें नाहीं. अनेक लोकांचे पाय आपल्या डोक्यावर पडत आहेत असें आढळल्यामुळें बायकोनें वर जाण्याचा निर्णय घेतला आणि मी खालीं येऊन झोंपलों. परमेश्वरानें आपल्या अंगांत जीं अनेक बिजागरें आणि सांधे बसविले आहेत त्यांचा त्या रात्रीं मला पूर्णपणें उपयोग करावा लागला आणि ज्या प्रकारें अंग वांकविणें शक्य नाहीं अशी माझी कल्पना होती, तशा प्रकारें देखील माझें अंग वांकलें गेलें. मध्येंच मीं मानेचा स्क्रू पिरगळत होतों. मध्येंच डोक्यावरचे पाय काढून दुसऱ्या माणसाच्या पोटावर ठेवत होतों. आणि मध्येंच आंखडलेला पाय ताणायला जागा आहे का, त्याचें तो लांब करून संशोधन करीत होतों. आणि तरीहि मला झोंप लागत होती. अनेक स्टेशनें येऊन गेल्याचा मला पत्ताहि नव्हता. गुलबर्ग्याचें नांव अर्धवटपणें कानीं पडलें तितकेंच. सकाळच्या सुमारास रायचूरचें नांव कानीं आलें. महाराष्ट्र केव्हांच मागें पडला होता आणि निजामी हद्दींतून प्रवास करून आम्ही मद्रास प्रांतांत आलों होतों.

इथें आम्हीं तुंगभद्रा नदी ओलांडली. पात्र विस्तीर्ण आणि त्या मानानें पाणी थोडें. पण पाणी निदान होतें. नाहीं तर पुष्कळदां आमची गाडी पुला-वरून जायची आणि खालीं नुसतें विस्तीर्ण वाळवंट असायचें. ही तुंगभद्रा आणि दुसरी कावेरी ह्यांची आणि आमची ह्या प्रवासांत पुन्हा पुन्हा भेटगांठ झाली.

तुंगभद्रेच्या कांठीं थोडी हिरवळ असली, तरी प्रदेश एकंदर उजाडच. हैदरअल्लीनें इंग्रजांना दिलेले हे ceded districts. इथली जमीन सुपीक असली तरी पावसाचें दुर्भिक्ष्यच. त्यामुळें पीकपाणी कमी. ह्या उजाड प्रदेशांत कित्येक मैल मनुष्यवस्तीचें दर्शन होत नाहीं. लागवड कसली आढळत नाहीं. नुसती उजाड जमीन. कुंपणें नाहींत. बांध नाहींत. विहिरी नाहींत. मनुष्याच्या हातानें त्या भूमीवर कांहीं संस्कार झालेले नाहींत. आज हजारों वर्षे ती जमीन उन्हानें तापते, पावसानें भिजते आणि तिच्यावर काय येईल तें पीक माणसें खातात. हिंदुस्थानांत बहुतेक ठिकाणीं हें असेंच दिसतें. कधीं आमची शेती सुधारणार ? कधीं येथें सुसंस्कृत जीवन फुलणार ?

ह्या उजाड प्रदेशांत मधून मधून छोट्या टेकड्या दिसतात. टेकड्या कसल्या, दगडांच्या मोठाल्या राशी. प्रचंड, वेडेवांकडे, आडवेतिडवे पडलेले दगड. एकमेकांवर आधारलेले, कोलमडलेले, निजलेले, आश्चर्यकारकपणें तोल सांवरून उभे राहिलेले. ह्या दगडांच्या राशींमुळें तो प्रदेश अधिकच उजाड वाटतो. शिंदीचीं विखुरलेलीं झाडें आणि मधून मधून आढळणारे मेंढ्यांचे कळप ह्यांमुळें त्या प्रदेशाचा उजाडपणा कमी वाटेना.

मध्येंच एखादी जिनिंग फॅक्टरी दिसे आणि भोंवतीं कापसाचे गठ्ठे दिसत.

रायचूर आणि गुंटकल ह्यांच्या मधल्या कुठच्या तरी एका स्टेशनवर आम्हीं चहा—नव्हे, कॉफी, घेतली. चहाचें साम्राज्य आतां संपलें होतें आणि कॉफीचा मुलूख सुरू झाला होता. सबंध दक्षिणभर ही कॉफी आमचा पाटपुरावा करणार होती. तिची कडवट तुरट चव पुन्हा पुन्हा आमच्या जिभेला चिकटणार होती. चहा नव्हता त्यामुळें उत्साह वाटेना. चहा घेतल्याशिवाय मुंबईकरांची सकाळ होत नाहीं हेंच खरें. मद्रासी लोकांना मात्र कॉफीच्या मुलखांत आल्यामुळें हायसें वाटत होतें.

स्टेशनवरची कॉफीदेखील बरी नव्हती. त्यामुळें आम्ही कॉफीला शिव्या देऊं लागलों. तेव्हां एक मद्रासी कळवळून म्हणाला,

" इथली कॉफी पिऊन तुम्ही कॉफीबद्दलचें मत बनवूं नका. पुढें कुठें तरी चांगली कॉफी घ्या. आणि मग तुम्हांला पटेल कीं कॉफी हें सुसंस्कृत लोकांचें पेय आहे आणि चहा पिणें हें रानटीपणाचें आहे. "

निदान त्या वेळीं तरी त्याच्याशीं सहमत होण्याच्या मनःस्थितींत आम्ही नव्हतों.

त्या स्टेशनवर डोशे व वडे विकणाऱ्या एका माणसानें माझें लक्ष वेधून घेतलें. तो मध्यम उंचीचा आणि थुलथुलीत देहाचा होता. त्याचे गाल गुब्र-गुबीत होते. मिशा भरघोस होत्या आणि चेहेरा घवघवीत होता. डोक्याला त्यानें केशरी शेमला बांधला होता, त्यामुळें तो अधिकच रुबाबदार दिसत होता. त्याच्या अंगांत शर्ट होता आणि खालीं धोतर होतें. त्याच्या पायांत चपला नव्हत्या खऱ्या, पण त्यामुळें त्याच्या रुबाबाला थोडाहि उणेपणा येत नव्हता. धिम्मेपणानें आणि संस्थानी ऐटीनें तो पावलें टाकीत आणि आपली गाडी ढकलीत फलाटावर हिंडत होता. मोठ्या आर्जवीपणानें कोणाला कांहीं हवें आहे का तें विचारीत होता. आणि कोणी कांहीं मागितलें कीं अशा कांहीं ऐटीनें आणि औदार्याचा आव आणून त्याला तें देत होता कीं, जणुं एखादा राजा अन्नाचें दान करीत होता.

दक्षिणेच्या काटकुळ्या माणसांत अशी ऐट असूं शकेल असें मला वाटलें नाहीं. म्हणून मीं प्रधानला म्हटलें, "अरे, हा कोणी तरी उत्तरेकडचा भय्या दिसतो."

पण तेवढ्यांत आम्हांला कोणी सांगितलें कीं तो उडपी ब्राह्मण होता! सबंध दक्षिणेंत मीं हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीं जीं रुबाबदार माणसें पाहिलीं त्यांतला हा एक होता.

गाडी सुरू झाल्यावर कॉफीची कळवळ्यानें कड घेणाऱ्या आमच्या मद्रासी मित्राला वाचा फुटली. तो बहुश्रुत दिसला. त्यानें आम्हांला पुष्कळ माहिती सांगितली आणि कांहीं गमतीदार मतेंदेखील व्यक्त केलीं. त्याच्या मतें उत्तरेचे लोक रानटी uncivilized and barbarous. साहेब गेल्यावर ह्या उत्तरेच्या माणसांच्या हातांत राजसत्ता जावी ह्याचें त्याला वाईट वाटत होतें.

मीं खंवचटपणानें म्हटलें, "उत्तरेचे लोक राज्य करतात तें फक्त नांवापुरतें. खरें राज्य करतात ते तुमचे मेनन आणि अय्यंगारच!"

माझा खंवचटपणा उमजून तो हंसून म्हणाला, "ते आहेत म्हणून तर निदान इतक्या तरी व्यवस्थितपणें राज्यकारभार चालला आहे!"

इंग्रजीची जागा हिंदीनें घ्यावी ह्याचें त्याला वैषम्य वाटत होतें.

मीं त्याला विचारलें, "इंग्रजी भाषा व तुमच्या द्राविड भाषा ह्यांच्या व्याकरणांत साम्य आहे असें मीं ऐकलें तें खरें का?"

तो हंसून म्हणाला, "इंग्रजी भाषेला व्याकरण आहे अशी तुमची कल्पना आहे कीं काय?"

त्याच्या त्या खोंचक उत्तरानें मलाहि हंसू लोटलें. संभाषणाच्या ओघांत आम्हांला असें कळलें कीं, गुंटकलहून विजयनगरचे अवशेष जवळ आहेत. आणि बंगलोरला जाण्यापूर्वी एक दिवस मोडून आम्हांला विजयनगर (त्या भागाला आतां हंपी म्हणतात.) पाहून येणें शक्य आहे. ब्रेक जर्नी करण्याइतका आतां आमचा प्रवास झाला असल्याकारणानें आमचीं तिकिटेंहि फुकट गेलीं नसतीं.

त्यामुळें सरळ बंगलोरला जाण्याचा आमचा बेत बदलला आणि गुंटकलला उतरून बंगलोरच्या विरुद्ध दिशेला म्हणजे हुबळीला जाणारी गाडी आम्हीं पकडली. तीन चार तासांत ती गाडी हॉस्पेटला पोहोंचते आणि तेथून हंपी फार दूर नाहीं. बसनें अगर टॅक्सीनें तेथें अर्ध्या तासांत सहज पोहोंचतां येतें.

गाडी पकडण्याच्या भानगडींत आम्हांला गुंकटलला न्याहारी करतां आली नाहीं. त्यामुळें आम्हांला तितकासा तकवा वाटत नव्हता. शिवाय उष्मा होत होता. आणि गाडीदेखील रेंगाळतच चालली होती. एम्. एस्. एम्. ची ही गाडी. वेगानें जाणें आणि वेळेवर जाणें हा कांहीं तिचा धर्म नव्हे. छोट्या छोट्या स्टेशनांवर थांबत गाडी चालली होती. कांहीं स्टेशनें इतकीं छोटीं होतीं कीं, त्यांना धड फलाट नव्हता, आवार नव्हतें आणि इमारतहि नव्हती. गोठ्यासारख्या दिसणाऱ्या एखाद्या झोंपडीवर 'First and Second class Waiting Room' असें लिहिलेलें पाहिलें म्हणजे हंसू येत होतें.

इथले हे कानडी लोक एकंदर गरीब आणि साधेभोळे वाटले. कुठल्याहि विनंतीला नाहीं म्हणणें त्यांच्या जिवावर येतें आणि दुसऱ्याच्या उपयोगीं पडायला ते उत्सुक दिसले. तुम्हीं जरा बोलायची तयारी दाखवायची खोटी, ते ताबडतोब अघळपघळपणें बोलूं लागतील; इतकें कीं त्यांचें बोलणें आवरायचें कसें ह्याचा तुम्हांला प्रश्न पडतो. आणि अगदीं खाजगी बाबतींतदेखील निःशंकपणें तुम्हांला प्रश्न विचारायला ते मागेंपुढें पहात नाहींत !

त्यांतल्या त्यांत बेलारी स्टेशन मोठें आहे. बेलारी हें जिल्ह्याचें ठिकाण. गांव मोठें आहे. लांबून तरी स्वच्छ व रेखीव वाटलें. तेथें एक कॉलेजहि आहे म्हणे ! गांवामागें टेकडीवर किल्ला आहे. आणि मुख्य म्हणजे बेलारी स्टेशनवरच्या रेस्टॉरंटमध्यें चहा मिळतो. तें कळतांच आमचे चेहरे खुलले आणि तो वाईट व महागडा चहादेखील आम्हीं उत्साहानें घेतला.

आमच्या डब्यांत एक हुबळीचे महाराष्ट्रियन गृहस्थ होते. ते बोलत होते

त्या भाषेला जर मराठी म्हणायचें तर कानडी कशाला म्हणायचें असा प्रश्न आम्हांला पडला.

वर आम्हीं तुंगभद्रा ओलांडली होती. आतां पुन्हा खालीं दक्षिणेकडे आम्ही तुंगभद्रेच्या तीराकडे चाललों होतों. हॉस्पेटपासून तुंगभद्रा फार दूर नाहीं. आणि विजयनगर तर तुंगभद्रेच्या दक्षिण तीरावर आहे.

हॉस्पेट स्टेशनवर आम्ही उतरलों.

स्टेशनावर सामान ठेवायचें, जेवायचें आणि हंपी पाहून परतल्यावर रात्रीच्या गाडीनें जायचें असा आमचा बेत होता. स्टेशनावर दहा आण्यांना जेवण मिळतें असें कळल्यावर आम्हांला आश्चर्य वाटलें. ह्या स्वस्ताईवर आम्ही खूप झालों. पण खुद्द जेवायला बसल्यावर मात्र ही स्वस्ताई आम्हांला फार महाग पडली. भाताची मुटक मूद पानांत पडली तेव्हां वासंतीनें स्त्रीसुलभ चातुर्यानें ओळखलें कीं भात इतकाच. मीं म्हटलें, "चपाती मिळेल." आणि मग लक्षांत आलें कीं ह्या भागांत चपाती नाहीं.

तो थोडा भात पुष्कळ वाटावा म्हणून शक्य तितक्या सावकाशपणें खाण्याचा आम्हीं प्रयत्न केला. आणि दर घांसाला दगडगोट्यांवर अडखळावें लागल्यामुळें तो यशस्वीदेखील झाला. शिवाय वाढपी सढळ हातानें पुन्हा पुन्हा सांबार वाढत होता. पण इतकें सगळें झालें तरी भात संपला व पोट रिकामेंच राहिलें. मीं चुळबुळत विचारलें, "आणखी कांहीं नाहीं?"

मॅनेजर म्हणाला, "आणखी? मिळेल कीं. Wheat rice आहे ना."

त्यानें वाढप्याला हुकूम केला आणि शिजवलेल्या गव्हाचा पिवळा लगदा आमच्या पानांत पडला. मीं खंबीर मनानें त्याचा एक घांस घेतला. तो पहिला घांस शेवटचा ठरला. इतकी बेचव गोष्ट मीं अजून खाल्लेली नाहीं. पोटांत भूक असूनदेखील मला तो पदार्थ खाववेना. गव्हाच्या चपात्या हे लोक कां करीत नाहींत तें मला समजूं शकत नव्हतें; आणि तें मला समजावून देण्याइतकें इंग्लिशचें ज्ञान त्या मॅनेजरला नव्हतें.

तरतरी न आणणारी कॉफी घेऊन आम्ही बाहेर पडलों आणि तेथें आम्हांला पहिल्यानें झटक्याचें दर्शन घडलें. एका लांबड्या पेटीच्या दोन्ही बाजू कापून टाकल्या आणि ती पेटी दोन चाकांवर ठेवून पुढें एक मरतुकडा घोडा जोडला कीं झटका तयार होतो. त्या झटक्याच्या नळकांडींत अंगाच्या जुड्या करून सहा सहा माणसेंदेखील बसूं शकतात म्हणे. पण आम्हांला-

तिघांनाहि त्या झटक्यांत बसणें अवघड वाटूं लागलें. शिवाय गाडीवाला देखील अर्धा आंत बसला होता आणि घोडा मधून मधून आपली शेपटी आंत ठेवीत होता. ह्या झटक्याचा तोल राखणें हें मोठें अवघड काम असावें. कारण मागच्या माणसानें पाय खालीं सोडले कीं, आपला झटका उलटेल, असा आक्रोश झटकेवाला करूं लागे. त्यामुळें आम्हांला तिघांना पाय दुमडून आणि दाटीवाटी करून अवघडलेल्या स्थितींत बसावें लागलें. शिवाय पुढें-मागें टेंकायची सोय नव्हतीच. कारण केव्हा हिसका बसेल आणि झटक्याच्या लाकडी कडेचा पाठींत मार बसेल त्याचा नेम नव्हता. ह्या सुखसोयीबद्दल आम्हीं त्याला रुपया दीड रुपया दिला.

हंपीला बसनें जातां येतें. पण आम्हांला वेळ थोडा होता आणि हंपीचा विस्तार मोठा. त्यामुळें आम्हीं टॅक्सी केली. टॅक्सीवाल्यानें अर्थातच आमचा या कानापासून त्या कानापर्यंत गळा कापला. आणि मग त्याच्या तापलेल्या टॅक्सींतून, तळपत्या उन्हांतून आम्ही भग्न विजयनगरचे अवशेष पाहायला निघालों.

# :२: उध्वस्त विजयनगर

विजयनगर तुंगभद्रेच्या दक्षिण तीरावर आहे. ह्या तुंगभद्रेचें पूर्वीचें नांव म्हणे पंपा. मुस्लिम आक्रमणाचा खैबर खिंडींतून घुसलेला लोंढा गंगा-यमुनांच्या तीरावर अडला नाहीं, विंध्याद्रीच्या पायथ्याशीं थबकला नाहीं, यादवांच्या देवगिरीनें त्याला टक्कर दिली नाहीं. तो अखेर या कृश तुंगभद्रेच्या तीरावर थोपला. दोनशें वर्षेपर्यंत तो लोंढा विजयनगरच्या दगडी तटांवर आदळत होता आणि गुरगुरत निरुपायानें मागें सरकत होता. आणि ह्या दोनशें वर्षांच्या काळांत विजयनगरमध्यें हिंदु संस्कृतीच्या द्राविड शाखेचा असा कांहीं उत्कर्ष झाला, शिल्पाचे आणि स्थापत्यकलेचे असे भव्य व संपन्न विलास झाले, कलांचा असा अद्‌भुत विकास तेथें झाला आणि वैभवाचीं अशीं भांडारें तेथें जमा झालीं कीं, मुसलमानांनीं केलेल्या अपूर्व आणि क्रूर विध्वंसानंतरहि, त्या संस्कृतीची स्मृति इतिहासांत कायमची कोरलेली राहिली आहे. त्या विनाशाच्या ढिगाऱ्यावर विजयनगरची विजयपताका अजून फडकते आहे, कायमची फडकत रहाणार आहे.

विजयनगरचा इतिहास रामायणकालापर्यंत पोहोंचतो. ती म्हणे पूर्वीची किष्किंधा. निदान तिथल्या लोकांनीं आम्हांला असें सांगितलें आणि तें खरें असावें. पंचवटीहून रामेश्वराकडे जाणाऱ्या मार्गावरच ही भग्न नगरी आहे. आणि तसें पाहिलें तर अजूनहि मोठी वानरसेना येथें क्रीडा करतांना आढळते ! ह्याच किष्किंधेंत वाली आणि सुग्रीव ह्यांचें युद्ध चालू असतांना रामानें वालीचा वध केला. तें युद्ध चालू असतांना त्यांनीं परस्परांवर फेकलेल्या प्रचंड शिला अजून येथें इतस्ततः पडलेल्या आहेत. हनुमानाच्या निरुपम सेवाधर्माचा येथेंच प्रारंभ झाला. ‘ हा सीते ! हा सीते ! ’ असा विकल आक्रोश करणाऱ्या रामचंद्राचे पवित्र अश्रू ह्या तुंगभद्रेंत पडले असावे. सुग्रीवाच्या व हनुमानाच्या मदतीनें लंकाधीशाचें पारिपत्य करण्याचा घोर निश्चयदेखील रामचंद्रानें येथेंच केला असावा. नाहीं तर परकीय आक्रमण थोपविण्याचें सामर्थ्य ह्या इवल्याशा तुंगभद्रेला प्राप्त झालें नसतें आणि ह्या भूमींत कृष्णदेवरायासारखे पराक्रमी व निश्चयी राजे निर्माण झाले नसते.

विजयनगरची आठवण झाली कीं, माझें मन भावनाधीन होतें. इतिहासाच्या अभ्यासकाच्या शास्त्रीय वृत्तीला मी कांहींसा पारखा होतों. माझ्या मनांतल्या कांहीं खोल निष्ठा जागृत होतात. त्या नगराच्या वेशीवर मी नंगी तलवार घेऊन उभा रहातों आणि गर्जना करतों, " या ! ह्या तलवारीचे बळी व्हायचें असेल तर पुढें या. ह्या देहांत प्राण असेपर्यंत ह्या वेशीपलीकडे तुम्ही जाऊं शकणार नाहीं ! "

शाळेंत असतांना हातांतल्या पट्टीची तलवार करून मी असें म्हणत असें, आणि आजहि तसेंच म्हणावेंसें वाटतें. तेव्हां असें म्हणण्याची माझी नालायकी मला जाणवत नसे. आतां मात्र तीव्रतेनें जाणवते आणि मन खट्टू होतें.

ह्या वैभवशाली नगरीचें वर्णन अनेक प्रवाश्यांनीं करून ठेवलेलें आहे. मुसलमान, युरोपियन, सारेच ह्या नगरीच्या वैभवाची प्रशंसा करतांना आढळतात. अबदुर रझाक हा प्रवासी म्हणतो कीं, अवनीतलावर अशी नगरी कोणी नजरेनें पाहिलेली नाहीं आणि अशी दुसरी नगरी असल्याचें ऐकिवांत नाहीं. एकाच्या आंत एक अशा सात तटबंद्यांत ही नगरी वसवलेली होती. तिचा दक्षिणोत्तर विस्तार जवळ जवळ सात ते आठ मैल होता आणि पूर्व-पश्चिम विस्तारदेखील तितकाच होता. तिच्या बाहेरच्या तीन तटबंद्यांत शेतें, बागबगीचे, घरें होतीं. आणि आंतल्या तटबंद्यांत बाजारांची आणि दुकानांची नुसती रीघ लागून राहिली होती. अगदीं मध्यभागीं राजाचें निवासस्थान होतें. नगरींत ठिकठिकाणीं बगीचे, देवालयें आणि मन प्रसन्न करणारे जलाशय होते. तुंगभद्रेला बांध घालून दगडी पन्हळांतून शहरांत आणि विशेषतः राजप्रासादांत पाणी खेळवलेलें होतें. राजवाड्याचें वर्णन करतांना तर त्या प्रवाश्याची लेखणी अडली. राजवाड्यांतील एक दालन तर नुसतें हस्तिदंताचें होतें आणि त्यांतलें नक्षीकाम केवळ अप्रतिम होतें. राजवाड्यांतलीं भांडींकुंडीं सगळीं सोन्याचांदीचीं होतीं आणि कांहींचा आकार नुसता अजस्र होता. राजाच्या खजिन्यांत ओतीव सोन्यानें भरलेल्या गुहा होत्या म्हणे !

त्या नगरींत असंख्य लोक राहात असत. त्यांतल्या अनेकांच्या अंगावर रत्नांचे अलंकार असत आणि उघड्या बाजारांत रत्नें मांडलेलीं असत. देवादिकांचे विराट् उत्सव नेहमीं चालत. ह्या देवांना शेंकडों बकऱ्यांचे व रेड्यांचे बळी दिले जात. विजयनगरचे कांहीं राजे शैव होते आणि कांहीं वैष्णव होते. पण हिंदूंच्या पद्धतीप्रमाणें सारे देव ह्या नगरांत खेळीमेळीनें

वास करून होते. ब्राह्मणांचा येथें फार बडेजाव असला, तरी लोक मोठ्या प्रमाणावर मांसाशन करीत. आपल्या चिनी बांधवांप्रमाणें ते उंदीर वगैरे प्राणीहि खात असत. तरवारीनें द्वंद्वयुद्ध खेळण्याची पद्धत येथें रूढ होती आणि गुन्हेगारांना शिक्षा जबरदस्त होत्या. चोरी केली कीं एक हात व एक पाय तोडला जात असे !

अशा वैभवशाली नगरांत चंगीभंगीपणा असणारच. तेथें देवदासींची संख्या मोठी होती आणि वारयोषितांची तर मोठी वसाहतच होती. नटूनथटून, रत्नखचित अलंकार घालून त्या चारुगात्री आपल्या घराच्या चौथऱ्यावर बसत आणि रस्त्यांतून फिरणाऱ्या रंगेल नागरिकांकडे पाहून असे कांहीं हाव-भाव करीत आणि असें कुशल नेत्रसंधान करीत कीं ते नुसते मोहित होऊन जात. निदान बापड्या अबदुर रझाकची तरी तशी अवस्था झाली असावी.

टॅक्सींतून जात असतांना, उन्हाच्या झळी, तहानेचा शोष, ड्रायव्हरची बडबड, सारें कांहीं मी क्षणभर विसरलों. इतिहासांत पुन्हा पुन्हा वाचलेलीं त्या नगराचीं अनेक वर्णनें मला आठवत होतीं. आणि क्षणभर मला असा भास झाला कीं, तें वैभवशाली नगर अजून तसेंच अस्तित्वांत आहे, जीवनानें गजबजलें आहे आणि मी विसाव्या शतकांतला प्रवासी, कृष्णदेवरायाला प्रणाम करायला जात आहें.

मग एकदम आठवण झाली कीं, अनेक दिवस मुसलमान तें नगर लुटीत होते, जाळीत होते, त्याची मोडतोड करून टाकीत होते. आणि त्या गोष्टीलाहि आतां चारशें वर्षें होत आलीं होतीं.

उत्तरेस तुंगभद्रा, भोंवतीं डोंगर आणि मध्यें विजयनगर अशी रचना असल्याचें मोटरमधून जातांना आमच्या ध्यानांत आलें. त्या उध्वस्त नगराकडे जाण्याचा मार्ग दुर्गम, खडकाळ आणि चढउतारांचा होता. मार्गांत अनेक प्रचंड शिला वेड्यावांकड्या, अस्ताव्यस्त पडल्या होत्या. कांहीं ठिकाणीं त्यांचे ढीग होते आणि त्यांतल्या कांहीं तर इतक्या निसटत्या आधारावर उभ्या होत्या कीं, त्या कोसळतील असें सारखें भय वाटत होतें. त्यांतल्या कांहीं शिला मोडक्या तटबंदीच्या वगैरे असतील. पण तो एकंदर प्रदेशच असा शिलांनीं भरलेला असावा असें मला वाटतें.

त्या विखुरलेल्या शिलांच्या राशी पाहून मला वाटलें कीं, कोण्या राक्षसानें ह्या शिला इतस्ततः फेकून देण्याचा खेळ केला असावा. ती भयानक क्रीडा पहायला

मिळाली असती तर बरें झालें असतें, असें वेडें कुतूहल मला वाटूं लागलें.

मला प्रश्न पडला कीं, अशा दुर्गम, भकास, खडकाळ ठिकाणीं एका बलिष्ठ साम्राज्याची राजधानी कां बरें वसवली असावी ? शत्रूचा शिरकाव होऊं नये अशी जागा शोधणें अवश्य होतें हें कोणालाहि पटण्यासारखें होतें. सिंहगड, रायगड हेदेखील दुर्गम आहेत. पण तेथील वनश्री आणि त्यांची ठेवण मनाला प्रसन्न करणारी आणि स्फूर्ति देणारी आहे. विजयनगरच्या आसमंतांत मला तसें स्फूर्तिदायक, प्रसन्न असें कांहींच आढळलें नाहीं. एक मोठें साम्राज्य उभारण्याची कल्पना ह्या शिलांच्या राशींत सुचावी हें मला अजब वाटलें. त्याचा उलगडा मला होईना.

कुठें तटबंदी दिसेल, कुठें पडक्या घरांच्या रांगा दिसतील, अशा अपेक्षेनें मी मोटारींतून टकाटका चौफेर पहात होतों. पण तसें कांहीच दिसेना. क्वचित् कुठें तरी पडके अवशेष दिसत होते. आणि मग कांहीं अर्धवट तर कांहीं पूर्णपणें उभ्या असलेल्या इमारती, देवालयें, मूर्ती वगैरे अंतराअंतरावर दिसूं लागल्या. बस्स ! त्या प्रचंड नगराचे अवशेष म्हणून इतकेच शिल्लक राहिले होते. मीं इतकेच म्हटलें खरें ! पण तेदेखील नीटपणें एकदांच पहायचे तर चार दिवस तेथें काढायला हवेत. ह्यावरून मूळ नगराच्या विस्ताराची कल्पना येईल.

राजाच्या निवासस्थानाचा चौथरा आणि विस्तीर्ण आवारच काय तें आतां दृष्टीस पडतें. एखादी ढांसळलेली भिंतदेखील आतां तेथें उभी नाहीं. कल्पनेनें त्याची पुनर्रचना करतां येईल इतकेदेखील अवशेष तेथें नाहींत. जिथें प्रवेश मिळण्याचें भाग्य लाभावें म्हणून मोठाले उमराव झटत असतील, तेथें आतां चिटपांखरूंदेखील जायला तयार नव्हतें. जेथें कृष्णदेवरायाचें निर्भर हास्य घुमलें, जेथें मोठाल्या सल्लामसलती झाल्या, जेथें नृत्यसंगीताच्या मैफली झडल्या, तेथें भकासपणा प्रेतासारखा पडला होता. कां कोण जाणे, पण त्या जागीं वावरतांना मला चोरट्यासारखें वाटत होतें.

राजवाड्याची जरी अशी दशा झाली असली तरी राण्यांच्या निवासस्थानाचे कांहीं अवशेष अजून आहेत. ह्या अंतःपुराला चारी बाजूंनीं उंच तटबंदी आहे आणि तटबंदीच्या कोपऱ्यांवर रक्षकांकरितां एक एक मिनार आहे. त्या मिनारांवरून भोवतालचें दृश्य चांगलें दिसतें. जवळच असणारी एक सुंदर घुमटांची आणि कमानदार दरवाज्यांची इमारत पाहून आम्हीं विचारलें, "हा कुठचा महाल ?"

ड्रायव्हर म्हणाला, "छे, हा महाल नाहीं. हा राजाचा हत्तीखाना आहे."

अशा इमारतींत रहाणाऱ्या त्या हत्तींचें नशीब थोर ह्यांत शंका नाहीं. बहुधा बेटे मधांत बुडवलेला चारा खात असावेत.

अंतःपुरांत 'कमल महाल' नांवाची मोठी सुबक इमारत अजून शाबूत आहे. कमळाच्या पाकळ्यांसारखा नाजुक लालसर रंग त्या इमारतीचा आहे. कमलदलांचा नाजुकपणा त्या इमारतीच्या रचनेंत, कमानींत आणि घुमटांत पुन्हा पुन्हा जाणवतो. इमारतींत शिल्पकलेचे विलास नाहींत. पण नुसतें रचनेचें सौंदर्य मनाला मोह घालण्यास समर्थ आहे. ज्या नगरींत सारें भव्य, अजस्र आणि शिल्पकृतींनीं मढलेलें आहे, तेथें ही नाजुक, साधी इमारत आपल्या निराळ्या सौंदर्यानें स्मरणांत रहाते.

ह्या अंतःपुरापासून थोडया अंतरावर राजस्त्रियांचें स्नानगृह आहे. स्नान-गृहाच्या दगडी भिंती उंच आहेत. त्यामुळें त्या राजस्त्रियांची क्रीडा कोणी चोरून पाहिली असेल असें वाटत नाहीं. स्नानगृहाच्या मध्यभागीं स्नान करण्याचा हौद आहे. भोंवतीं सुंदर नक्षीकाम केलेले सज्जे आहेत. त्या सज्ज्यांत बसून आपल्या सख्यांची जलक्रीडा राजस्त्रिया पहात असतील, पाण्याचे सपकारे एकमेकांवर उडवीत असतील, आणि त्यांची अशी निर्भरपणें स्वच्छंद जलक्रीडा चालली असतांना अवचितपणें एखादीस महाराजांची स्वारी तिकडे फिरकत असतांना दिसत असेल — आणि मग लज्जेनें आपलीं शरीरें पाण्यांत लपविण्याचा प्रयत्न करत असतांना...

कोण जाणे, तेव्हांच्या बायका इतक्या लाजऱ्या होत्या कीं नाहीं तें !

किती तरी पहायचें होतें. मिनिटामिनिटाला ड्रायव्हर मोटार थांबवीत होता आणि हें पहा, तें पहा, असें सांगत होता. लवकर पाहून घ्या, आणखी पुष्कळ पहायचें आहे, असें म्हणत होता. आम्ही एक एक ठिकाण फार वेळ पहातों, असें म्हणत होता. बाकीचे लोक म्हणे मोटारींतून उतरतदेखील नाहींत. मोटर-मधून वांकून पहातात आणि म्हणतात, "पाहिलें. चलो आगे !"

आपण अमकें अमकें पाहिलें असें लोकांना सांगतां यावें, एवढाच बहुधा त्यांच्या यात्रेमागचा हेतु असावा !

उशीर होत होता आणि आमची फार धांदल होत होती. त्यांत फोटो घेण्या-करितां प्रधान ज्या उड्या मारीत होता त्यामुळें भर पडत होती. निदान तसा भास होत होता. त्या धांवपळींत त्यानें एका दगडी नंदीवर स्वार होण्याचा मोका

सोडला नाहीं आणि मीं अर्थातच त्याचा फोटो घ्यायची संधि दवडली नाहीं.

वासंतीचे पाय दुखूं लागले. त्यामुळें ती मोटारींत बसूनच "अहाहा! काय ग्रँड आहे!" असें साविर्भाव म्हणूं लागली.

आम्हांला सगळयांनाच तहान लागली होती. पण आतां त्या ओसाड नगरींत पाण्याचा घोट मिळणें अशक्य होतें. आणि एके काळीं तुंगभद्रेंतलें पाणी तेथें दगडी पन्हळांतून कसें झुळझुळत असे त्याची कल्पना करणें सुखदायक असलें तरी त्यामुळें कांहीं आमची तहान भागत नव्हती.

आम्ही आ वासून तेथल्या अप्रतिम शिल्पाकडे पहात असतांना आमचा ड्रायव्हर शांतपणें सरपण गोळा करून मोटारीच्या मागच्या बाजूला भरत होता!

विजयनगरमध्यें अनेक देवालयें आहेत आणि सगळीं आपापल्या परीनें सुंदर आहेत. कांहींची बरीच मोडतोड झाली आहे, कांहीं चांगल्या अवस्थेंत आहेत. पुष्कळ देवळांतल्या मूर्ती नष्ट झाल्या आहेत. हजार रामस्वामी देवालयांत सगळें रामचरित्र कोरलेलें आहे. मातंग ऋषींच्या टेकडीवर एक देवालय दिसतें. टेकडी कसली, ओक्याबोक्या अणकुचिदार शिलांची रासच ती. उन्हांत तापलेल्या आणि तहानेनें गळून गेलेल्या आम्हांला त्या टेकडीवर चढण्याइतका उत्साह वाटूं शकला नाहीं. वासंती खालूनच "किती ग्रँड आहे!" असें पुन्हा पुन्हा म्हणूं लागली. त्यामुळें जाण्याचा बेत रद्दच झाला.

ह्या टेकडीवर म्हणे मातंग ऋषि तपश्चर्या करीत असत. वाली आणि सुग्रीव ह्यांचें भांडण झालें तेव्हां सुग्रीवानें पळून जाऊन ह्या ठिकाणीं आसरा घेतला होता. कारण वालीनें एका राक्षसाचा वध करून त्याचें प्रेत तेथें भिरकावून दिलें असल्याकारणानें मातंग ऋषींनीं चिडून त्याला शाप दिला होता आणि त्यामुळें त्या टेकडीवर येणें वालीला शक्य नव्हतें. ह्या टेकडीवर एक देवालय आहे. त्यांत काळ्या पाषाणाची परशुरामाची मूर्ति आहे, असें ड्रायव्हर म्हणाला.

कां कोण जाणे, वाली आणि रावण ह्या दोघांविषयीं मला सहानुभूति वाटते. वाली महापराक्रमी होता. त्यानें सुग्रीवाची बायको आपल्या घरांत नेली हें खरें, पण ती तेव्हांची पद्धतच होती. वालीला मारल्यावर सुग्रीवानें तेंच केलें. अशा पराक्रमी वालीला रामानें आडून शरसंधान करून मारावें हा त्याच्या चारित्र्यावरचा मोठा डागच समजला पाहिजे.

येथें एक जमिनीखालीं सांपडलेलें देवालय आहे. नाग पकडतांना म्हणे ह्याचा

टावठिकाणा लागला आणि मग त्याचें उत्खनन करण्यांत आलें. देवालयांत खालीं उतरून जावें लागतें. देवालयाच्या मंडपांत वगैरे फिरतां येतें. पण आंतला भाग पाण्यानें भरलेलाच असतो. तेथें जिवंत पाण्याचा झरा आहे. मीं कडेच्या एका दारानें आंत डोकावून पाहिलें. आंत अंधार होता, आणि पुसट प्रकाशांत आंत भरून राहिलेलें पाणी दिसत होतें. त्या दालनाचे खांब पाण्यांत उगवल्यासारखे वाटत होते आणि आंतलें पाणी सावकाशपणें हललें कीं, पोटांतहि कांहींतरी डुचमळत होतें. आंत पाय दुमडून नंदी शिवाच्या आज्ञेची वाट पहात सामोरा बसलेला आहे. भिंतीवर मला एक नाग दिसला. मी जरा चमकलोंच. पण तावडतोब ध्यानांत आलें कीं, ती शिल्पाकृति आहे ! आंत गाभाऱ्यांत तर नुसता काळोख दाटला आहे. तेथें प्रवेश होणें कठीणच. तेथल्या वातावरणांत अद्‌भुतता दरवळत होती. मला गुहेंतून वहाणाऱ्या नदींतून तरंगत गेलेल्या सिंदबादची आठवण झाली. आणि वाटलें कीं आपण जर पाण्यावर तरंगत ह्या गाभाऱ्यांत प्रवेश केला तर थेट नाग लोकांत जाऊन पोहोंचूं आणि तेथें हिऱ्यामाणकांच्या लखलखाटांत एका निराळ्या, अद्‌भुत जीवनांतील विलासांचा अनुभव घेऊं !

विजयनगरला पहाण्यासारखीं दोन महत्त्वाचीं देवळें म्हणजे एक विठ्ठल-स्वामींचें आणि दुसरें विरूपाक्षाचें.

त्यांतलें विठ्ठलस्वामींचें आम्हीं आधीं पाहिलें आणि मला तें अधिक आवडलें. देवालयाकडे जातांना वाटेंत पण्यांगनांच्या वसाहतीचे अवशेष लागतात. एके काळीं वासनांच्या तृप्तीचे आणि अतृप्तीचेहि किती निःश्वास तेथल्या हवेंत मिसळले जात असतील कोण जाणे ! माझें मन आणखी कल्पना लढविण्यांत रममाण झालें असतें; पण ‘ हा रांडांचा बाजार होता, ’ असें रोखठोकपणें म्हणून आमच्या ड्रायव्हरनें मला जमिनीवर आणलें.

दक्षिणेंत विष्णूचीं देवालयें पुष्कळ आहेत. कधीं तो अनंतशयनम् असतो, तर कधीं रंगनाथ असतो. पण आम्ही मराठे विष्णूला विठोबा ह्या नांवानें ओळखतों. विष्णु म्हटल्यावर चटकन् आमच्या नजरेसमोर तें ध्यान येतें. देवावर माझा विश्वास नाहीं. पण ह्या विठ्ठलाच्या चरणीं तुकयानें जी अभंगवाणी वाहिली, तिचे आजहि उठणारे पडसाद ऐकले कीं, माझें मन सद्गदित होतें. सिनेमांतदेखील ‘ झाला महार पंढरिनाथ ’ असें ऐकलें कीं, हृदय कसें भरून येतें. अशा महार होणाऱ्या विठ्ठलाचें देवालय पहायचें

म्हटल्यावर माझें मन उत्सुक झालें होतें. त्या देवालयाच्या दर्शनानें ती उत्सुकता निवली. त्याच्या सौंदर्यानें हृदय तोषलें.

असें म्हणतात कीं, पंढरीच्या विठोबाकरितां हें देवालय इथल्या राजांनीं बांधलें. त्यांत पंढरीची मूर्ति नेऊन बसवायची असा त्यांचा हेतु. आपल्याकरितां बांधलें जाणारें हें नवें देवालय पहायला देव पंढरीहून आले. देवांनीं देवालय पाहिलें आणि ते म्हणाले, " हें निवासस्थान फार भव्य आहे, सुंदर आहे, पण मला रुचण्यासारखें हें नाहीं. माझें पंढरपूरचें साधेंसुधें निवासस्थानच मला पसंत पडतें. तेथेंच मी निवास करीन."

महार होणाऱ्या महाराष्ट्राच्या दैवतानें असें बोलावें हेंच महाराष्ट्राचें वैशिष्ट्य आहे. आणि देव जर विजयनगरला गेले असते, तर त्यांना सुंदर निवासस्थान मिळालें असतें खरें, पण मग तुकयाच्या दिव्य भक्तीला देव मुकले असते. आणि हा महाराष्ट्राचा विठोबा तर 'भावाचा भुकेला' म्हणून प्रसिद्ध आहे.

ह्या देवालयाच्या सभोंवतीं दगडी तट आहे आणि त्याच्या तीन बाजूंना सुंदर गोपुरें आहेत. गोपुरें म्हणजे प्रवेशद्वारें. पूर्वी आर्यांच्या गांवांच्या भोंवतीं लाकडी कुंपण असे आणि त्या कुंपणांतून चरायला जाणाऱ्या गाईंसाठीं एक द्वार असे. ह्या द्वाराला गोपुर म्हणतात. त्या साध्या गोपुरांतून दक्षिणेंतील देवालयांच्या ह्या भव्य गोपुरांचा विकास झाला. हें गोपुर म्हणजे मोठें दगडी प्रवेशद्वार असतें आणि त्या प्रवेशद्वाराच्या वर उंचच उंच, निमुळतें होत गेलेलें विटांचें बांधकाम असतें. ह्या उंच होत गेलेल्या रचनेच्या प्रत्येक मजल्यावर देवादिकांच्या आणि त्यांचें अवतारकार्य दर्शविणाऱ्या अनेक शिल्पाकृती कोरलेल्या असतात. डोंगराच्या उतारावर जसें झाडांचें जंगल माजलेलें असतें तसें हें शिल्पाकृतींचें जंगलच गोपुराच्या निमुळत्या होत गेलेल्या बाजू भरून टाकतें आणि त्याच्या भव्यपणांत व रचनेच्या प्रमाणबद्धतेंत भर टाकतें. देवाच्या दर्शनाला येणारा माणूस त्या उच्च आकाशांत गेलेल्या रचनेकडे आश्चर्यानें व आदरानें पहातो. देवांच्या अवतारकार्याच्या त्या कोरलेल्या दर्शनानें पुनीत झालेली त्याची नजर वर वर जाते. वरच्या आकृती दिसाव्या म्हणून तो डोळे ताणतो. पण सारें अस्पष्ट होऊं लागतें. नजरेचें सामर्थ्य संपतें, पण परमेश्वराचें अस्तित्व संपत नाहीं. परमेश्वराच्या गूढतेचा त्याला साक्षात्कार होतो. गोपुराचें निमुळतें झालेलें टोंक ह्या भांबावून सोडणाऱ्या विविधतेंतील एकता अधोरेखित करतें आणि मग पहाणाऱ्याची नजर अनंत आकाशांत नेऊन सोडून देतें.

अशा ह्या गोपुराच्या दर्शनानें माणूस विनम्र होतो आणि मग देवालयांत प्रवेश करतो. आम्हीं पुढें जीं गोपुरें पाहिलीं त्या मानानें विठ्ठलस्वामींच्या देवालयाचीं गोपुरें लहान होतीं. पण म्हणून कांहीं त्यांचें सौंदर्य उणें नव्हतें. मुख्य गोपुरांतून आंत गेल्यावर तटाच्या कडेकडेला धर्मशाळेच्या स्वरूपाच्या ओवऱ्या आहेत. आणि समोर मोकळ्या प्रांगणांत एक सुंदर दगडी रथ आहे. पहातांना असें वाटतें कीं, एकाच प्रचंड शिलेंतून हा कोरलेला असावा. पण खरोखर त्याकरितां अनेक शिला वापरण्यांत आलेल्या आहेत. त्यांचे सांधे अशा कांहीं सफाईनें बसविण्यांत आलेले आहेत कीं, वरवर पहाणाऱ्याच्या नजरेला ते उमगूं नयेत. आम्हांला ते उमगले नाहींतच.

ह्या मोडतोड झालेल्या देवालयाच्या चार बाजूंना चार मंडप आहेत आणि मध्यभागीं देवालय आहे. ह्या मंडपांतील व देवालयांतील शिल्पाचें वैपुल्य, सौष्ठव व सौंदर्य पाहून माझ्यासारख्या अनभिज्ञ माणसाचेंदेखील भान हरपलें. हें देवालय नव्हतें. हें अनुपम शिल्पाचें एक दाट जंगल होतें. एकेका खांबांत इतकें अद्‌भुत सौंदर्य असूं शकतें ह्याची मला तोंपर्यंत कल्पनाच होती. किती विविध प्रकारचे खांब होते तेथें! आणि एकेक खांब म्हणजे एकेक काव्य होतें. त्या खांबांनीं देवालय सांवरलें आहे, देवालयाच्या रचनेंत त्यांचें कांहीं कार्य आहे, हें विसरायला होत होतें आणि त्यांच्या सौंदर्यांतच गुंगून जायला होत होतें. शब्द वांकवतांना आमची किती त्रेधा उडते. मग ह्यांनीं पाषाणाला कसें वांकवलें असेल? आपल्या कल्पना त्यांत कशा उमटवल्या असतील?

माणसांचें आणि देवतांचें सारें जीवन ह्या शिल्पांत व्यक्त झालेलें आहे. ऐहिक जीवनाला, सुखोपभोगांना, पराक्रमाला, कलेच्या धुंदीला ह्या देवालयांत (नव्हे, दक्षिणेंतल्या कुठल्याच देवालयांत) अटकाव नाहीं. ऐहिक आणि पारमार्थिक ह्यांना वेगळें करणारी कृत्रिम रेषा येथें नाहीं. परमेश्वराच्या द्वारांत सारें मानवी जीवन फुलतांना येथें पाहिलें आणि धर्माविषयींची माझ्या मनांतील अढी कमी झाली. हिंदु धर्माची नजर नेहमीं परलोकावर लागलेली, ह्या कल्पनेला धक्का बसला, आणि जीवन स्वच्छंदपणें, उत्साहानें जगणाऱ्या आणि तें पाषाणावर कोरून अमर करूं पाहणाऱ्या विजयनगरच्या लोकांविषयीं आदर वाटूं लागला.

त्या देवालयाचा असा एक कोपरा नव्हता कीं, ज्यावर शिल्पकारांनीं आपल्या कलेचे संस्कार केले नव्हते. सुंदर शिल्पाचें तें वैपुल्य पाहून मन भांबावून जात

होतें. जणुं शिल्पकलेला तेथें महापूर आला होता. जणुं परमेश्वराच्या सान्निध्यांत ती मुक्त झाली होती. काय बघावें आणि काय बघूं नये तें कळत नव्हतें.

सिंह आणि हत्ती हे पुन्हा पुन्हा त्या शिल्पाकृतींत दिसत होते. पराक्रमाचीं, सौंदर्याचीं आणि भव्यतेचीं जणुं प्रतीकेंच असलेले वनराज ह्या पराक्रमी लोकांना प्रिय असावेत ह्यांत नवल तें काय? ह्या वनराजांच्या ज्या शिल्पाकृती मीं पहिल्यानें पाहिल्या त्या सगळ्या नटलेल्या आणि सुशोभित केलेल्या अशा आढळल्या. राजदरबारांत वावरलेल्या एखाद्या सेनापतीनें आसनस्थ व्हावें तशी सिंहाची बैठक! त्याच्या चेहेऱ्यावर सुसंस्कृत गांभीर्य दिसत होतें आणि आपल्या आयाळीला बहुधा त्यानें पर्मनंट वेव्ह करून घेतला असावा आणि मग ती पोमेड लावून चापून चोपून बसवली असावी!

ह्या सुशोभित केलेल्या शिल्पाकृती आपल्या परीनें सुंदर होत्या. पण पंडित नेहरूंनीं दागदागिने घालून हिंडावें, बस्स, तशा त्या दिसत होत्या! ह्या प्राण्यांच्या वास्तव आकृती पहायला मी उत्सुक झालों. आणि मला शंका आली कीं ह्या शिल्पकारांना अशा वास्तव आकृती काढतां येत नव्हत्या कीं काय? वास्तवांतलें सौंदर्य दिसूं शकत नव्हतें कीं काय?

पण माझ्या ह्या शंकेला ताबडतोब उत्तर मिळालें. सोंड उभारून उधळलेल्या हत्तीची आकृति मीं पहिली. त्या गजराजाचा मोकाट उधळणारा उन्माद, त्या निर्जीव शिलेवरच्या स्थिर आकृतींत व्यक्त झाला होता आणि मग शिकार करणाऱ्या सिंहाची आकृति पाहिली आणि नजर तोषली.

संतुष्ट होऊन आणि दमून भागून आम्ही बाहेर पडलों. विठ्ठलस्वामींच्या देवालयाचें मीं हें जरा विस्तारानें वर्णन केलें. इतर देवळेंदेखील अशींच सुंदर होतीं. त्यांतल्या अनेक शिल्पाकृती माझ्या नजरेसमोर अजून तरळत आहेत, स्मृतींत गोंदल्या गेल्या आहेत. नर्तिकांच्या कृश कटिभागांतील विविध भाव, मृदुंग वाजविणाऱ्या कलाकाराच्या चेहेऱ्यावरील बेहोषी आणि त्याचा ठसका व ढंग, शंख वाजविणाऱ्या माणसाचे फुगलेले गाल—बोटांनीं ते दाबावे असा मोह होत होता. लढाया आणि शिकारी. हातांतल्या काठीवर रेलून उभा राहिलेला, डोक्यावर घोंगडी घेतलेला गुराखी पोर. मत्स्यकन्या आणि तपश्चर्या करणारे मुनी. वळवळणारे नाग!

विरूपाक्षाचें देवालय हें हंपींतलें सर्वांत जुनें आणि महत्त्वाचें आहे. अजून तें वापरांत आहे. त्याच्यासमोर दुतर्फा दगडी इमारती असलेला एक जुन्या

काळचा रस्ता आहे. तेथें म्हणे पूर्वी बाजार होता. तेथल्या इमारती अजून कांहीं अंशीं शाबूत आहेत. आतां तेथें कोणीच रहात नाहीं. पण विरूपाक्षाची यात्रा भरली म्हणजे ह्या जुन्या घरांतून यात्रेकरू वास्तव्य करतात. देवालया-समोर दोन प्रचंड लाकडी रथ आहेत. त्यांचीं भरीव चाकेंच माणसाइतकीं उंच असावीं. विजयनगरच्या साम्राज्याच्या कालांत तेथें आलेल्या पेज ( Paes ) ह्या प्रवाशानें ज्या मोठ्या यात्रेचें वर्णन केलें आहे, तीच अजूनहि चालू आहे, ह्या गोष्टीचें कौतुक वाटतें. कालाच्या उतरंडीवर उभ्या राहिलेल्या अनेक पिढ्यांनीं संस्कृतीचें हें लेण पुढच्या पिढ्यांच्या हातांत दिलें आहे आणि परंपरेच्या ह्या भव्य कमानींनीं आपण आपल्या पूर्वजांशीं जोडले गेलों आहोंत.

देवाच्या दारीं क्षुधाशांतीची सोय आहे असें कळतांच आमचा विरूपाक्षा-विषयींचा आदर द्विगुणित झाला. विजयनगरच्या कालांतील एका दगडी घराच्या अंगणांत बसून आम्ही कॉफी प्यालों, ह्याबद्दल आम्हांला स्वतःचें कौतुक वाटलें खरें, पण कॉफीला कांहीं चहाची चव आली नाहीं. चहा अगर कॉफी कांहीं मनुष्य नुसताच पीत नाहीं. त्याबरोबर उपमा आणि म्हैसूरपाकाच्या वड्या आम्हीं खाव्या हें साहजिकच होतें. एवढ्यावरच आम्ही थांबलों ह्याचें कारण त्याच्याकडे आणखी कांहीं चांगलें नव्हतें.

विरूपाक्षाचें देवालय मोठें आहे. त्याच्या भव्य गोपुराची उंची दीडशें फुटांहून अधिक आहे. आंत शिल्पकलेचा विपुल विलास आहेच; पण वर चुना फासटून त्या सौंदर्याला अकारण उणेपणा आणला गेला आहे. देवळाच्या आवारांत सुग्रीवाचे वंशज पुष्कळ आहेत. त्यांची लीला पहाण्यांतच आमचीं थकलेलीं मनें रमलीं. देवाचें दर्शन घ्यायला गेलों. पण तेथें दर्शनाचे दोन आणे, नारळाचे दोन आणे व आणखी कसले तरी सहा आणे, असा सौदा आम्हांला अडवून जेव्हां पुजारी करूं लागला तेव्हां चिडून मी मागें फिरलों. बापडा विरूपाक्ष गंगाधराच्या दर्शनाला मुकला !

हीं निरनिराळीं स्थळें पाहण्याकरितां मोटारीमधून इकडे तिकडे जात असतांना आम्हांला मध्येंच पडलेले अवाढव्य दगडी दरवाजे दिसले. प्रचंड दगडी पन्हळ कोणीतरी फेकून दिल्यासारखे, तिरके होऊन पडले होते. मधून मधून दगडी चक्क्या दृष्टीस पडल्या. आणि राजे जेथें स्वतःची सुवर्णतुला करीत असत तो तराजू सांवरणारी दगडी चौकट दिसली.

मध्येंच आम्हांला एक अखंड शिलेचें प्रचंड शिवलिंग दिसलें. त्याची उंची

दहा फूट तरी असावी. त्याच्यावर अभिषेक करायचा म्हणजे वरच्या मजल्यावर जावें लागतें. अशीच एक दुसरी गणपतीची मूर्ति आहे. आपलें अगडबंब, लोंबणारें पोट गणरायानें पोटाभोंवतीं एक नाग गुंडाळून सांवरून धरलें आहे. ह्या गणपतीला उपरोधानें कानडींत राईएवढा गणेश म्हणतात. उग्र नरसिंहाची जी मूर्ति तेथें आहे, तिच्या भव्यतेनें तर डोळे फिरतात. तिची उंची बावीस फूट आहे म्हणे. ह्या नरसिंहाच्या मस्तकावर सहा तोंडांच्या शेषानें आपली फणा धरली आहे. त्याचें विचकलेलें जनावरासारखें तोंड आणि त्याचे बाहेर लोंबणारे डोळे पाहून भीतीच वाटते. त्याची थोडी मोडतोड झाली आहे. आणि पुराणवस्तुखात्यानें त्याला एक लोखंडी आधार दिला आहे. वासंती त्याच्या मांडीवर बसली तेव्हां एखाद्या खेळण्यासारखी दिसली. आणि मला वाटलें कीं, हा चटकन् हिला उचलून तोंडांत टाकीलदेखील !

संध्याकाळ झाली. सूर्य मावळला. पण आमचें पाहणें संपलें नव्हतें. विशेषतः चक्रतीर्थ पहायचें राहिलें म्हणून मनाला चुटपुट लागली. येथें म्हणे तुंगभद्रा मोठें वळण घेते आणि दोन टेकड्यांमधल्या अरुंद फटींतून तिचें पाणी वेगानें वहात जातें. प्रवाहाच्या वेगानें म्हणे येथें किनाऱ्याच्या दगडांत गुहा निर्माण झाल्या आहेत. आमच्या पूर्वजांनीं नेहमींच्या पद्धतीप्रमाणें हें तीर्थस्थान ठरवून टाकलें आहे. गांधींच्या रक्षेचें विसर्जन येथेंहि झालें असें समजलें.

संधिप्रकाशाचें सारवण त्या भग्न अवशेषांवर पडूं लागलें आणि तें ठिकाण अधिक भयाण व एकाकी वाटूं लागलें. विजयनगरच्या साम्राज्याचा जेथें अंत झाला तें स्थल सूर्यनारायण रोज असें संधिप्रकाशानें सारवतो आणि मग त्यावर आकाशांतल्या पणत्या तेवत असतात.

काळोख पडूं लागला तशा पाकोळ्या फडफडूं आणि चीत्कारूं लागल्या. आणि वाटूं लागलें कीं, त्या भग्न अवशेषांतून आतां भुतेंखेतें बाहेर पडतील, आणि चारशें वर्षांपूर्वी विनाशाचें जें भयंकर नाटक त्या नगराच्या रंगभूमीवर झालें तें पुन्हा एकदां साग्रसंगीत करतील. त्या भयानक स्मृतींच्या बंधनांतून मुक्त होईपर्यंत तें पुन्हा पुन्हा करणें हेंच त्या भुतांचें जीवितकार्य असेल. त्या किंचाळ्या, त्या रक्ताच्या चिळकांड्या, ती कत्तल, ती जाळपोळ, ते बलात्कार, ती लुटालूट—सारें पुन्हा तेथें घडून येईल. ज्वालांच्या लळलळणाऱ्या जिभा माणसांचा आणि वित्ताचा स्वाहाकार करून आकाश चाटूं लागतील. ज्या स्त्रियांनीं कधीं परपुरुषाचें दर्शन घेतलें नसेल त्यांच्या मांड्या उघड्या करून त्यांची

अब्रू भर बाजारांत घेतली जाईल. तरवारीच्या टोकावर लहान अर्भकाचें ‘छानसें तें आतडें’ लोंबूं लागेल. किंचाळयांच्या चिळकांड्यांनीं हवा माखून जाईल. हातांत पहारी घेऊन जें सुंदर दिसेल त्याचा नाश करीत उन्मत्त जेते फिरूं लागतील. ज्या देवांच्या भव्य रथाखालीं चिरडून मरावें अशी इच्छा शेकडों भाविक मनांत बाळगत असतील त्यांचा कपाळपोक्ष करायला दुसरे शेकडों भाविक आसुरी ईर्षेनें धांवतील. ज्यांच्या पायाला धूळ लागूं नये म्हणून बहुमोल वस्त्रांच्या घड्या घातल्या जात, त्यांचीं रक्तानें भरलेलीं शरीरें धुळीनें माखतील. ज्यांनीं राज्य केलें ते हत्तीवर संपत्ति लादून चोरासारखे पळून जातील. मानवी इतिहासांतला एक मोटा प्रलय होईल.

पश्चिम तांबडी झाली होती. भूभाग काळवंडला होता आणि आमची मोटार वेगानें त्या अवशेषांपासून दूर जात होती. माझ्या डोक्यांतलें विचारचक्र गरगरत होतें. अदृश्यपणें तें दृश्य पहात माझी कल्पना भिरभिरत होती.

मग थंड वाऱ्याच्या झुळका येऊं लागल्या आणि हॉसपेटचे दिवे दिसूं लागले. आणि पुन्हा जेवण, गाड्या, तिकिटें ह्यांचे विचार मनांत डोकावूं लागले.

आणि तरी पण पुन्हां चारशें वर्षांपूर्वीच्या त्या लोकांच्या जीवनावरून दृष्टि वळवतां येत नव्हती. कसे असतील तें लोक? पराक्रमी!

त्या पराक्रमाच्या विश्वासानेंच त्यांनीं दगडांच्या त्या दुर्गम प्रदेशांत आपली राजधानी वसवली आणि दगडांवर मात करून त्यांतून सौंदर्य खोदलें, कोरलें, बांधलें. कोणाला वाटेल कीं, परकीय आक्रमणाचा लोंढा अडविणारे हे लोक भीतीनें नेहमीं शंकित झालेले असतील आणि त्या भीतीच्या छायेंत खुरटलेलें जीवन जगत असतील. पण त्यांच्या कलाकृतींचे अवशेष निराळी गोष्ट सांगतात. त्यांत पराक्रम आणि आवेश पाय रोवून उभे आहेत, उत्साह फुसांडत आहे. पुन्हा पुन्हा त्यांच्या मंदिरांत जर कुठच्या आकृती दिसत असतील, तर सोंड उभारून एक पाय वर उचलून उधळत आलेल्या हत्तींच्या, सिंहांच्या आणि मागल्या दोन पायांवर उभ्या राहिलेल्या उमद्या घोड्यांवर तरवार उपसून स्वार झालेल्या सैनिकांच्या. शत्रूच्या भूमीवर, छातीवरदेखील, त्या उचललेल्या टांचा रोवीत आणि उगारलेल्या खड्गानें त्याला कंठस्नान घालीत हा शिल्पांत अमर झालेला विजयनगरचा सैनिक सबंध दक्षिणेंत दौडला असेल. पुन्हा पुन्हा तुंगभद्रा ओलांडून शत्रूच्या छातीवर त्याचा घोडा थयथय नाचला असेल.

अजस्र, भव्य असें जीवन जगण्याची त्या लोकांची मनीषा असेल. म्हणूनच त्यांनीं अशा अजस्र व भव्य कलाकृती निर्माण केल्या. एखाद्या पर्वताच्या उतारावर वाढणाऱ्या जंगलांत ज्या प्रकारची संपन्नता व विपुलता असते, तिची त्यांना हौस असावी. नाहीं तर ती हौस त्यांच्या कलाकृतींत ओतली गेली नसती. आजची आपली दळभद्री जीवनविमुख वृत्ति त्यांच्यांत खात्रीनें नसावी. जीवन ते जगले असावेत. जीवन त्यांनीं भोगलें असावें. ती अद्‌भुत रतिक्रीडा दगडांत अमर झाली आहे.

असे निष्कर्ष काढणें ऐतिहासिक दृष्ट्या धोक्याचें आहे हें मला समजतें. एखाद्या कालांतील कला आणि त्या कालांतील जीवन ह्यांचे संबंध फार गुंता-गुंतीचे असतात.

पण सांगितलें ना? विजयनगर हें माझें एक स्वप्न होतें आणि त्याचे अव-शेष पाहून त्याचे रंग आतां अधिक गहिरे झाले आहेत.

## : ३ : सोन्याच्या खाणी

बंगलोरला सकाळीं जाग येत असतांना वाटत होतें कीं मी घरींच आहें. आणि आतां उठल्यावर चहाचे घुटके घेऊन मग आळशीपणानें पेपर वाचणार आहें.

इतक्या सकाळच्या वेळीं प्रधान माझ्या घरीं येऊन मला हांका कां मारीत आहे तें कळेना. कांहीं वेळ मी आश्चर्य करीत राहिलों. मग स्मृतींचे तुकडे मनाच्या कोपऱ्यांतून तरंगत येऊन एकत्र जुळले आणि मी कुठें आहें वगैरे सगळें माझ्या ध्यानांत आलें.

उठावेंसें वाटेना. म्हणून मी पडल्यापडल्याच प्रधानला व्याख्यान देऊं लागलों, "अरे! कशाला तुला ही प्रवास करण्याची दुर्बुद्धी झाली? चांगला सुखांत दिवस काढीत होतास. सकाळीं उठण्याची घाई नव्हती, चहाचा कप सामोरा येत होता......"

पण ह्या बाबतींतल्या माझ्या त्या वेळीं तीव्र झालेल्या भावना व्यक्त करायला-देखील वेळ नव्हता. पांघरूण लाथाडून मी उठलों, प्रातर्विधी उरकले, दाढी ओढली, घड्याळाकडे पहात न्याहारी तोंडांत कोंबली, चहा घशाखालीं ढकलला आणि कपडे चढवून स्टेशनच्या दिशेनें पळत सुटलों, तिकिटाच्या खिडकीवर आदळलों आणि मग गाडींत जाऊन कोलमडतों न कोलमडतों तोंच गाडी हलली.

विजयी मुद्रेनें आम्हींदेखील एकमेकांकडे पाहून माना हलवल्या.

कोलार आणि कोलार गोल्ड फील्डस् ह्या भिन्न जागा आहेत. दोहोंत बरेंच अंतर आहे; आणि सोन्याच्या खाणी पहायला जायचें म्हणून कोलारचें तिकीट मागणाऱ्या माणसाची चांगलीच फसगत होते. सोन्याच्या खाणी कोलार जिल्ह्यांत आहेत म्हणून त्यांना कोलार गोल्ड फील्डस् म्हणतात. त्या बघायला जायचें असल्यास बंगलोरहून मद्रासला जाणारी गाडी पकडावी लागते. त्या गाडींतून तास दीड तास प्रवास केला म्हणजे बंगारपेट स्टेशन लागतें. बंगारपेटला उतरून दुसरी गाडी पकडावी लागते. बंगारपेटहून कोलारला जाणाऱ्या गाड्या, मला वाटतें, एका बाजूला जातात आणि कोलार गोल्ड फील्डस्ना जाणारी गाडी विरुद्ध दिशेला जाते. कोलार गोल्ड फील्डला

जाणारी गाडी पहिल्यानें निरनिराळ्या जवळ जवळ असलेल्या स्टेशनांवर थांबते. ह्यांतल्या प्रत्येक स्टेशनच्या जवळ सोन्याच्या खाणी आहेत.

आम्हीं मद्रासच्या गाडींत बसल्यावर चौकशीस सुरुवात केली. "आम्हांला बोरिंगपेटला उतरायचें आहे, तें केव्हां येईल?" असें विचारलें.

तेव्हां वर्तमानपत्रांत डोकें खुपसून बसलेला एक मनुष्य वर पाहून म्हणाला, "संभाळा हं. बोरिंगपेटचें आतां बंगारपेट झालें आहे. बोरिंग हें एका साहेबाचें नांव. साहेब गेला तेव्हां त्याचें नांवहि गेलें."

"मग बंगार हे गृहस्थ कोण? स्वातंत्र्ययुद्धांतला कोणी हुतात्मा असेल."

"नाहीं. बंगार म्हणजे सोनें!"

तेवढ्यांत दुसरा एक गृहस्थ चिडून म्हणाला, "काय ह्या लोकांना नांवें बदलायची एवढी घाई झाली आहे, कोण जाणे. आधीं देशांतली परिस्थिति सुधारा आणि मग नांवें बदला. आणि साहेबानें आणलेली आगगाडी तुम्हांला हवी, मग त्याचें नांव कां नको?"

बंगारपेट स्टेशनवर न थांबतां जेव्हां आमची गाडी पुढें जाऊं लागली तेव्हां मीं म्हटलें, "अरे! अरे! ही गाडी येथें थांबत नाहीं कीं काय?"

तेव्हां आमचे सोबती म्हणाले, "ही गाडी आतां जरा पुढें जाऊन बाजूच्या रुळावर उभी राहील. तेवढ्यांत समोरून येणारी गाडी बंगारपेट स्टेशनवर थांबून पुढें जाईल आणि मग आपली गाडी मागें स्टेशनांत घेतील!"

त्याऐवजीं बंगारपेटला थांबून आमची गाडी साइडिंगला गेली असती तर? पण द्राविड देशांत आल्यावर द्राविडी प्राणायामाचे कांहीं प्रकार पहावे लागावे हें सहाजिकच आहे. बराच वेळ साइडिंगवर पडल्यावर आमची गाडी पुच्छप्रगति करीत स्टेशनांत आली. नेहमींप्रमाणें धांवपळ करीत आम्हांला दुसरी गाडी पकडावी लागली, आणि मधल्या वेळांत गरम कॉफीचे घुटके घाईनें घेऊन तोंड भाजून घ्यावें लागलें.

अनेक स्टेशनांजवळ सोन्याच्या खाणी होत्या आणि त्यांतल्या कुठल्या स्टेशनवर उतरावें हा प्रश्नच होता. शिवाय तेथल्या एका रंगाचार नांवाच्या गृहस्थांना माझ्या एका मित्राकडून मीं चिठी आणली होती, ते जेथें असतील तेथेंच आम्हांला जायचें होतें. शेवटीं आम्हीं विचार करायचें सोडून दिलें आणि आम्हांला ज्या स्टेशनचें तिकीट तिकीटमास्तरनें दिलें होतें त्या स्टेशनवर उतरलों. त्या स्टेशनचें नांव उर्गम. कानडी नांवांची एकंदर दुर्गमता पहातां,

हें नांव बरेंचसें सुगम होतें.

उर्गमला आलों तेव्हां सूर्य चांगला वर आला होता. पण सुदैवानें आकाश ढगाळलें होतें. हवेंत थंडावा होता आणि मधून मधून पाऊस शिंतडत होता तें मुळींच त्रासदायक वाटत नव्हतें.

येतांना वाटेंत आम्हांला शिमिटासारख्या दिसणाऱ्या मातीचे केवढाले तरी ढीग—ढीग कसले, छोट्या टेकड्याच दिसल्या होत्या. सोनें काढून घेतल्यावर उरलेल्या मातीचे ते ढीग होते असें आम्हांला कळलें. तें ऐकून वाटलें कीं इथें सोन्याचेहि असेच ढीग पहायला मिळतील. कोळशाच्या खाणींतून जसे कोळशाचे ढीग काढतात तसे सोन्याच्या खाणींतून सोन्याचे काढीत असावे अशी आमची कल्पना !

पण. . .तें ओघानें येईलच म्हणा.

एका पोलिसाजवळ आम्हीं हिंदींत चौकशी केली. तो कानडींत आमच्याशीं बोलला. आम्हीं इंग्रजींत त्याला तुझी भाषा समजत नाहीं असें सांगितलें. तेव्हां त्यानेंहि आम्हांला बहुधा कानडींत तेंच सांगितलें आणि मग तो आम्हांला आपल्या अधिकाऱ्याकडे घेऊन गेला.

त्यानें एक माणूस देऊन आम्हांला मायनिंग कमिटीच्या ऑफिसांत पाठवलें आणि पुन्हा एकदां कानडी सौजन्य दाखवलें.

मायनिंग कमिटीच्या ऑफिसच्या पिंजऱ्यांत बसलेला मुख्य कारकून आमची चिठी पाहून खुद्द बाहेर आला. डोक्याला पागोटें, गळ्याभोंवतीं उपरणें, खालीं गुंडाळलेलें धोतर, पायांत तिकडच्या पद्धतीप्रमाणें चपला नव्हत्याच. त्याचा चेहरा वटलेला होता आणि नाकावर घसरलेल्या चष्म्यावरून तो आटुरलेल्या नजरेनें सगळ्या जगांतल्या चुका हुडकीत होता.

परवानगी देणें आपल्या ऑफिसच्या हातांतलें नाहीं असें त्यानें कानडी हेल काढून इंग्रजींत सांगितलें. सावकाश समजावून सांगितलें. पुन्हा सांगितलें.

मीं म्हटलें, "तें समजलें. पण मग परवानगी काढायची कुठें आणि कशी?"

त्यानें आपलें ऑफिस कसें परवानगी देऊं शकत नाहीं हें पुन्हा एकदां सांगितलें आणि मग नंदीदुर्ग गोल्ड मायनिंग कंपनीकडे आम्हांला जावें लागेल अशी सूचना केली.

हें काम एकंदरींत गुंतागुंतीचें दिसलें म्हणून मीं विचारलें, "श्री. रंगाचार ह्यांच्याबद्दल आपल्याला माहिती आहे का?"

ते तेथेंच पलीकडच्या खोलींत होते असें कळलें. आमच्या सुदैवाचें कौतुक करीत आम्ही त्यांच्या खोलींत गेलों. आमची चिट्ठी त्यांना दिली. ते फार कामांत होते. ते म्हणाले, “असें अनपेक्षितपणें येऊन परवानगी मिळणें मोठें कठीण आहे. आपण आधीं पत्रव्यवहार कां नाहीं केला ?”

पत्रव्यवहार कोणाशीं करायचा ह्याचा आम्हांला कुठें पत्ता होता ? पण त्याबद्दल कांहीं न बोलतां मीं म्हटलें, “खरेंच. तसें करायला पाहिजे होतें. पण आतां काय ?”

आणि आम्हीं व्यापारी कॉलेजांतील प्रोफेसर असल्यामुळें आम्हीं खाणी पाहणें कसें आवश्यक आहे तें त्यांना सांगितलें.

त्यांनीं टेलिफोन करून नंदीदुर्ग कंपनीचे मॅनेजर बेले ह्यांना तेंच सांगितलें आणि आम्हांला परवानगी मिळवून दिली.

पुन्हा कानडी सौजन्य दिसून आलें. कारण आपली मोटार आम्हांला तिकडे जाण्याकरितां द्यावी असें रंगाचार ह्यांना वाटत होतें. पण गाडी तेथें नव्हती. आम्हीं जेवायला त्यांच्याकडे जावें अशी गुळमुळीत सूचना त्यांनीं केली. बहुधा ह्या बाबतींत घरीं विचारल्याशिवाय त्यांना निश्चितपणें सांगतां येत नसावें. आणि माणूस देऊन आम्हांला नंदीदुर्ग कंपनीच्या ऑफिसांत पाठवलें.

तेथें उंच, सडपातळ, तरतरीत आणि ताठ उभे राहणारे डिसिल्व्हा नांवाचे गोरे गृहस्थ आम्हांला भेटले. त्यांचा चेहेरा करडा होता आणि मिशीच्या जागीं एक पिंगट सुरवंट बसला आहे असें वाटत होतें. त्या मिशीच्या खालून शब्द बाहेर पडत तेदेखील वेंचक, कांटेरी !

त्यांनीं बेले ह्यांच्याकडे नेऊन आम्हांला परवानगी मिळवून दिली. बेले म्हणाले, “तुम्हांला वरचें सगळें पहातां येईल. पण खाणींत उतरतां येणार नाहीं.”

पण आम्हीं थोडी रदबदली केल्यावर त्यांनीं दुपारीं चार वाजतां आम्हांला खालीं नेण्याची सोय करण्याचें आश्वासन दिलें आणि आमचा जीव भांड्यांत (कीं खाणींत ?) पडला.

मग ते म्हणाले, “आमच्या चॅरिटी फंडाला कांहीं द्यावें असें तुम्हांला कदाचित् वाटेल.”

मीं म्हटलें, “मला फार आनंद होईल. मीं काय द्यावें असें आपल्याला वाटतें !”

ते म्हणाले, "आपल्या मर्जीप्रमाणें."

मीं दहा रुपयांची नोट त्यांच्या हातीं देत म्हटलें, "मला वाटतें, पांच रुपये दिल्यास ठीक होईल."

त्यांनीं हो म्हटलें—पण त्यांच्या चेहेऱ्यावर कांहीं तरी सूक्ष्म फरक झाला असावा. म्हणून माझ्या तोंडांतून शब्द आले, "आपणच ठरवा किती घ्यायचे ते."

त्यांनीं दहाहि रुपये घेतले आणि पास घेऊन आम्ही बाहेर पडलों. बाहेर आल्यावर डिसिल्व्हांनीं एका शिपायाला आम्हांला कसें, कुठें न्यायचें तें सांगितलें—तामीळमध्यें. युरोपियन असूनहि त्यांच्या उच्चारांत मुळींच निराळेपणा वाटला नाहीं.

तेवढ्यांत जवळ उभ्या असलेल्या एका ड्रायव्हरनें कानडी पद्धतीप्रमाणें मध्यें तोंड खुपसलें.

तेव्हां डिसिल्व्हा एकदम म्हणाले, "I am giving orders here."

युरोपियन मनुष्य शिस्त कधीं विसरत नाहीं. दुसऱ्याला विसरूं देत नाहीं.

शिपाई आम्हांला घेऊन चालला. बेटा व्यवस्थित इंग्रजीमध्यें बोलत होता. फार काय, इथें खाणींत काम करणारे मजूरदेखील इंग्रजी बोलूं शकतात, असें आम्हांला नंतर आढळून आलें.

त्या मजुरानें आम्हांला सांगितलें कीं तेथें पुष्कळसे कामगार तामिळ आहेत. हे तामिळ लोक मोठे जबरदस्त खरे. सिलोन, ब्रह्मदेश, मलाया, न्यू गिनी, आफ्रिका वगैरे ठिकाणीं हे पसरलेले आहेत. पोटाकरितां हे लोक कितीहि दूरवर जातात आणि मोठे कामसू असतात.

त्यानें आम्हांला एका मोठ्या वर्कशॉपमधून नेलें. तेथें लाकडाचे मोटाले तुकडे कापण्यांत येत होते. खाणींत आधार देण्याकरितां, खाणींतल्या रेल्वेकरितां वगैरे त्यांचा उपयोग होतो असें त्यानें सांगितलें. लोखंडाच्या यंत्रांचेदेखील तेथें निरनिराळे भाग होत होते. अजस्र पाळणे, खडक फोडायचीं यंत्रें, खाणींतल्या आगगाड्या वगैरेंकरितां हे भाग होते.

पहिल्यानें त्यानें आम्हांला सोन्याच्या भट्टीकडे नेलें. तेथें एका अजस्र लोखंडी दरवाज्याच्या गराद्यांतून थोडी बोलाचाल झाली. आंतल्या माणसांनीं आमचा पास नीट तपासून पाहिला आणि मग आम्हांला आंत घेऊन पुन्हा दरवाजा बंद झाला. आंत गेल्यावर एक भला मोटा लालबुंद इंग्लिश मनुष्य

पुढें आला. त्याच्या नजरेंत एखाद्या उनाड शाळकरी मुलाच्या डोळ्यांत असावा तसा मिश्किल भाव होता. हंसून त्यानें हस्तांदोलन केलें. म्हणजे त्याच्या भल्या मोठ्या पंज्यांत कांहीं वेळ आमचे हात लुप्त झाले !

तो म्हणाला, "तुम्ही फार दैववान् आहांत. आतांच मीं एक सोन्याची वीट तयार करीत आहें." आणि त्यानें एका भट्टीवरच्या भांड्यांत उकळणाऱ्या लाल द्रव्याकडे आमचें लक्ष वेधलें. तें द्रव्य त्या भांड्यांत उड्या मारीत होतें.

मीं विचारलें, "त्याची उष्णता किती आहे ?"

तो डोळे मिचकावून म्हणाला, "फार नाहीं, बाराशें डिग्री सेंटिग्रेड. Rather warm. Isn't it ?"

मीं दोन पावलें मागेंच सरकलों आणि हंसलों.

सगळें अंग आच्छादून बागुलबोवा झालेल्या एका माणसानें तो रस लांब गावीनें उचलून साफसूफ केलेल्या जागेवर ठेवलेल्या एका सांच्यांत ओतला. अंगाखांद्यावर सोनें उडूं नये म्हणून ही काळजी ! थोड्या वेळानें त्यानें तो सांचा उपडा केला, तशी एक तांबडी लाल वीट खालीं पडली. तिचा तांबुस रंग जाऊन हळुहळू ती पिवळी होत होती आणि तेवढ्यांत एका लांब काठीनें तिच्या भोंवतालचा काळा मळ तो बागुलबोवासारखा मनुष्य घांसून काढत होता.

वीट जरा थंड झाल्यावर त्यांनीं ती उचलून बाजूला नेली आणि ते तिची आणखी सफाई करूं लागले.

तेवढ्यांत ती वीट ठेवलेली जागा झाडून तिथला सगळा कचरा काळजीपूर्वक गोळा करण्यांत आला. पण तेवढ्यानें त्या इंग्लिश माणसाचें समाधान झालें नाहीं. त्यानें वांकून त्या जागेकडे पाहिलें आणि पुन्हा ती जागा झाडून घ्यायला लावलें.

मीं म्हटलें, "त्या कचऱ्याची इतकी काळजी ?"

तो म्हणाला, "त्यांत सोनें असेल ना !"

कच्च्या सोन्यांत कांहीं रसायनें टाकून तें बाराशें डिग्री सेंटिग्रेडइतक्या उष्णतामानांत उकळलें कीं त्यांतला कचरा असा वेगळा होतो खरा, पण त्या कचऱ्यांतहि थोडें सोनें असतें.

साफसूफ करून त्यांनीं ती वीट आमच्यापुढें आणून ठेवली.

तो म्हणाला, "ही वीट लहानशीच आहे. फक्त सहाशें औंसांची. नेहमीं आम्ही हजार औंसांच्या विटा पाडतों."

मीं विचारलें, "तुम्ही महिन्याला सोनं किती काढतां?"

तो म्हणाला, "अदमासें चव्वेचाळीसशें औंस."

मीं म्हटलें, "बस्स?"

तो हंसून म्हणाला, "लोकांची अशी कल्पना असते कीं, आम्ही खाणींत उतरतों आणि सोन्याचे दगडच्या दगड काढून वर आणतों. पण खरो-खर आम्ही नुसते काळे भुरके दगड वर आणतों आणि अशा एक टन दगडांत सोनें किती असतें, माहीत आहे?"

"किती?"

तो ओठ वांकडे करून म्हणाला, "पाव औंस!"

तें ऐकून सोन्याच्या खाणीविषयींच्या माझ्या कल्पना सगळ्या विरघळून गेल्या. सोन्याच्या खाणींत जाऊन आम्हांला सोन्याचा कणहि दिसणार नव्हता. आणि डोंगर पोखरून खरोखरच हे लोक उंदीर काढीत होते म्हणायचे! उंदीर मात्र सोन्याचा होता.

मीं हंसून म्हटलें, "इथें असें परदेशांत राबत रहाण्यापेक्षां तुम्ही एखादी सोन्याची वीट घेऊन पळून कां नाहीं जात?"

तो डोळे मिचकावून म्हणाला, "ही घेऊन फार लांब पळून जातां येणार नाहीं. पहा बरें ती जरा उचलून."

वीट उचलणें एकंदर बरेंच जड काम होतें. वासंतीला तर ती उचलेच ना!

तो म्हणाला, "जपून हं! एका पारशी बाईनें अशीच वीट आपल्या पायावर पाडून पाय मोडून घेतला."

तिची सोन्याची हौस पुरी फिटली असावी. आणखी कांहीं पार्शी बाया इकडे पाठवून द्याव्या असा दुष्ट विचार माझ्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं.

नंतर तो पुन्हा डोळे मिचकावून म्हणाला, "पाहिलेंत? ही वीट घेऊन नाहीं पळून जातां यायचें. पळवायचे म्हटले तर असे बारीक तुकडे पळवले पाहिजेत."

आणि त्यानें एक सोन्याचा लहानसा तुकडा गंमतीनें हवेंत उडवून झेलला.

त्याचा निरोप घेऊन आम्ही दुसऱ्या एका इमारतीजवळ आलों. तेथें यंत्रांचा एवढा प्रचंड धडधडाट चालला होता कीं, संभाषण जवळ जवळ अशक्य होतें. दाराशीं थोडा वेळ खोळंबा झाल्यानंतर एक बुटकासा इंग्लिश माणूस बाहेर आला आणि त्यानें आम्हांला एका कागदावर सही करायला सांगितलें.

कागदावर लिहिलेलें होतें कीं, 'कंपनीच्या कारखान्यांत वगैरे फिरतांना जर

आम्हांला दुखापत वगैरे झाली तर त्याबद्दल आम्ही कंपनीला जबाबदार धरणार नाहीं."

आम्हीं सह्या केल्या आणि त्या अधिकाऱ्याला म्हटलें, "एखाद्या खाणींत नाहीं तर यंत्रांत आम्हांला ढकलून द्यायचा तर तुमचा विचार नाहीं ना?"

तो हंसून म्हणाला, "छे! पण आपल्याच निष्काळजीपणानें इजा करून घेऊन, कंपनीवर नुकसानभरपाईचा खटला भरणारे लोक असूं शकतात."

आंत गेल्यानंतर तर आवाज एवढा मोठा झाला कीं, तो अधिकारी माझ्या कानांत जवळ जवळ तोंड खुपसून मोठ्यानें ओरडून मला माहिती सांगत होता, त्यांतलें मला अक्षरहि समजेना.

मीं समजलें नाहीं अशी खूण केली तेव्हां तो आणखी मोठ्यानें माझ्या कानांत ओरडला. पण परिणाम शून्यच! शेवटीं मीं समजल्यासारखें चेहेऱ्यावर हास्य आणलें, आणि ही फसवणूक सबंध वेळ चालू होती. तो अधिकारी मोठा उत्साही होता, आणि त्या कारखान्यांत आम्हांला सर्व ठिकाणीं फिरवीत होता. पण आम्हांला असें झालें होतें कीं केव्हां एकदां ह्या कटकटींतून बाहेर पडतों.

तेवढ्यांत "तो काय सांगतोय् त्यांतलें एक अक्षरहि मला समजत नाहीं," असें हलक्या आवाजांत प्रधानला सांगण्याचा मीं प्रयत्न केला!

बाहेर पडल्यावर मीं शांतपणें त्या बुटक्या अधिकाऱ्याला सांगितलें, "तूं सांगत होतास तें मला मुळींच समजलें नाहीं. तेव्हां पुन्हा सगळें सांग!"

त्यानें कमरेवर हात ठेवले आणि डोळे फिरवीत तो म्हणाला, "Well! What was I shouting myself hoarse for?" मीं म्हटलें, "It was a good effort. I didn't want to discourage you."

आम्ही दोघे हसलों. आणि त्यानें पुन्हा सगळें सांगितलें.

त्या कारखान्यांत खाणींतून काढलेले दगड आणले जात होते आणि राक्षसी यांत्रिक हातोड्यांनीं त्यांचा भुगा केला जात होता. त्या भुग्यांत कांहीं पोटॅशियम सायनाइडसारखीं द्रव्यें घालून त्यांत पाणी ओतलें जात होतें. त्यामुळें सोनें आणि माती वेगळीं व्हायला मदत होत होती. नंतर तो सगळा चिखल घोंगड्यां-वरून अगर तत्सम जाड कापडावरून सावकाश वहात जात होता. असा तो वहात असतांना सोनें जड असल्याकारणानें खालीं बसत होतें आणि त्या घोंगड्यांत अडकून रहात होतें. थोड्या थोड्या वेळाच्या अंतरानें त्या घोंगड्या तेथले लोक एका मोठ्या पिंपांत बुचकळवून काढीत होते आणि त्यांतलें सोनें त्या

पिंपाच्या तळाशीं गोळा होत होतें. त्या घोंगड्या त्या पिंपांत बुचकळणाऱ्या कामगारांना अक्षरशः सोन्याची आंघोळ घडत होती. अर्थात् त्यांच्या कपड्यांत सोनें अडकून घरीं जाऊं नये म्हणून त्यांना कंपनीनें दिलेले ओव्हरऑल वापरावे लागत होते.

मीं त्याला विचारलें, "पूर्वीचे लोक सोनें कसें काढीत असत?"

तो म्हणाला, "असेंच. त्यांच्या पद्धतींत आम्हीं कांहीं विशेष सुधारणा केलेली नाहीं. त्यांच्याकडे एवढे मोटाले यांत्रिक हातोडे नव्हते इतकेंच. ते पोटॅशियम सायनाइडऐवजीं पारा वापरीत असत."

सोनें काढण्याची पद्धत आणि सोन्याची हांव ह्या बाबतींत पूर्वीच्या लोकांपेक्षां आपण कांहीं पुढारलेले आहोंत असें म्हणतां येणार नाहीं.

आम्ही जायला निघालों तेव्हां तो बुटका इंग्लिश मनुष्य ओरडून म्हणाला, "Remember me to Bombay Remember. me to Hanging Garden. I am coming there in 1953. Good Bye!" आणि पळत पळत तो आंत निघून गेला.

त्या आवाजांत बेट्याचे कान कसे शाबूत राहिले होते कोण जाणे!

नंतर आम्ही खाणींतली हवा थंड करायचें यंत्र पहायला गेलों. यंत्राची कल्पना सोपी आहे. खारें पाणी अमोनियाचा उपयोग करून अतिशय थंड करून एका मोठ्या चेंबरमधल्या नळ्यांच्या गुंतागुंतींतून फिरवतात आणि अशा प्रकारें थंड झालेल्या त्या नळ्यांच्या फटींतून एका मोठ्या पंख्यानें निर्माण केलेला वारा जातो, जातांना थंड होतो आणि खाणींत उतरतो. खाणींतली गरम हवा दुसऱ्या तोंडांतून वर येते. खाणीला सोयीनुसार अनेक तोंडें पाडलेलीं असतात हें सांगायला नकोच.

गेल्या दहा-बारा वर्षांतच तें यंत्र बसविण्यांत आलें आहे. तें यंत्र नव्हतें तेव्हां खाणींत अतिशय उष्मा व्हायचा. कारण जसें खालीं जावें तशी उष्णता वाढते. शिवाय वारा जायला कांहींच सोय नसते. त्या भयंकर उष्णतेंतच अनेक वर्षें कामगारांनीं काम केलें. आतां मात्र वर थंड नसतें इतकें खाणींत थंड असतें. पण म्हणे असा थंड वाऱ्याचा झोत सारखा अंगावर येणें प्रकृतीला अपायकारक असतें.

ह्या यंत्राची देखभाल करणारे गृहस्थ आमचें आपसांतलें बोलणें ऐकून मोडक्या तोडक्या मराठींत आमच्याशीं बोलूं लागले, तेव्हां आम्हांला सानंद

आश्चर्य वाटलें.

आम्हीं विचारलें, "आपण महाराष्ट्रीय आहांत काय?"

"होय, पण मी तंजोरकडचा आहें. तेथें पुष्कळ महाराष्ट्रीय कुटुंबें स्थाईक झालेली आहेत."

"आपलें नांव काय?"

तो म्हणाला, "पेशवा. आमचें घराणें ही पेशवे घराण्याची एक उपशाखा. पेशवाई गेल्यावर आम्ही इकडे येऊन राहिलों."

मीं त्याच्याकडे निरखून पाहिलें. पण त्याच्या चेहेऱ्यावर पहिल्या बाजीरावाचें काय पण दुसऱ्याचेंहि तेज दिसलें नाहीं. एखाद्या कुटुंबांत एकामागून एक कर्तबगार पुरुष निर्माण व्हावे आणि मग ती कर्तबगारी नष्ट व्हावी ह्यामागें कुठचा सृष्टिनियम आहे ह्याविषयीं मला फार कुतूहल वाटतें.

तेथून बाहेर पडलों. तेवढ्यांत खाणीला एक नवीन तोंड पाडीत असल्याचें दिसलें. तेथें एक इंग्लिश तरुण मोठ्या ऐटींत कशाला तरी रेलून उभा होता. त्याच्या डोक्यावर पत्र्याची टोपी होती आणि तींत एक विजेचा दिवा बसवलेला होता.

आम्हांला पाहून तो हात हलवीत म्हणाला, "Hey! Would you like a ride down in a bucket?"

"In a bucket?" मीं विचारलें.

तो रुंद हास्य करून म्हणाला, "Yes! You will get quite a good shake up."

मीं ताबडतोब तयारी दर्शविली. पण तेवढ्यांत दुसरा एक अधिकारी म्हणाला, "नको. बाहेरच्या माणसांना उगीच धोक्यांत कशाला टाकायचें?"

तो तरुण खांदे उडवून माझ्या बायकोला म्हणाला, "Bad luck! He might have brought up a ring for you."

इंग्लिश लोक साधारणतः घुमे व इतरांशीं न मिसळणारे असतात. पण इथले इंग्लिश लोक सगळेच मोठे खेळकर वृत्तीचे आणि बोलके असल्याचें आम्हांला आढळून आलें.

रंगाचार ह्यांचें आमंत्रण गुळमुळीत असल्यामुळें आम्ही बाहेर एका हॉटेलांत जाऊन जेवण घेतलें. पुन्हा एकदां दरबार हॉटेल आमच्या नशिबीं आलें. त्याचें वैशिष्ट्य इतकेंच कीं त्याच्या पाटीवर डोसाचें स्पेलिंग Thosa असें केलेलें होतें!

इथले लोक दोन आणे देऊन ठोसे मारून घेतात कीं काय, असा पोरकट विनोद करून आम्ही हसलों. प्रवासांत कुठचाहि विनोद खपतो.

जेऊन परत आल्यावर आम्हांला कळलें कीं, रंगाचार ह्यांचा मनुष्य आम्हांला न्यायला आला होता आणि बराच वेळ वाट पाहून निघून गेला होता. थोड्या वेळानें त्यांचे चिरंजीव आले आणि आतां दुपारीं चहाला आलेंच पाहिजे, चार वाजतां न्यायला येतों, असें मोठ्या आग्रहानें आमंत्रण देऊन गेले.

आमच्या खाणींत जायच्या पासवर सही होईपर्यंत आम्ही डिसिल्व्हा ह्यांच्याबरोबर गप्पा मारल्या. त्यांनीं सांगितलें कीं त्या खाणींत सहा हजार कामगार असतात. त्यांना रोजीं रु. १–१ आणा मजुरी मिळते; शिवाय महागाई भत्ता मिळतो—पस्तीस रुपये. म्हणजे एकंदर दारिद्र्यच.

त्यामुळें मीं म्हटलें, "मग येथें संप वगैरे होत असतील."

ते म्हणाले, "होतात तर. पण ते फारसे यशस्वी होत नाहींत. कारण कामगार फार तग धरूं शकत नाहींत. शिवाय येथें इतर कामगार मिळणें सोपें असतें.

हेंच तें मार्क्सचें Industrial Reserve Army !

मीं विचारलें, "येथें कम्युनिस्ट असतीलच ! "

ते म्हणाले, "Plenty ! सोशॅलिस्टदेखील आहेत."

मीं म्हटलें, "येथल्या कामगारांच्या कार्यक्षमतेविषयीं काय अनुभव आहे ?"

ते म्हणाले, "पूर्वी इथली मजुरी इतकी थोडी होती कीं कंपनीला कार्यक्षमतेचा असा विचार करावाच लागला नाहीं. पांचपन्नास माणसें कामावर जास्त असलीं तरी चालत असे. पण आतां मात्र परिस्थिति बदलते आहे."

अखेर आम्हीं विचारलें, "तुमचा नफा किती टक्के ?"

ते म्हणाले, "साडेसहा टक्के ?"

मीं म्हटलें, "बस्स ? अहो, वनस्पती तुपाचे कारखानदार ह्याहून जास्त पैसे कमावतात."

ते म्हणाले, "एके काळीं आम्हींदेखील ऐशीं टक्के नफा वांटला आहे. १९३४ सालींदेखील नफा २० टक्के होता. पण आज सरकारला इतक्या प्रकारें आम्हांला पैसा द्यावा लागतो कीं, आतां नफा साडेसहा टक्क्यांवर येऊन ठेपला आहे ! "

मीं विचारलें, "येथें अधिक सोनें मिळूं शकणार नाहीं का ?"

ते म्हणाले, "हा टापू सोन्यानें भरलेला आहे. पण साडेसहा टक्के नफा मिळत असल्यावर कोण पैसे गुंतविणार ?"

हें सगळें अर्थात् त्यांचें म्हणणें. त्याची शहानिशा करायला मला वेळ नव्हता आणि माहितीशिवाय तें शक्यहि नव्हतें.

खाणीच्या मुख्य तोंडावर कांहीं काम चाललें असल्यामुळें आम्ही दुसऱ्या एका तोंडांतून खालीं गेलों. खाणीच्या तोंडाशीं उंच अगडबंब लोखंडी बांधकाम असतें. त्याच्या टोकांवर दोन चक्रें गरगरां फिरत असतात. हीं चक्रें तोंडांतून वरखालीं जाणाऱ्या लिफ्टचीं. इथल्या लिफ्टला केज (Cage) म्हणतात. दिसतेदेखील ती एखाद्या पिंजऱ्यासारखी. आणि तिच्यांतून मळकटलेले मजुरांचे तांडे वरखालीं जात असतात. ह्या मजुरांच्या डोक्यावर टिनच्या नाहीं तर बांबूच्या टॉप हॅटसारख्या टोप्या असतात. त्यांच्याजवळ दिवे असतात. कारण जेथें खोदकाम चाललेलें असतें तेथें विजेचे दिवे नसतात. आतां मात्र टोपींत बॅटरीचे दिवे बसविण्याची पद्धत सुरू होत आहे.

ह्या खाणी दहा हजार फूट म्हणजे जवळ जवळ दोन मैल खोल आहेत. जगांत दुसऱ्या इतक्या खोल खाणी नाहींत असें म्हणतात. आमच्यासारख्या पहायला आलेल्यांना मात्र चार हजार फुटांहून जास्त खालीं नेत नाहींत. एक जुना जाणिता इंग्रजी बोलणारा मजूर तेथल्या अधिकाऱ्यानें आम्हांला बरोबर दिला. आपल्याला कांहीं काम असल्यामुळें येतां येत नाहीं, ह्याबद्दल त्यानें पुन्हा पुन्हा दिलगिरी व्यक्त केली. अगदीं कानडी पद्धतीनें !

आम्ही केजमध्यें चढलों आणि इशारा मिळतांच आमची ती प्रचंड केज धडधडत खालीं जाऊं लागली. तोल जाऊं नये म्हणून आम्हीं एका लोखंडी दांड्याला घट्ट धरून ठेवलें होतें. ताबडतोब अगदीं दाट काळोख झाला. अगदीं जवळ असलेली वासंतीदेखील मला दिसेना. वासंतीनें मला हात लावून मी आहें अशी खात्री करून घेतली आणि त्या मैत्रीच्या स्पर्शानें आम्हांला लहान मुलासारखें हसूं आलें. माणसांना जेव्हां विश्वासानें निर्भयपणें एक-मेकांना असा मैत्रीचा स्पर्श करतां येत नसेल, तेव्हां माणसें किती भयाण, एकाकी आणि अर्थशून्य जीवन जगत असतील ?

त्या काळोखांत आम्ही क्षणाक्षणाला शेकडों फूट खालीं कोसळत होतों. धडधडाट, काळोख, आपण खालीं जात आहोंत ही जाणीव. कांहीं वेळानें आपण खालीं जात आहोंत कीं वर जात आहोंत हें समजेनासें झालें. नुसत्या

गतीची जाणीव शिल्लक राहिली. आगगाडींतदेखील डोळे मिटून पडलें म्हणजे असेंच होतें, हा अनुभव बहुतेकांना आला असेल. मधूनच थंड पाणी डोक्यावर ठिपकत होतें. त्यामुळें दचकायला होत होतें. कानांत गुडद्या बसूं लागल्या. डोकें जड झालें. कांहींसा निरुत्साहीपणा अंगांत आला. हवेच्या वाढत्या दाबामुळें बहुधा असें झालें असेल. मधूनच खाणीचीं छोटीं आडवीं तोंडें लागत होतीं. त्यांतले दिवे दिसत होते आणि अदृश्य होत होते.

अवघ्या दोन मिनिटांत आम्ही दोन हजार फूट खालीं गेलों. मग त्या केजमधून उतरून जरा चालत गेलों आणि दुसऱ्या एका केजपाशीं आलों. आम्ही आंत शिरणार इतक्यांत वरून टेलिफोन आला कीं, खुद्द साहेबच आम्हांला खाण दाखवायला येणार आहेत. साहेब येईपर्यंत पंधरा मिनिटें मोडलीं. अखेर ते आले. आपल्याला काम उरकून येतां आलें ह्याचा त्यांना आनंद वाटला. ह्या कानडी लोकांचा एकंदर उत्साह दांडगा ह्यांत शंका नाहीं.

दुसऱ्या केजमध्यें बसून आम्ही आणखी दोन हजार फूट खालीं गेलों. ही जरा सावकाश चालत होती, आणि कांहीं वेळ तिरकी जाऊन मध्येंच सरळ होऊन मग खालीं जात होती. त्यामुळें आतां तोल सांवरून बसणें जरा कठीणच होतें. समजा, पोलादी दोर तुटून केज खालीं कोसळली अगर मध्येंच बंद पडली तर काय होईल, असा विचार डोक्यांत आल्यावाचून राहिला नाहीं.

खाणींत गेलें म्हणजे आगगाडीच्या मोठ्या बोगद्यांतून फिरल्यासारखें वाटतें. आंत मालाची नेआण करण्याकरितां छोट्या आगगाड्या आहेत, विजेचे दिवे आहेत आणि थंड वाऱ्याचा प्रवाह सारखा वहात असतो. पण जिथें खोदकाम चालतें तिथें दिवे नसतात, आगगाडी नसते आणि थंड वाराहि नसतो. तिथें घामानें डबडबलेले आणि धुळीनें मळकटलेले कामगार हवेच्या दाबानें चालणारीं खोदण्याचीं यंत्रें घेऊन खडकाला भोंकें पाडतांना पाहिलें कीं कसेंसेंच वाटतें. तीं धडाडणारीं यंत्रें माणुसकीलादेखील कुठें तरी भोंकें पाडीत आहेत असें वाटतें. ह्या कामगारांना ते जितका खडक खोदतील तितक्या प्रमाणांत वेतन मिळतें. हीं भोंकें पाडून त्यांत दारू भरतात आणि मग ती लांब वात पेटवून उडवून देतात. ती वात पेटत दारूपर्यंत पोंचायला दोन तीन मिनिटें लागतात. तेवढ्या वेळांत कामगार दूर पळून जातात. दगडांत सोनें असलें म्हणून त्यानें कपाळमोक्ष होत नाहीं असें थोडेंच आहे ? इथल्या कामगारांच्या इंग्लिशच्या ज्ञानानें आम्ही चकित झालों. मी कुठें तरी धोक्याचे ठिकाणीं जात आहें असें

वाटून वासंती ओरडली. तेव्हां एक कामगार शांतपणें तिला म्हणाला, " Don't get excited. "

खाणींतल्या ह्या भुयारांची लांबी कित्येक मैल असेल. त्यांत वावरतांना एखाद्या ऐतिहासिक कादंबरींतलीं आम्ही पात्रें आहोंत असें वाटत होतें. आणि दिव्याच्या झोतांत तीं धडाडणारीं खोदण्याचीं यंत्रें चालविणारे कामगार शत्रूंचीं कोठारें अगर तटबंद्या गुप्तपणें उडवून देणारे धाडसी वीर आहेत असा भास करून घेतां येत होता.

इकडून तिकडे फिरतांना कामगारांच्या काम चुकवायच्या पद्धतीदेखील दिसून आल्या. एक तर खुशाल झोंपला होता. आमच्याबरोबरच्या अधि-काऱ्यानें त्याच्या पृष्ठभागावर थप्पड मारून त्याला जागें केलें. कुठेंतरी दूर सुरुंग उडत होता म्हणून दोन चार कामगार काम सोडून बसले होते. हें असें चालायचेंच. कम्युनिस्ट राजवटींत असें होणारच नाहीं असें म्हणणारे लोक स्वप्नसृष्टींत वावरत असले पाहिजेत.

ह्या खाणींत काम करणाऱ्या लोकांना कांहीं विशिष्ट प्रकारचा रोग होतो म्हणतात आणि त्यामुळें हे फार वर्षें काम करूं शकत नाहींत. परदेशांत अशा occupational diseases च्या बाबतींत संशोधन चालतें, उपाययोजना होते. आपल्या इकडे तसें कांहीं होत असल्याचें ऐकिवांत नाहीं.

ह्या खाणींतून कधीं कधीं आगी लागतात. आंतलीं लाकडें, आंत सांठवलेली दारू वगैरे गोष्टींनीं पेट घेतला कीं ही आग पसरते. कोळशाच्या खाणींतून निघतो तसा विषारी ज्वालाग्राही वायु मात्र ह्या खाणींतून निघत नाहीं. आग विझवायला आंत साधनें नसतात. शिवाय ती विझवायला गेलेलीं माणसें आंत गुदमरून मरण्याचा संभव फार. ह्या आगी पसरूं नयेत म्हणून खाणींचे लहान लहान कप्पे पाडण्यांत आलेले आहेत. लोखंडी दारें बंद करून हे कप्पे सीलबंद करतां येतात आणि त्यामुळें एका कप्प्यांतली आग दुसऱ्या कप्प्यांत पसरूं शकत नाहीं.

आग लागली तर येथें इशारा मोठ्या गंमतीदारपणें देतात. खालीं जाणाऱ्या वाऱ्याच्या झोतांत निलगिरी तेलाची बाटली उपडी करतात. त्या झोताबरोबर तो वास सर्वत्र पसरतो आणि तो वास आला कीं कामगार काम सोडून केजकडे पळत सुटतात किंवा आग विझविण्याकरितां उपाय योजतात.

एकदां आग पसरली कीं ती विझली कीं नाहीं तें वरून समजणें मोठें

कठीण असतें. कारण माणसें खालीं सोडलीं तर गुदमरून अगर भाजून मरायचीं. म्हणून पहिल्यानें पक्षी अगर ससे असले प्राणी पिंजऱ्यांतून खालीं सोडतात आणि कांहीं वेळानें त्यांना वर आणतात. ते प्राणी जर मेले नसले अगर त्यांच्यावर कांहीं वाईट परिणाम झाला नसला तर मग माणसांना खालीं सोडतात. हीं माणसें आंत जाऊन पहाणी करतात. हें विशेष धोक्याचें काम पत्करणाऱ्या लोकांना दर फेरीमागें चांगली मजुरी मिळते.

हें सगळें ऐकलें आणि मग किती तरी वेळ ते पिंजऱ्यांतून खालीं सोडले जाणारे असहाय प्राणी मला दिसत होते.

आम्हांला पांचची गाडी पकडायची होती, आणि आम्हीं त्या अधिकाऱ्याला तसें सांगितलेंहि होतें. पण उत्साहानें तो आम्हांला जिकडे तिकडे फिरवीत होता. अखेर गाडीला वीसबावीस मिनिटें असतांना आम्ही केजजवळ आलों. पण दुर्दैवानें त्या केजमध्यें शिरतांना आगगाडीचा एक डबा रुळावरून घसरला. त्याला पुन्हा स्थानापन्न करीपर्यंत जवळ जवळ दहा मिनिटें गेलीं. आणि आम्ही वर आलों तेव्हां गाडीला अवघीं चार पांच मिनिटें होतीं.

आम्ही वर आलों हें खरोखर आम्हांला समजलेंच नाहीं. कारण खाणींतल्या उजेडाची संवय झालेल्या आमच्या डोळ्यांना सूर्यप्रकाश कृत्रिम, नळींतल्या उजेडासारखा वाटूं लागला.

केजमधून बाहेर पडून आम्ही त्या अधिकाऱ्याचे उडते आभार मानून पळतच सुटलों. रंगाचार यांचे चिरंजीव आम्हांला चहाला न्यायला आले होते. ते आग्रह करूं लागले. रात्रीं येथेंच रहा म्हणूं लागले. त्यांचें कानडी सौजन्य पाहून त्यांना दुखवायचें जिवावर येत होतें. पुन्हा पुन्हा त्यांच्याजवळ दिलगिरी व्यक्त करीत आम्ही पळत होतों. तेहि आमच्याबरोबर पळत होते. आणि गाडी स्टेशनांत येऊन शिट्या मारीत होती. कसेबसे आम्ही गाडींत शिरलों. वासंतीदेखील वीरश्रीनें पळत होती. ती येईपर्यंत ड्रायव्हरनें गाडी थांबवली. तेवढ्यांत आम्हीं तिकिटें काढलीं. धावत्या गाडींत उडी मारून रंगाचार ह्यांच्या चिरंजीवांना हात केला आणि मग बाकावर धापा टाकीत कोसळलों.

गाडींत आम्हांला एक कानडी वकील भेटले. ते खाणींतल्या मजुरांच्या वतीनें पुष्कळ दावे चालवीत असल्यामुळें त्यांना खाणींच्या कारभाराची बरीच माहिती होती. ते म्हणाले कीं ह्या कंपन्या कामगारांना फार कमी पगार देतात आणि गोऱ्या अधिकाऱ्यांना मात्र गलेलठ्ठ पगार देतात, भरपगारी रजा देतात

आणि इतर पुष्कळ सुखसोयी त्यांना देतात. त्या खर्च फुगवतात आणि फायदा थोडा असल्याचें दाखवतात. असें करून सरकार कर कमी करील असें त्यांना वाटतें. ते असेंहि म्हणाले कीं ह्या कंपन्या आतां हळुहळू हिंदी लोकांच्या ताब्यांत येत आहेत. सोनें लांबविण्याचे प्रकारहि बरेच होतात असें त्यांनीं सांगितलें. एकदां टॉर्चमध्यें आणि एकदां जेवणाच्या डब्यांत भरून सोनें नेण्याचा प्रयत्न झाल्याचें त्यांनीं सांगितलें. वकिलाइतक्या व्यवहारांतल्या खांचाखोचा कोणालाच माहीत नसतात.

बंगारपेट स्टेशनवर आम्हांला तास दीड तास घालवायचा होता. स्टेशन-वरच्या हॉटेलांतले सगळे जिन्नस आम्हीं खाल्ले तरी फक्त अर्धा तासच सपला, आणि मग स्टेशनवरच्या सगळ्या माशा मारून संपल्या तरी आणखी अर्धा तासच खर्च झाला, तेव्हां अखेर आम्हीं फलाटावर फेऱ्या मारूं लागलों. तेथें अचानकपणें पुन्हा गंभीर, तरतरीत चेहेऱ्याचे आणि सुरवंटा-सारख्या मिशीचे डिसिल्व्हा दिसले.

मिशीआडून ते हसले. तेव्हां आम्ही पुढें होऊन त्यांच्याशीं गप्पा मारूं लागलों. मद्रासहून येत असलेल्या आपल्या मुलीला न्यायला ते आले होते.

आम्हीं त्यांना विचारलें, "तुम्ही असे उन्हांतल्या बांकावर का बसलां ? वेटिंगरूममध्यें कां नाहीं बसत ?"

ते म्हणाले, "तेथें सगळें अस्वच्छ असतें. ढेकूण असतात. हें उन्हांतलें बांक स्वच्छ तरी असतें. इथें कोणी बसत नाहीं."

आपल्या लोकांची अस्वच्छता परकीयांना अशी टोंचते. आमची कल्पना होती कीं ते इंग्लिश असावेत. पण ते ऑस्ट्रेलियन होते. आम्हीं त्यांना विचारलें, "तुमचा श्रीमंत देश सोडून तुम्ही इथें कसे आलांत ? इथले अँग्लो-इंडियन उलट तिकडे जात आहेत."

ते म्हणाले, "नोकरीनिमित्त मी पुष्कळ फिरलों आहें आणि ह्या खाणींत पूर्वी पुष्कळ ऑस्ट्रेलियन लोक होते."

आम्हीं विचारलें, "मग ते कां गेले ?"

डिसिल्व्हा म्हणाले, "ह्या इंग्लिश लोकांचें आणि त्यांचें पटलें पाहिजे ना ? हे इंग्लिश लोक मोठे स्वार्थी असतात. मिळेल तितका पैसा त्यांना शोषून घ्यायचा असतो. आणि सगळें आपल्या मनासारखें व्हावें असें त्यांना वाटतें."

ते पुढें म्हणाले, "आमच्या ऑस्ट्रेलियन लोकांना ह्या मजुरांना इतका

कमी पगार मिळावा हें आवडेना. ते म्हणत, आम्ही न्याहारीला जेवढ्या पैशांची अंडीं खातों, तेवढा ह्यांना पगारहि मिळत नाहीं. हें चालायचें नाहीं. ते मजुरांची कड घेऊन भांडूं लागले. तेव्हां त्यांची हलुहलू उचलबांगडी करण्यांत आली."

आपल्या लोकांविषयीं बोलतांना डिसिल्व्हा खुलले आणि एरवीं अबोल असणारे ते गृहस्थ आमच्याशीं खूप मोकळेपणानें बोलले.

तेवढ्यांत गाडी आली आणि आम्ही यथावकाश हॉटेलवर पोहोंचलों. आंघोळ केली, जेवण केलें आणि "उद्यां मात्र मुळींच दगदग करायची नाहीं," असा घोर निश्चय करून ताणून दिली.

## :४: विमानांचा कारखाना

सकाळींच उठून धावपळ करीत गाडी गांठायची हा आमचा क्रमच झाला होता. धावपळीनें दिवसाची सुरवात करणें हें रानटीपणाचें आहे, असें आमचें तिघांचेंहि ठाम मत असल्याकारणानें हा क्रम आम्हाला बिलकुल नापसंत होता. आणि म्हणून शुक्रवारीं (३१ मार्च) तरी सकाळीं कांहींहि करायचें नाहीं असा निश्चय आम्हीं झोपतांना केला होता.

"खबरदार सकाळीं ओरडलास तर!"

"याद राखून ठेव दार ठोकलेंस तर!" अशा धमक्या एकमेकांना देऊन आम्ही झोपलों होतों. रात्रीं हवा कशी थंड होती. त्यामुळें झोपेची लांबीरुंदी वाढायला बराच वाव होता. सकाळीं चांगलीं उन्हें पडल्यावरच जाग आली. जाग आल्यावर तोंडावर उजेड येतो म्हणून दुसरीकडे तोंड वळवून झोपलों. थोड्या वेळानें आपण फार वेळ झोपलों अशी शंका मनाला कुरतडूं लागल्यामुळें "आतां उठलेंच पाहिजे का?" असा प्रश्न वासंतीला केला आणि निःशंक मनानें पुन्हां झोपीं गेलों. त्यानंतर "आतां मात्र उठलेंच पाहिजे बरें का!" असें आवेशानें म्हणून मी बिछान्यांत उठून बसलों आणि मग हाताच्या ब्रॅकेटवर डोकें सावरून उशीवर रेललों. अखेर "What nonsense!' असें स्वतःवर किंचाळून बिछान्यावरून निर्धारानें उठलों. तोंड धुऊन होईपर्यंत तो आवेश टिकला. आणि मग कोचाच्या गादींत शक्य तितकें रुतून बसत मीं ओरडूं लागलों, "अरे चहा. Tea, dear man, tea! अरे प्रधान, ते नोकर सगळे गेले कुठें? हुडकून काढ त्यांना."

थोड्या वेळानें दाराच्या फटींतून एका नोकराचें मुंडकें आंत डोकावलें आणि विचारूं लागलें, "साब, कॉफी?"

तें ऐकून आम्ही त्याच्यावर संतप्त झालों. आणि ओरडलों, "कॉफी नहि मंगता. चाय लाव. Bring tea. चाय चाय. Do you understand?"

मग जरासा तुरट लागणारा चहा त्यानें आणला आणि बरोबर दोन दोन प्रशस्त, दोन्ही बाजूंनीं बशीबाहेर लोंबणारे डोशे! कुरकुरीत, आंबटसर!

अशी न्याहारी झाल्यावर मन कसें प्रसन्न झालें. कोचाच्या गादींत मी

अधिकच रुतलों. सिगरेट शिलगावली. गुदगुल्या करणारीं वर्तुळें अंगांतून धावूं लागलीं.

बंगलोरच्या ह्या हॉटेलांतल्या खोल्या चांगल्या प्रशस्त होत्या. आंत सोफा सेट, आरामखुर्च्या, ड्रेसिंग टेबल वगैरे भरपूर फर्निचर होतें. आणि तेथले नोकर तर अतिशय तत्पर होते. पुन्हा पुन्हा त्यांचीं मुंडकीं आमच्या खोल्यांत डोकावत आणि काय पाहिजे अशी पृच्छा करीत. जेवण मात्र तितकेंसें चांगलें नव्हतें. आणि विजेचे पंखे नव्हते. पण बंगलोरमध्यें विजेचे पंखे आम्हांला कुठेंच आढळले नाहींत. तेथील हवा म्हणे बाराहि महिने इतकी थंड असते कीं, पंख्याची गरजच भासत नाहीं. दुपारीं तेथें उकाडा होत असल्याचा अनुभव आम्हांला आला. आणि तसें आम्हीं तेथल्या लोकांना सांगितलें. तेव्हां आम्हांला उत्तर मिळालें, "अलीकडे बंगलोरची हवा उष्ण झाली आहे खरी." गेल्या युद्धांत सैनिकांनीं आजुबाजूची झाडी तोडल्यामुळें असें झालें, असें कांहींचें म्हणणें पडलें. हवा बदलते आहे खरी, इतकेंच पुटपुटून कांहीं जण गप्प बसले. "This year it is particularly hot" असें म्हणणाऱ्यांची संख्या नेहमींप्रमाणेंच मोठी होती. एक पंजाबी गृहस्थ मात्र निर्भीडपणें टासून म्हणाले, "ह्या लोकांचें काय म्हणणें असेल तें असो. पण गेलीं कांहीं वर्षें मी पहातांय्. बंगलोरला उन्हाळ्यांत असेंच उकडतें."

आळस गेल्यावर आम्हीं हिंदुस्थान एअरक्रॅफ्ट फॅक्टरीच्या परसोनेल ऑफिसरला टेलिफोन केला आणि फॅक्टरी पहाण्याची परवानगी मागितली. ते गृहस्थ आढेवेढे घ्यायला लागले. आम्हीं आधीं पत्रव्यवहार करायला पाहिजे होता, असें त्यांनीं सांगितलें. आयत्या वेळेला तुमची सोय कशी करायची, असा प्रश्न त्यांनीं उपस्थित केला. हें सगळें अर्थात् ठीक होतें. पण मुंबईला राहून पत्रव्यवहार करायचा म्हणजे माहिती पाहिजे. आणि आपण अमक्या ठिकाणीं केव्हां पोहोंचूं हें कळवणें कठीण असतें.

असो. आम्हांला वादविवाद करायचा नव्हता. परवानगी काढायची होती. तेव्हां मी ठराविक शस्त्र काढलें. आम्हीं गॅझेटेड सरकारी नोकर आहोंत, असें त्या अधिकाऱ्याला शक्य तितक्या महत्त्वपूर्ण आवाजांत सांगितलें. गॅ-झे-टे-ड ! पिवळ्या बुकांत नांव छापून आलेले ! ह्यामुळें तो जरा दबकला. तेवढ्यांत मीं सांगितलें कीं, आम्ही कॉमर्स कॉलेजांतले प्रोफेसर आहोंत—सिडनहॅम कॉलेजमधले.

ह्यानंतर त्या गृहस्थांना कांहीं बोलणेंच शक्य नव्हतें. त्यांनीं खास व्यक्ती म्हणून आम्हांला परवानगी दिली. पण कांहींशा नाखुषीनें. इतक्या सहजपणें आपण परवानगी दिली हें त्यांना बरें वाटेना म्हणून ते म्हणाले,

"I am afraid I cannot permit your wife to visit our factory. We don't admit woman visitors. You see?"

ह्यांत मला कांहींच अर्थ वाटला नाहीं. आपला आब राखण्याकरितांच ही अट त्यांनीं घातली होती, हें स्पष्टच दिसत होतें. तेव्हां वासंतीला घरीं राहून एक झकपैकीं झोप काढण्याची सूचना देऊन आम्ही निघालों.

माझ्या एकंदर प्रवासांत मला असें आढळून आलें कीं, मी गॅझेटेड सरकारी नोकर आहें आणि सिडनहॅम कॉलेजमधला प्राध्यापक आहें असें महत्त्वपूर्ण आवाजांत सांगितलें कीं, बऱ्याच आडकाठ्या दूर होत आणि बंद असलेले बरेचसे दरवाजे उघडत. 'Open Sesame' सारखा ह्या दोन गोष्टींचा उच्चार ठरत होता. जें पिवळें सरकारी गाजिट उघडायलादेखील मीं घाबरतों त्याला इतकें महत्त्व प्राप्त झालेलें पाहून हसूं आल्यावांचून राहिलें नाहीं.

हिंदुस्थान एअरक्रॅफ्ट फॅक्टरीच्या स्वतःच्या बसगाड्या आहेत. नोकर वर्गाची नेआण करण्याकरितां फॅक्टरीच्या ह्या गाड्या नियमितपणें शहरांतून जरा दूर असलेल्या फॅक्टरीपर्यंत येरझारा घालीत असतात.

आमच्या हॉटेलपासून फार दूर नसलेल्या मॅजेस्टिक सिनेमाजवळ आम्हीं ह्यांतली एक बस दहा वाजतां पकडली. गांधीनगर ह्या भागांतून आम्हांला त्या सिनेमाकडे जावें लागलें. हें गांधीनगर दादर-माटुंग्याच्या एखाद्या भागासारखें दिसत होतें. मात्र येथें इमारतींभोंवतीं अधिक प्रशस्त आवारें होतीं. हें गांधीनगर म्हणजे येथला फिल्मी भाग असावा. कारण सिनेमा कंपन्यांच्या अनेक पाट्या आम्हांला इमारतींवर लटकावलेल्या आढळल्या. ह्या गांधीनगर भागांतच महाराष्ट्र समाजाची इमारत आहे. तेथें रहाण्याकरितां खोल्याहि मिळतात. इमारत चांगली दिसली. आणि माहिती नसल्यामुळें आपण तेथें उतरलों नाहीं ह्याची जरा चुटपुट लागली.

हिंदुस्थान एअरक्रॅफ्टच्या बसमधून जातांना बंगलोर शहराचा बराच भाग दिसला. शहर चांगलें आंखीव आणि टुमदार आहे. इमारती भव्य नाहींत, पण सुबक आहेत. इमारतींच्या भोंवतीं प्रशस्त प्रांगणें आहेत आणि मैदानासारख्या मोकळ्या जागा पुष्कळ आहेत. मुंबईकराला ह्या गोष्टीचें कौतुक वाटतें.

ह्या शहरांत हिरवळ व झाडी बरीच आढळली. रस्त्यांच्या कडेच्या वृक्षांवर कसलीं तरी निळीं आणि गुलमोहराचीं फुलें बहरलीं होतीं. ह्यामुळें कसें प्रसन्न वाटत होतें. वाटेंत एक नगरपालिकेनें बांधलेला पोहण्याचा तलाव पाहून मीं भुवया उंचावल्या. ह्याबाबतींत आमची मुंबईची नगरपालिका मागेंच आहे ह्याची मला आठवण झाली.

हिंदुस्थान एअरक्रॅफ्ट फॅक्टरीच्या ऑफिसची इमारत, लांबट आणि मोठी ऐटबाज आहे. स्वागताच्या खोलीला (रिसेप्शन रूम) अपारदर्शक कांचेचे झुलते दरवाजे आहेत. आंत बसायला आरामशीर कोच आहेत व एका अर्धवर्तुळाकार टेबलाच्या मागें पाहुण्यांचें स्वागत करणारी छोकरी बसते. खोलीच्या एकंदर थाटाच्या मानानें ही मुलगी जरा बावळटच दिसत होती. अर्थात् तिनें आपल्या परीनें 'स्मार्ट' दिसण्याचा प्रयत्न केला होता. पण हे दक्षिणेचे लोक एकंदर दिसायला जरा बावळटच.

त्या छोकरीनें आम्हांला बसायला सांगितलें. आणि परसोनेल ऑफिसरकडे निरोप धाडला. आम्हीं सिगरेट शिलगावून वाट पहात थांबलों. फॅक्टरीचे संस्थापक श्री. वालचंद हिराचंद ह्यांचें एक चित्र त्या खोलींत होतें. त्यानें माझें लक्ष वेधून घेतलें. वालचंद हे हाडाचे व्यापारी नाहींत, तर उद्योगपति आहेत. त्यांनीं धाडशीपणानें हिंदुस्थानांत अनेक नवीन उद्योग सुरू केलेले आहेत. वालचंद हे महाराष्ट्रांत स्थाईक झालेले आणि मराठी बोलणारे गुज-राती. ह्या चित्रांत त्यांच्या डोक्यावर सोलापुरी पागोटें आहे. अर्धवट पागोट्या-खालीं दडलेलें कपाळ मोठें असावें. त्या कपाळावर दोन ठळक आठ्या आहेत. ह्या आठ्यांत त्यांचा सगळा विचारीपणा सांठवलेला आहे असें वाटलें. डोळे व्यवहारी दिसतात. पाय जमिनीवर ठेवून चालण्याची वृत्ति त्यांत आढळते. त्यांचें तरतरीत नाक बहुधा त्यांची धाडसी वृत्ति व तरतरीत बुद्धि दर्शवीत असावें. आणि त्यांच्या जाड ओठांच्या ठेवणींत एक प्रकारचा धूर्तपणा आणि कुठच्याहि मार्गानें आपले हेतु साधण्याची वृत्ति दिसते.

त्यांच्या चेहेऱ्यावरून मी त्यांच्या स्वभावाविषयीं जें म्हटलें तें आपलें एक अनुमान. चेहेरेपट्टीचा आणि स्वभावाचा संबंध जोडणारें एक शास्त्र आहे म्हणतात. पण मीं त्याचा अभ्यास केलेला नाहीं.

आपलें महत्त्व आमच्या मनावर ठसावें इतका वेळ आम्हांला ताटकळत ठेवल्यावर, परसोनेल ऑफिसर श्री. वासुदेवराव ह्यांनीं आम्हांला बोलावून

घेतलें. आम्ही आंत जाऊं लागल्याबरोबर त्या छोकरीनें प्रधानचा कॅमेरा आपल्याकडे ठेवून घेतला.

वासुदेवराव हे सावळ्या रंगाचे, मध्यम उंचीचे आणि भरलेल्या शरीराचे गृहस्थ, तरतरीत आणि हुषार वाटले. बड्या सरकारी अधिकाऱ्यांचा जो एक वर्ग असतो, त्याचे सारे गुणधर्म त्यांच्या अंगांत होते.

आम्हीं आंत शिरतांच त्यांनीं शुभेच्छा व्यक्त केली आणि आम्हांला खुर्चीवर बसायला सांगितलें. समोरचे कागद त्यांनीं मिनिटभरांत हातावेगळे केले. आणि आमच्यापुढें सिगरेटचा डबा ठेवीत ते म्हणाले, "माफ करा मीं तुम्हांला खोळंबून ठेवलें त्याबद्दल. पण मला फारच काम होतें."

त्यावर आम्हींहि हंसून औपचारिक उत्तर दिलें. नंतर त्यांनीं आमची चौकशी केली आणि मग आम्हीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें दिलीं. ते इंग्रजी सफाईनें बोलत होते, पण कानडी हेल सारखे डोकावत होतेंच. सगळी माहिती त्यांच्या अगदीं तोंडावर होती. आपल्या फॅक्टरीचें धोरण आणि राष्ट्राच्या औद्योगिक जीवनांतलें तिचें महत्त्व ह्याची त्यांना जाणीव होतीच, पण शिवाय बारीकसारिक व्यावहारिक प्रश्नांविषयींदेखील त्यांना चांगलें ज्ञान होतें. काय बोलावें, किती बोलावें आणि कसें बोलावें हें त्यांना बरोबर माहीत होतें. आणि आम्हांला ते योग्य तितकेंच महत्त्व देत होते. जास्ती नाहीं अगर कमी नाहीं.

त्यांनीं दिलेली माहिती थोडक्यांत अशी :

हिंदुस्थान एअरक्रॅफ्ट फॅक्टरी हा हिंदुस्थानांतला विमानांचा एकमेव कारखाना आहे. त्यामुळें त्याला फार महत्त्व आहे. एकंदर पांच कोटींचें भांडवल उभारण्याचा कंपनीला अधिकार आहे. पण सध्यां दोन कोटी इतक्याच भांडवलाचा उपयोग करण्यांत येत आहे. सुरवातीला वालचंद हिराचंद ह्यांनीं भांडवल गोळा करून ही कंपनी सुरू केली असली, तरी सध्यां ती कंपनी म्हैसूर सरकार व भारत सरकार ह्यांच्या ताब्यांत आहे. दोन कोटींपैकीं दोन तृतीयांश भांडवल भारत सरकारनें घातलें आहे व एक तृतीयांश म्हैसूर सरकारचें आहे. ह्या कारखान्यांत मुख्यतः विमानांचे सांगाडे तयार होतात, विमानें जोडलीं जातात व त्यांची दुरुस्तीहि केली जाते. शिवाय आगगाड्यांचे डबेदेखील येथें तयार होतात. विमानांचीं इंजिनें मात्र येथें तयार होत नाहींत. श्री. वासुदेवराव ह्यांच्या मताप्रमाणें त्याकरितां निराळा कारखाना उघडणेंच अधिक सोईचें टरेल. ह्या कारखान्यांतलें जवळ जवळ ७० टक्के काम हिंदुस्थान

सरकारकरितां केलें जातें—विशेषतः हिंदी विमान दलाकरितां. बाकी तीस टक्के काम निरनिराळ्या विमान वहातुक कंपन्यांकरितां केलें जातें. विमान कांहीं ठराविक तास हवेंत उडलें कीं, तें उलगडून, तपासून पुन्हां जोडावें लागतें, असा सरकारी नियम आहे. आणि तो योग्यच आहे. कारण विमान बिघडणें व मोटर बिघडणें ह्यांत जमीनअस्मानाचें अंतर एकाहून अधिक अर्थांनीं आहे. हें विमानें उलगडण्याचें व जोडण्याचें काम ह्या कारखान्यांत होतें. पण वासुदेवराव म्हणाले, " बऱ्याचशा कंपन्या ह्या बाबतींत स्वतःची सोय करीत आहेत. आणि तें आम्हांला हवेंच आहे. कारण तसें झालें तर सरकारी गरजांवर आम्हांला आमचें लक्ष केंद्रित करतां येईल."

कारखान्याचें वार्षिक उत्पन्न किती, असें विचारल्यावर ते म्हणाले,

"अडीच कोटी रुपये."

"आणि नफा?"

"पांच लाख!"

"बस! अडीच कोटींवर पांच लाख?" आम्ही विचारलें.

त्यावर ते म्हणाले, "आमच्या नफ्यावरून तुम्हीं आमच्या कार्यक्षमतेची कल्पना करूं नका. आमची कांहीं खाजगी कंपनी नाहीं. आणि नफा करणें हा आमचा हेतु नाहीं. उलट सरकारचें काम कमींत कमी खर्चांत करून देणें हाच आमचा उद्देश आहे."

मीं म्हटलें, "तें बरोबर आहे. पण मग तुमची कार्यक्षमता मोजायची कांहीं आर्थिक फूटपट्टीच शिल्लक रहात नाहीं."

ह्यानतर त्यांनीं आपल्या कारखान्याच्या कार्यक्षमतेचीं कांहीं गमकें सांगितलीं. मग ते म्हणाले, "तुम्हाला वाटेल कीं आम्ही येथें फक्त विमानें जोडण्याचें काम करतां, म्हणजे विशेष असें कांहींच करत नाहीं. पण हा समज चुकीचा आहे. इतर देशांत अनेक उद्योगांची वाढ झालेली असल्याकारणानें त्यांच्या मदतीनें हें काम सहजपणें करतां येतें. पण येथें आम्हांला मुळापासून सुरवात करावी लागली. उद्योगांच्या एका कुटुंबाचीच आम्हांला जोपासना करावी लागली म्हणा ना!"

त्यांचा हा मुद्दा मला विशेष महत्त्वाचा वाटला. हिंदुस्थानांत उद्योग नाहींत म्हणून उद्योग सुरू करणें कठीण जातें, असें एक आवर्त निर्माण झालेलें आहे.

ह्या कारखान्यांत साडेसात हजार मजूर काम करतात. आम्हीं विचारलें, "मग मजूर-संघटना आहे कीं नाहीं? संप होतात कीं नाहीं?" ते म्हणाले,

"हो, आहे तर. मजूर-संघटना आहे आणि मागें एक संपहि झाला होता. पण मुंबईहून अशोक मेहता यांनीं येऊन संप मिटविण्यास मदत केली. एकंदरींत आम्हीं मजुरी जास्त देतों, आणि त्यांच्या सुखसोयींकडे लक्ष पुरवतों, त्यामुळें मजुर संतुष्ट आहेत."

युद्धकाळांत होते त्याहून कमी मजूर आतां कारखान्यांत कामावर आहेत हें मला जरा चमत्कारिक वाटलें. ह्या कारखान्याचा व्याप आतां वाढत गेला पाहिजे. आणि कसब शिकलेल्या मजुरांचा उपयोग करून घेतला पाहिजे असें कोणालाहि वाटेल. वासुदेवराव म्हणाले कीं, कारखान्याचा विस्तार पायरी-पायरीनें होत आहे.

आपल्या कारखान्यांत आतां एका हिंदी शास्त्रज्ञानें कल्पिलेलें स्वतंत्र प्रकारचें विमान तयार होत आहे असें त्यांनीं अभिमानानें सांगितलें. आणि हे हिंदी शास्त्रज्ञ डॉ. घाडगे नांवाचे महाराष्ट्रीय गृहस्थ आहेत असें कळतांच आमच्याहि छात्या इंचभर फुगल्या.

वासुदेवराव ह्यांना अशा रीतीनें बराच वेळ प्रश्न विचारून भंडावल्यावर, आम्हांला इतका वेळ दिल्याबद्दल आम्हीं त्यांचे आभार मानले, आणि कारखाना दाखविण्याची सोय करण्याची विनंती केली. त्यांनीं ऑफिसांतल्या एका माणसाला बोलावलें आणि आम्हांला कारखाना दाखविण्यास सांगितलें.

पण त्यानें आतां जेवणाची वेळ झाली असें सांगितल्यावर ते म्हणाले, "सुटीनंतर कारखाना पाह्यला आपली कांहीं हरकत नाहीं ना ?"

"Not at all! Not at all!" आम्हीं भरदार आश्वासन दिलें आणि मग रुंद हास्य व प्रतिहास्य करीत आम्हीं त्यांचा निरोप घेतला. मग आम्हीं सुब्रम्हण्यम् (आमच्याबरोबर दिलेले गृहस्थ) यांस खाजगी आवाजांत विचारलें, "आतां जेवणाची सुट्टी झाली म्हणतां. मग इथें जेवणाची कुठें सोय आहे तें सांगा कीं !"

गृहस्थ निरुत्साहीपणें म्हणाला, "तिकडे एअरोड्रोमवर हॉटेल आहे, तिकडे जा."

उन्हांतून एक लांबलचक गल्ली तुडवीत आम्हीं गेलों. घशाला कोरड पडली होती आणि जरा गळल्यासारखें झालें होतें. "किती लेकाचें लांब आहे कोण जाणे!" असें आम्हीं चरफडत असतां एक वळण घेतल्यावर एकदम विमानतळ दिसूं लागला. छोटी मोठीं डौलदार आकृतीचीं विमानें उन्हांत तळपत

होतीं. विविध रंगांचे आणि आकारांचे बावटे फडफडत आणि खुणावत होते. कंट्रोल टॉवर एखाद्या लष्करी अधिकाऱ्याच्या ऐटींत उभा होता. आणि विमानतळाशेजारींच विमान कंपन्यांचीं ऑफिसें वगैरे असलेली छोटी, सुबक इमारत होती. ह्या इमारतींतच तें हॉटेल होतें.

हॉटेलमध्यें सगळें कसें स्वच्छ, नीटनेटकें आणि चकचकीत होतें. पांढरे गणवेषधारी परिचारक, त्यांची अदब आणि शिस्त, नाजुक बशा, चकाकणारे कांटेचमचे, आंत बसलेल्या देखण्या स्त्रिया आणि ऐटबाज पुरुष.

ह्या इंग्रजी पद्धतीच्या हॉटेलांतलें वातावरण कसें अगदीं मन प्रसन्न करणारें असतें. नाहींतर आमचीं हॉटेलें. ते कानांत पदार्थांचीं नांवें ओरडणारे परिचारक, ती अस्वच्छता, ती आदळआपट! छे! छे! खावें कसें तें साहेब लोकांनाच खरें माहीत आहे. आणि त्यांच्याकडून आपण तें थोडेंफार शिकलों आहों हें मोठें सुदैवच म्हणायचें.

इंग्रजी पद्धतीच्या हॉटेलची मीं स्तुती केली खरी. पण त्यांत पुष्कळदां अतिशय बेचव अन्न फार महाग मिळतें ह्याची मला कल्पना आहे. आणि अदबीनें जवळ येऊन उभ्या राहिलेल्या परिचारकाला जेव्हां मीं जिन्नस सांगितले, तेव्हां ते कसे असतील ह्याविषयीं मला जबरदस्त शंका वाटूं लागली.

पण बेचवपणाचा जो केवळ आदर्श असा सूप हा पदार्थदेखील जेव्हां चविष्ट निघाला तेव्हां धीर आला. आणि सूपला थोडी दक्षिणी सांबारची चव असलेली पाहून गंमतहि वाटली.

नंतर कोंबडी आली! अहाहा! काय त्या कोंबडीचें वर्णन करावें! इतकी लुसलुशीत आणि खरपूस शिजलेली कोंबडी मीं तोंपर्यंत खाल्लेली नव्हती. ती नुसती तोंडांत विरघळत होती. आणि तिची चव तर अशी लज्जतदार होती कीं, ती मनुका व काजु ह्यांवरच पोसलेली आहे कीं काय, असा प्रश्न मला प्रधानला विचारावा लागला.

उत्तर द्यायला त्याला तेव्हां वेळ नव्हता. पण त्याच्या तोंडाच्या हालचाली त्याच्या हृदयांतल्या भावना व्यक्त करीत होत्या.

त्या कोंबडीमुळें तृप्तीनें पोट कसें लिंपून निघालें. नव्या माटांतलें पाणी झिरपावें तशी ती तृप्ती अंगभर झिरपत होती. आणि जिभेवर रुचीचा गिलावा अजून शिल्लक होता.

आतां ह्यानंतर तो परिचारक दुष्टपणें काळी कडू कॉफी अगर नारळाच्या

रसाचें आइसक्रीम देईल अशी अनुभवावर आधारलेली भीति आम्हांला वाटत होती. पण छे! त्या हॉटेलचे चालक चांगले रसिक होते. त्यांनीं दुधाच्या मलईंतलें फ्रूट सलाड आणलें. आणि अविकलेलीं केळीं व बेचव मोसंबीं म्हणजे 'फ्रूट' अशी सुदैवानें त्यांची व्याख्या नव्हती. अननस आदि फळांच्या फोडी अवचितपणें दांताखालीं सापडत होत्या. विविध रुचींचें इंद्रधनुष्य तोंडांत निर्माण होत होतें. आणि त्या रसचर्चेंत मन कसें निमग्न होत होतें.

ह्या जेवणाचें बिल अवघें सहा रुपये आहे असें कळतांच त्या रसचर्चेंत अधिकच लज्जत आली.

आम्हीं एकमेकांना खोट्या काळजीच्या स्वरांत विचारलें, "आपल्याला जायचंय् ना?"

आणि मग एकमेकांना आश्वासनें दिलीं, "Oh! It can wait."

"Certainly! It can wait."

एक एक सिगारेट ओढल्यावर मगच आम्हीं जाग्यावरचे हललों. त्यामुळें अर्थात्च आम्हीं फॅक्टरीमध्यें अर्धा तास उशिरां पोहोंचलों. ह्याबद्दल दिलगिरी व्यक्त करण्याचा आम्हीं प्रयत्न केला. पण श्री. सुब्रह्मण्यम् ह्यांना त्याचें कांहींच वाटत नव्हतें असें दिसलें. हे गृहस्थ निरुत्साही दिसले आणि ते म्हणे तेथल्या प्रसिद्धी खात्यांत होते!

त्यांच्याबरोबर आम्हीं कारखान्याच्या निरनिराळ्या शाखांत हिंडलों.

छोट्या विमानांचे पंख कापडाचे असतात हें कळल्यावर आश्चर्य वाटलें. हें कापड विशिष्ट प्रकारचें असतें आणि तें हातानें शिवावें लागतें. कांहीं बाबतींत तरी यंत्र माणसावर मात करूं शकत नाहीं म्हणायचें. हिंदुस्थानांत इतरत्र कुठेंहि पहायला मिळणार नाहींत अशीं मोठालीं यंत्रें तेथें काम करीत होतीं. कांहीं लाकूड कापावें तशा धातूंच्या पट्ट्या कापीत होतीं. कांहीं त्या पट्ट्या तासून त्यांच्या सुंदर झिलप्या काढीत होतीं. कांहीं कर्कश आवाज करून गिरक्या घेत पत्र्यांना व पट्ट्यांना भोकें पाडीत होतीं. कांहीं त्यांना वाकवीत होतीं. ऑक्सिॲसेटिलिन ज्वालेच्या निळ्या फवाऱ्यानें यंत्रांचे भाग सांधले जात होते आणि तोंडावर अभ्रकाचे मुखवटे चढवून आणि हातांत पत्र्याची ढाल घेऊन काम करणारे मजूर यंत्रयुगांतले मानव शोभत होते.

त्या सगळ्या कामांत जो विलक्षण अचूकपणा होता त्याचें कौतुक वाटत होतें. एक दशांश इंचाचा फरक म्हणजे तेथें फारच ढोबळ चूक समजली

जात होती. बरोबरच आहे. तो एक दशांश इंचाचा फरक म्हणजे जीवन-मरणांतला फरक होता. तीं एवढीं मोठीं अजस्र यंत्रें इतकीं नाजुक कामें करतांना पाहून, सुई उचलणाऱ्या हत्तीच्या सोंडेची आठवण झाली.

त्या यंत्रांतून फिरतांना काळजीच घ्यायला पाहिजे होती. कारण लोखंडाचे बारिक कण व तुकडे त्या यंत्रांतून उडत होते आणि ते डोळ्यांत जाण्याचा बराच संभव होता. तेथल्या कांहीं कामगारांनीं डोळ्यांवर संरक्षक चष्मे लावलेले नव्हते. तें पाहून मीं विचारलें, "असें कां?"

सुब्रह्मणम् म्हणाले, "त्यांनीं चष्मे लावायला पाहिजे होते. पण त्यांनीं लावलेले नाहींत."

मला वाटतें कीं अशा बाबतींत सक्ती करणें अवश्य आहे.

कारखान्याच्या मोटाल्या शेडस्‌मध्यें आणि बाहेर पटांगणांत असंख्य विमानें विखुरलेलीं होतीं. दुसऱ्याच कुठल्या जगांतले हे प्राणी हतबलपणें जमिनीवर पडले आहेत आणि त्याबद्दल मूढ आश्चर्य करीत आहेत असें वाटत होतें. अनेक आकाराचीं आणि अनेक प्रकारचीं तीं होतीं. कांहीं छोटीं, कांहीं मोठीं, कांहीं फुगीर पोटाचीं, तर कांहीं बसक्या नाकाचीं! एका छोट्या पर्सिव्हल स्मिथ विमानाच्या पंखांचीं टोकें नखरेलपणें वर वळलेलीं होतीं. डाकोटा विमानांची संख्या बरीच होती. युद्धोत्तर कालांत तीं स्वस्त मिळत होतीं म्हणून म्हणे अनेक कंपन्यांनीं घेतलीं. हीं विमानें अजस्र आणि एखाद्या क्रूर पक्षासारखीं वाटलीं.

शिड्या लावून कामगार ह्या विमानांवर ठोक ठोक करीत होते. त्यांचे भाग काढीत होते, जोडीत होते. त्यांचीं नाकें उघडून आंत डोकावून पहात होते. तें सगळें मोठें गमतीदार वाटत होतें. गलिव्हरच्या अंगावरून फिरणारे लिलिपुटचे लोक असेच दिसले असतील.

आम्हांला एका विमानांत शिरायचें होतें म्हणून आम्हीं बाहेरच्या पटांगणांत ठेवलेल्या विमानांकडे गेलों. तेवढ्यांत एक छोटी तीन चाकी मोटरवर चालणारी गाडी आली आणि एका भल्या मोठ्या विमानाला शेपटीकडून ओढून फरफटत घेऊन गेली. असें फरफटत जातांना तें अजस्र विमान बेटें अगदींच मूर्ख दिसत होतें. तो प्रकार पाहून मुंग्या झुरळाला फरफटत घेऊन जातात त्याची आठवण झाली.

इतका वेळ तुटपुंजें बोलणाऱ्या श्री. सुब्रह्मण्यम् ह्यांना आतां थोडी वाचा फुटली. ते हंसून म्हणाले, "विमान जमिनीवर अगदींच निरुपयोगी असतें."

आणि मग ओढून ताणून संबंध जोडून एक त्यांनीं चुटका सांगितला. तो असा : एक पहिल्यानेंच विमानांत बसणारी बाई पायलटला घाबरटपणें म्हणाली, " पण तुम्हीं आम्हांला नीटपणें जमिनीवर आणाल ना ? "

पायलट हंसून म्हणाला, " बाईसाहेब, आम्हीं अजून कोणालाच वर आकाशांत ठेवलेलें नाहीं. "

चुटका अर्थातच चांगला होता. पण आपल्या चुटक्यावर खूष होऊन श्री. सुब्रह्मण्यम् हंसले तें मला अधिक विनोदी वाटलें.

आम्हीं एका विमानांत चढून आंतला भाग पाहिला. विमान चांगलेंच तापलें होतें. आणि आंत अगदीं शिजून निघायला होत होतें. मीं घाबरून विचारलें, " विमानांत बसल्यावर असेंच उकडतें कीं काय ? "

त्यावर सुब्रह्मण्यम् ह्यांनीं विमानें थंड ठेवण्याकरितां कांहीं खास सोयी केलेल्या असतात असें सांगितलें. पायलटच्या सीटवर मी जाऊन जरा गंमतीनें बसलों. आणि तेथील अनेक खटके, कळा, डायल्स वगैरेंची गर्दी पाहून भांबावूनच गेलों. एवढ्या सगळ्या गोष्टींवर लक्ष ठेवून विमान चालवायचें म्हणजे मोठें कठीण काम असावें. पायलट लोकांना विनाकारण फार पगार मिळतो ह्या माझ्या कल्पनेंत त्यामुळें फरक पडला.

सगळा कारखाना पाहून झाला. आगगाड्यांचे डबे बनवायचा विभाग जवळ जवळ दोन मैलांवर होता. वेळाच्या अभावीं तो पहायचा नाहीं असें आम्हीं ठरवलें. आणि सुब्रह्मण्यम् यांचा निरोप घेऊन बाहेर पडलों. प्रधाननें आपल्या कॅमेऱ्याचा कबजा घेतला. बाहेरून ऑफिसच्या इमारतीचा तरी फोटो घ्यावा अशी त्याची मनीषा होती. पण फोटो घेतां येणार नाहीं असें एका पोलिस अधिकाऱ्यानें त्याला सांगितलें.

फॅक्टरीच्या बसमधून आम्हीं शहरांत परतलों. हॉटेलकडे जातांना वाटेंत एका केशकर्तनालयाला भेट दिली. तेथल्या कारागिराची मशीन एका हातानें न चालवतां दोन्ही हातानीं चालविण्याची पद्धत नाविन्यपूर्ण असली तरी भीतिदायक वाटली. आणि ' सोव्हिएट युनियन ' नांवाचें सचित्र नियतकालिक जेव्हां त्यानें माझ्या हातांत दिलें, तेव्हां माझी भीति कांहीं कमी झाली नाहीं. शिवाय हें नियतकालिक ह्या माणसाकडे कसें आलें त्याविषयीं कुतूहल वाटलें. मात्र भाषेच्या अडचणीमुळें तें व्यक्त करतां आलें नाहीं.

हॉटेलमध्यें चहा घेऊन व अंमळ विश्रांति घेऊन आम्हीं संध्याकाळीं

फिरायला बाहेर पडलों. लाल बाग पहायचा आमचा विचार होता. म्हणून बस स्टॅंडवर गेलों. पण तेथें क्यू वगैरे कांहींच प्रकार आढळला नाहीं. बस आली कीं लोक भराभर आंत उड्या मारीत होते. ही भानगड नको म्हणून आम्हीं झटक्याच्या डब्यांत बसून लाल बागेकडे गेलों.

वाटेंत एक छोटी बाटोळी तटबंदी दिसली. झटकावाला म्हणाला कीं, तो टिपूचा किल्ला का राजवाडा आहे. तो किल्ला नसावा. कारण एवढा नकटीएवढा किल्ला असत नाहीं. झटकेवाला सांगत होता कीं, आंत कांहीं नाहीं. पण तो आम्हांला फसवत असेल अशा कल्पनेनें आम्हीं तावातावानें आंत गेलों. आंत खरोखरच कांहींच नव्हतें !

भाविकतेनें सगळें पहायचें आणि दिसेल तें चांगलें म्हणायचें अशी प्रवाश्याची वृत्ति असते. त्या वृत्तीचा पगडा थोडासा आमच्यावरहि बसूं पहात होता. त्याच वृत्तीनें आम्हीं लाल बागेंत प्रवेश केला. आंतल्या एका कारंजाची आम्हीं स्तुति केली. खरोखर त्याची रचना व शिल्प हिणकसच होतें. पण इतके पैसे खर्च करून जी लाल बाग बघायला आलों ती सामान्य कशी असेल? चार बागांसारखी बाग होती. आंत एक सुंदर कांचेचें घर होतें हें तिचें वैशिष्ट्य. आंत एक छोटा तलाव होता. त्यांतलें पाणी बरेंचसें सुकलेलेंच होतें. बागेंत झाडें अर्थात् होतींच. हिरवळहि होती. पण तेथें सौंदर्य वा वैशिष्ट्य असें काहीं खास नव्हतें. त्या मानानें हॅंगिंग गार्डन छोटी असली तरी तिची रचना सुंदर आहे, वैशिष्ट्यपूर्ण आहे.

लाल बागेजवळच एक फार जुन्या काळच्या राजानें बांधलेली छोटी घुमटी आहे. शहराच्या इतर दिशांनाहि म्हणे अशाच घुमट्या आहेत. त्या काळची म्हणे ही शत्रू येतोय् कीं काय ह्याची टेहेळणी करायची जागा होती. त्या काळीं असें भविष्य वर्तवलेलें होतें म्हणे कीं बंगलोर शहराची वाढ त्या घुमटीपर्यंत होईल. तें भविष्य आतां जवळ जवळ खरें ठरलें आहे असें म्हणायला हरकत नाहीं. घुमटींत शिल्पाचें वा वास्तूचें खास असें वैशिष्ट्य आमच्या बिनमाहितगार नजरांना तरी दिसलें नाहीं.

परततांना अर्थात् कमी पैशांत झटका मिळाला आणि पहिल्या झटकावाल्यानें आपल्याला फसवलें असें दृष्टोत्पत्तीस आलें. प्रवासांत हें सततच होत असतें.

हॉटेलवर गेल्यावर प्रधान झटकेवाल्यास पैसे देत होता. तेव्हां मीं वर गेलों. पण तेवढ्यांत प्रधानच्या हाका ऐकायला येऊं लागल्या. झटकेवाला कटकट

करतो आहे असें वाटून मीं संतापून धावूनच खालीं गेलों. पण प्रधान बावळट चेहेरा करून म्हणाला, " अरे ! आतां काय गंमत झाली, माझ्या हातांतील नोट उडून गेली."

" उडून गेली ? अशी कशी जाईल ती ?" मीं म्हटलें.

" वारा आला अन् अशी गेली."

" पण ?"

" पण तें कसें सांगूं तुला ? I am feeling like a perfect fool."

" बरोबर आहे." मीं अहेतुपूर्वक म्हटलें.

प्रधाननें माझ्या पाठींत एक गुद्दा लगावला.

मग झटकेवाल्याची बोळवण करून आम्हीं गुप्त पोलिसांच्या चतुराईनें वाऱ्याची दिशा आणि वेग पाहिला. नोट कशी धरली होती तें मीं हडसून खडसून विचारलें. आणि मग टॉर्च घेऊन आम्हीं अंधारांत खूप शोधलें. नोट अर्थात् आमच्या साऱ्या चतुराईला न जुमानतां अदृश्यच राहिली. एकंदरींत नोटा मिळविण्याची चतुराई आमच्या अंगांत नाहीं हेंच खरें.

नोट गेली खरी, पण तिनें आमची करमणूक बरीच केली. कांहीं वेळ तरी प्रधानचा स्वतःवरचा विश्वास पार उडाला. आणि जेवण आटपून जेव्हां आम्हीं स्टेशनवर म्हैसूरला जाण्याकरितां गेलों, तेव्हां प्रधाननें तिकिटांचे पैसे हातांत इतके घट्ट धरले होते कीं, माझ्या हातांत ते देण्याकरितां देखील त्याची पकड ढिली होईना.

बंगलोर ते म्हैसूर अंतर आहे अवघें पंचाऐंशीं मैल. पण ही रात्रीची गाडी तेथें पोंहोंचायला सात तास घेते —म्हणजे सकाळीं पोंहोंचते. हमालाला थोडी लालूच दाखवल्यामुळें त्यानें इंटरच्या डब्यांत आमच्याकरितां वरच्या तीन बर्थ मोठ्या चपळाईनें पकडल्या. आणि आरामशीरपणें झोपून आम्हीं म्हैसूरपर्यंत प्रवास केला.

## :५: म्हैसूर

सकाळीं उठलों आणि थोड्याच वेळानें म्हैसूर आलें. किंवा खरें सांगायचें म्हणजे म्हैसूर आलें म्हणून इतरांनीं मला उठवलें.

म्हैसूरला टॅक्सी केली. ‘ मॉडर्न हिंदू हॉटेल ’ असें टॅक्सीवाल्याला सांगितलें. आणि मागें रेलून सिगरेट शिलगावली. पण एक झुरका मारतां न मारतों तोंच टॅक्सी थांबली.

मीं आश्चर्यानें म्हटलें, “ ऑं ? ”

टॅक्सीवाला म्हणाला, “ हॉटेल आया, साब. ”

आम्हीं एकमेकांकडे पाहिलें. एवढें अंतर आम्ही चालतहि आलों असतों. मी संतापून म्हणालों, “ तूं तर सांगितलेंस कीं हॉटेल तीन फर्लांग दूर आहे म्हणून. आणि हें तर धड फर्लांगभर देखील नाहीं. आतां तुला एक रुपया कसला द्यायचा ? ”

“ मीटरचाच रुपया होतो ना ? ” त्यानें मुंडी हलवून कायद्यावर बोट ठेवलें आणि मग मुकाट्यानें आम्हांला एक रुपया काढून द्यावा लागला.

त्या दिवशीं एप्रिलची पहिली तारीख होती, ह्याचें तेवढ्यांत स्मरण झालें. आणि आपण फारसे मूर्ख ठरलों नाहीं असें स्वतःचें समाधान करून घ्यावें लागलें.

इकडच्या हॉटेलमध्यें जेवणखाण, चहापाणी व रहाणें ह्या सर्वांचा मिळून एक आकार करतात. किंवा तुमची इच्छा असल्यास रहाण्याचा आकार निराळा घेतात व तुम्ही जेवढें जेवण वगैरे घ्याल तेवढा जादा आकार करतात. तुम्हांला कुठें शहर सोडून बाहेर जायचें असलें अगर गंमत म्हणून बाहेर जेवायचें असलें तर दुसरी पद्धत सोयीची पडते. आम्हीं दुसऱ्या पद्धतीचाच उपयोग केला.

हॉटेलमध्यें चहा (कॉफी नव्हे,) घेतला, न्याहारी केली आणि एक टॅक्सी करून आम्हीं सगळें शहर पाहून घेतलें. बंगलोरपेक्षां हें शहर मला अधिक सुंदर व भव्य वाटलें. येथले रस्ते केवढे तरी प्रशस्त आहेत. मुंबईच्या तोडीची येथल्या रस्त्यांवर विजेची रोषणाई आहे. ठिकठिकाणीं पुतळे, कारंजीं, मैदानें व बागा आहेत. सार्वजनिक इमारती टोलेजंग नसल्या तरी भव्य व लक्ष वेधून घेणाऱ्या आहेत. येथलें रेल्वे स्टेशनच मुळीं एखाद्या

राजवाड्यासारखें दिसतें. पोलिस चौक्या एखाद्या बड्या अधिकाऱ्यांच्या बंगल्यासारख्या वाटतात. हॉस्पिटलें म्हणजे देवालयें तर नाहींत, असा भास होतो. महाराजांचें पॅलेस ऑफिस हाच त्यांचा राजवाडा आहे, असा माझा समज झाला. आणि खुद्द राजवाडा पाहिला तेव्हां त्याच्या भव्यतेनें मी गुंग झालों.

इथल्या इमारती एकाच प्रकारच्या नव्हत्या. युनानी हॉस्पिटलचे घुमट, कमानी, खांब, वगैरेंवर मुसलमानी कलेची छाप होती, तर आयुर्वेदिक हॉस्पिटलच्या रचनेंत हिंदु देवालयांचे संस्कार दिसत होते. पाश्चात्य राजवाड्यांचीं जीं चित्रें आम्ही पहातों तसला एक राजवाडा होता, तर दुसऱ्या कांहीं इमारती आपल्या अनेक लहान मोठ्या, कौलारू छपरांनीं मुंबईच्या सेक्रेटरिएट वगैरे इमारतींची आठवण करून देत होत्या.

इमारतींच्या रचनेंतील ही विविधता मला पसंत पडली. पण एक शंका मात्र माझ्या मनांत आली. प्रत्येक इमारतीची रचना आणि तिचा उपयोग ह्यांचा कांहीं संबंध असावा असें मला वाटतें. रेल्वे स्टेशन हें स्टेशन आहे असें जाणवलें पाहिजे. तें राजवाड्यासारखें दिसणें योग्य नाहीं. त्याचप्रमाणें पोलिस चौकी बंगल्यासारखी दिसून कसें चालेल? पण असा कांहीं घोटाळा ह्या म्हैसूर शहरांत झाला आहे असें निदान मला वाटलें. त्याच वेळीं असा एक गंमतीदार विचार आला कीं, गरज भागविण्याच्या दृष्टीनें कांहीं हें शहर बांधलें गेलें नाहीं. एका महाराजाला स्वतःची एक सुंदर राजधानी असावी असें वाटलें आणि म्हणून हें शहर बांधलें गेलें. इथल्या पोलिस चौक्या बंगल्यासारख्या दिसतात ह्याचें कारण हेंच असावें. अर्थात् हे एका अनभिज्ञ माणसाचे विचार आहेत हें वाचकांनीं ध्यानांत ठेवावें.

म्हैसूरचें आणखी एक वैशिष्ट्य नोंद करण्यासारखें आहे. बहुतेक शहरांत गरीबांच्या वस्तीचा एक गचाळ भाग असतोच. पण म्हैसूरमध्यें मला तसा भाग आढळून आला नाहीं. कदाचित् मी शहरांत पुरा हिंडलों नसेन. पण इतर शहरांत तितकेंच हिंडून तो गचाळ भाग नजरेस पडायचा मात्र राहिला नाहीं.

एकंदरींत म्हैसूर शहर मला आवडलें. हिंदी संस्थानांच्या राजधान्यांत बडोदें, जयपूर व म्हैसूर ह्या सर्वांत सुंदर आहेत असें म्हणतात. ह्यांपैकीं जयपूर कांहीं मीं पाहिलेलें नाहीं. पण बडोद्याहून सर्वच बाबतींत मला म्हैसूर शहर अधिक बरें वाटलें आणि म्हैसूरची हवा तर ( आणि लोकहि ) बडोद्याच्या हवेहून किती तरी चांगली आहे.

पण हें शहर एकंदरींत झोपाळू वाटलें बुवा! बाकी मुंबईकराला इतर कुठचेंहि शहर झोपाळूच वाटतें.

पहिल्यानें ड्रायव्हरनें आम्हांला जगन्मोहन राजवाड्यांत नेलें. हा राजवाडा फार जुना आहे म्हणतात. पूर्वी येथें राजकुटुंब रहात असे. आतां मात्र तेथें कलाकृतींचा संग्रह आहे. अगदीं आजच्या चित्रकारांपासून तों अगदीं जुन्या चित्रकारांपर्यंत सगळ्यांचीं चित्रें येथें आहेत. शिवाय पाश्चात्य आणि चिनी, जपानी वगैरे चित्रकारांच्या कलाकृतीदेखील येथें ठेवलेल्या आहेत. लाकूड, हस्तिदंत, चांदी वगैरेवर केलेलीं सुंदर कोरीव कामेंदेखील येथें आहेत. शिवाय इतर अनेक कलाकृती व चमत्कारिक गोष्टी आहेत—आणि हो! सांगायचें विसरलोंच. येथें देखरेख करणाऱ्या शिपायांचा एक मोठा तांडाच आहे. ते बहुधा कोपऱ्यांत एकत्र जमून गप्पा मारीत असतात. पण आमच्या-सारखे बूट-पाटलोणवाले लोक पाहिले कीं, एकमेकांना खुणावून ते निरनिराळ्या दालनांत पळतात आणि हल्ला करण्याच्या तयारीनें उभे रहातात. कसा तें आतां समजेलच.

पहिल्या दालनांत आम्ही गेलों तेव्हां एका पट्टेवाल्यानें आम्हांला लवून अदबीनें सलाम केला. दरबारी हास्य केलें. आम्ही एकदम जागरूक झालों. कारण तें रुंद हास्य म्हणजे आमच्या खिशाला पडलेलें रुंद भोक आहे ह्याची आम्हांला जाणीव होती. पण कोणी तरी दाखविलें तर सोयीचें पडतें म्हणून आम्हीं त्याच्या सलामाचा व हास्याचा स्वीकार केला. आम्ही असे कबजांत आलेले पहातांच तो तुरुतुरु दालनाभोंवतीं फिरूं लागला. आणि केस कापून झाल्यावर न्हावी मागें टुवाल झटकतो, तशा थाटांत गडबडीनें माहिती सांगूं लागला. माहिती कसली कपाळाची? नुसतें पाहून जें आमच्या ध्यानांत येत होतें तेंच तो आम्हांला सांगत होता. आणि आम्ही कुठें रेंगाळलों म्हणजे आम्हांला सांगत होता, "तें बघूं नका, साहेब. मी दाखवतोंय् तें बघा."

असा शहाणपणा तो करूं लागतांच आम्हीं त्याला टाटलेंच. असो.

अशा रीतीनें सगळ्या दालनभर आम्हांला फिरवून, त्यानें आम्हांला अधिक लवून सलाम केला आणि अधिक रुंद हास्य केलें.

मी म्हटलें, "बस इतकेंच? पुढचें दाखव ना आम्हांला?"

त्यानें दुसऱ्या दालनांतल्या दुसऱ्या पट्टेवाल्याकडे बोट दाखवीत म्हटलें, "आतां तो दाखवील."

आणि त्या दुसऱ्या दालनांतल्या पट्टेवाल्यानें आपल्या आणखी एका मित्राला तिसऱ्या दालनांत पिटाळून मग आम्हांला लवून सलाम केला.

आम्हीं एकमेकांकडे पाहिलें. मग मीं माझ्या भुंवया वर उडवल्या आणि प्रधानजवळ पुटपुटलों, " Four annas ? "

प्रधानचे खांदे वर उडाले आणि तो गंभीरपणें एका कलाकृतीचें निरीक्षण करूं लागला. वासंतीच्या मानेला जोरजोरानें झटके बसूं लागले. अखेर मीं पहिल्या पट्टेवाल्याला दोन आणे दिले. दालनांची संख्या बरीच आहे असें ध्यानांत येतांच दोन आण्याचा एक आणा झाला. आणि पुढें तर एक दोन दालनांतल्या पट्टेवाल्यांनीं लवून केलेल्या सलामाचा ऐटींत स्वीकार करून आम्ही तसेच हंसत हंसत पुढें सटकलों.

तेथील जुनीं रजपूत आणि मोगल पद्धतीचीं चित्रें नाजुक पण निर्जीव वाटलीं. ॲनिमियानें पछाडल्यासारखीं ! हातावर पोपट घेतलेला राजा अगर बादशहा असले ह्या चित्रांचे विषय. एकंदरींत नाजुक व दरबारी. कांहीं चित्रांत जवळ-दूरचें नीट दाखवतां आलें नव्हतें. त्यामुळें राजाच्या डोक्यावर मोर लोंबकळतो आहे आणि त्यावर झाड उगवलें आहे असें चित्रांत दिसायचें. आपल्या इकडे जुन्या तजबिरी असतात तशा प्रकारचीं चित्रें होतीं. हीं चित्रें कशीं ठसठशीत होतीं. नाजुक वक्र रेषांचीं आणि फिकट रंगाचीं बंगाली चित्रेंहि तेथें होतीं. चिनी आणि जपानी चित्रांच्यादेखील रेषा नाजुक होत्या. रंग फिकट होते. तरी पण बंगाली चित्रांहून तीं निराळीं वाटत होतीं. ह्या चित्रांचे विषय निसर्गांतून आलेले होते. थोडक्या रेषांत पुष्कळ परिणाम साधण्याचा त्यांचा प्रयत्न दिसत होता. आपल्याइकडे पोथ्यांत असत तसलीं ओबडधोबड चित्रेंहि होतीं. राजा रविवर्म्याचीं चित्रें होतीं. ह्याला आपल्या इकडचा एक मोठा चित्रकार समजतात. पण त्यांचीं चित्रें पाहून एका श्रेष्ठ चित्रकाराच्या कलाकृती आपण पहात आहोंत असें कांहीं मला वाटलें नाहीं. कां कोण जाणे ! त्या चित्रातलें एका तिबेटी तरुणीचें चित्र माझ्या ध्यानांत राहिलें. तिच्या चेहेऱ्यावरचें प्रसन्नता आणि संकोच ह्यांचें मिश्रण मला फार मोहक वाटलें. एकंदरींत ही चित्रशाळा बडोद्याच्या चित्रशाळेच्या मानानें मला कमी दर्जाची वाटली. पण बडोद्याच्या चित्रशाळेंत चित्रांवर कांचा लावल्यामुळें त्यांत प्रतिबिंब पडून अगर उजेड लकाकून चित्र पहायला जी अडचण पडते, ती मात्र येथें पडत नव्हती.

चिनी मातीच्या सुंदर चिनी वस्तू तेथें होत्या. चांदी, हस्तिदंत, चंदन

ह्यांवरचें अतिशय नाजुक आणि सुंदर कोरीव काम होतें. कांहीं ठिकाणीं शिंपल्यांच्या सुंदर आकृति वा वस्तू बनविलेल्या होत्या. सारें अप्रतिम होतें.

टिपूचा लहानपणाचा चांदीचा व मोठेपणाचा ब्रॉंझचा हत्तीवरचा हौदा येथें होता. हैदरनें पदच्युत केलेल्या राजघराण्याच्या ह्या वंशजांनीं हैदर आणि टिपू ह्यांच्या अनेक गोष्टी जतन करून ठेवल्या आहेत. एखाद्या मुसलमान नबाबानें असें केलें असतें कीं नाहीं त्याची शंका वाटते.

किल्ली दिल्यावर मंजुळ स्वर काढणारीं घड्याळें आम्हीं पाहिलीं. एका फिरत्या सिलेंडरवर कांटे असतात आणि ते कशावर तरी आघात करून आवाज काढतात. तीं संग्रहालयांत ठेवण्यांत काय मोठें प्रयोजन होतें तें कळलें नाहीं. ह्या संग्रहालयांत जशा अतिशय चांगल्या गोष्टी होत्या तशा अतिशय क्षुल्लक गोष्टीदेखील होत्या. तेथें ठेवायच्या गोष्टींची नीट निवड करण्यांत आलेली दिसली नाहीं.

तेथला बांबूचा जलतरंग, कडांवरून काठी घासली कीं आवाज करणारी घंटा, आणि एक जुन्या राजपुत्राचें आजच्या आठ आणे किंमतीच्या पेनसारखें फौंटनपेन, ह्या गोष्टींनीं माझें मन वेधून घेतलें.

जगन्मोहन राजवाडा पाहून झाल्यावर आम्हीं हुश् करून टॅक्सींत रेलून बसलों. शांतपणें एकेक सिगरेट ओढली आणि मग सारा उत्साह एकवटून महाराजांचा रहाता राजवाडा पहायला गेलों. राजवाडा पहायचा म्हणजे हुजूर सेक्रेटरींची परवानगी घ्यावी लागते. तो रविवार असल्यामुळें हुजूर सेक्रेटरींच्या घरीं जावें लागलें. तेथें बाहेर आमच्यासारखेच इतर लोक थांबलेले होते. तेथें कोसला नांवाचे दिल्लीचे गृहस्थ होते. गृहस्थ स्वतःच्या मोटरमधून आले होते. चांगले पैसेवाले असावे. त्यामुळें त्यांच्यांत एक प्रकारचा आकर्षक निर्भीडपणा आणि धटिंगणपणा आला होता. बोलण्यांत तर तो दिसलाच. पण पुढें एके ठिकाणीं वागण्यांतहि दिसला.

हुजूर सेक्रेटरींनीं परवानगीचा कागद दिला. त्यावर लिहिलें होतें : गाडगीळ, दिल्ली. माझा आणि दिल्लीचा संबंध त्यांनीं कसा जोडला होता, कोण जाणे! कोसला दिल्लीहून आले होते त्याअर्थी मींदेखील दिल्लीहून आलों असेन, असें तर्कशास्त्र त्यांनीं लढवलें कीं काय? कीं काकासाहेब गाडगीळ ज्याअर्थी दिल्लीला असतात, त्याअर्थी एकजात सारे गाडगीळ दिल्लीचे रहिवासी आहेत, असा त्यांचा समज झाला होता?

कांहींहि असो. परवानगी खिशांत पडली तसा आम्हीं मार्ग सुधारला. राजवाड्याभोंवतीं मोठी भिंत आहे. आंत प्रशस्त प्रांगण आहे. राजवाडा भव्य आहे. त्याला सोन्याचे कळस आहेत. त्याची उंची १४२ फूट आहे. चौदा वर्षें म्हणे तो बांधत होते. मुख्य दरवाजानें आमच्यासारख्यांना राजवाड्यांत प्रवेश करतां येत नाहीं. त्यामुळें आम्हीं बाजूच्या दरवाज्यानेंच प्रवेश केला. आणि आम्ही खालीं उतरल्यावर आमच्या टॅक्सीला ताबडतोब बाहेर पिटाळण्यांत आलें.

आमच्या परवानगीचे कागद तेथल्या शिपायानें तपासले आणि त्यानें भिवया चढवल्या. "साहेब, ह्या कागदावरची तारीख १ मे आहे." तो सहानुभूतीच्या स्वरांत म्हणाला.

"आं ?"

"१ मे ?"

"What rot !"

"चल्ला !"

अशी उद्गारांची मालिका त्या वेळीं निघाली.

हुजूर सेक्रेटरींनीं रविवारीं येणाऱ्या नैसर्गिक आळसामुळें ती चूक केली असावी, असें त्याला समजावून सांगण्याचा आम्हीं यत्न केला.

आमचें म्हणणें त्यानेंहि मान्य केलें. आणि मग हुजूर सेक्रेटरींकडून चुकीची दुरुस्ती करून आणण्याची त्यानें विनंति केली.

कोसला आम्हांला म्हणाले, "हुजूर सेक्रेटरींनीं बहुधा आपल्याला एप्रिल फूल बनवायचें ठरवलेलें दिसतेंय्."

किंवा कदाचित् त्यांनाच त्या foolishness ची बाधा झाली असावी, असा विचार माझ्या मनांत येऊन गेला.

तेवढ्यांत कोसला पुढें सरसावले. त्यांनीं शिपायाच्या हातांतले कागद घेतले, स्वतःच त्यांच्यावरच्या तारखा बदलल्या आणि ते म्हणाले, "यह ठीक है अभी. चलो."

शिपाई गोंधळून त्यांच्याकडे पाहूं लागला. आम्ही हसूं लागलों. त्यामुळें अखेर तोहि बावळटपणानें हसला आणि त्यानें आम्हांला आंत सोडलें. मात्र आंत जाण्यापूर्वीं आम्हांला बूट काढावे लागले. राजवाड्याची खराबी होऊं नये ह्या दृष्टीनें तें मला बरोबर वाटलें. पण इतर कांहीं लोक मात्र कुरकुरले. आमच्याप्रमाणेंच अनवाणी चालणारे गोरे साहेब पाहून मौज वाटली.

प्रवेशद्वाराजवळ जुन्या राजवाड्याचा चांदीचा दरवाजा लावून ठेवलेला आढळला. त्या दरवाज्यावरचें नक्षीकाम पाहिलें आणि जरा थबकलों. हा दरवाजा बनवणारा राजा मोठा रंगेल असावा. कारण त्यावर लंपट शृंगाराचीं सगळीं नक्षीचीं चित्रें होतीं. एका चित्रांत एक माणूस ( खुद्द राजाचेंच तें चित्र असावें ) आपल्या दोन मांड्यांवर दोन बायांना घेऊन बसला आहे. एकीला त्यानें कवेंत घट्ट धरून ठेवलें आहे आणि दूर सरूं पहाणाऱ्या दुसरीला जवळ ओढून तिचें चुंबन घेण्याचा तो प्रयत्न करीत आहे. त्याचे हात त्यांच्या स्तनांवर आहेत हें सांगणें नकोच. आणखी...पण नको. मला वाटतें, एवढाच नमुना पुरे. नाहीं तर एखादा संस्कृति-संरक्षक झीट येऊन पडायचा. मला झीट आली नाहीं, पण राजवाड्याच्या प्रवेशद्वारावर अशीं चित्रें काढण्यांत औचित्याचा भंग होतो असें मात्र वाटलें.

...हो. आणि चुंबन घेऊं पहाणाऱ्या त्या माणसाच्या चेहेऱ्यावरचा अधाशी भाव पाहून गंमतहि वाटली.

नंतर आम्हांला खाजगी दरबार हॉलमध्यें नेण्यांत आलें. हॉल प्रशस्त आहे. त्याला अपारदर्शक कांचेचें छत आहे. त्यावर रंगीत चित्रें काढलेलीं आहेत. ह्या कांचेच्या छतामुळें त्या हॉलमध्यें निराळाच स्वच्छ प्रकाश पडतो आणि साऱ्या गोष्टींना एक प्रकारचा उठावदारपणा आणतो. तेथील खिडक्यांच्या कांचांवर निरनिराळ्या प्राण्यांच्या सुबक आकृती उठवलेल्या होत्या, त्या मला मोठ्या मोहक वाटल्या. रंगांचा अगर रेषांचा उपयोग न करतां कांचांतच त्या आकृती वठवलेल्या होत्या. भिंतीवर प्लास्टरमध्यें कोरलेल्या सुंदर शुभ्र आकृती होत्या. हें सगळें मला कलात्मक आणि सुंदर वाटलें. पण तेथल्या खांबावर मुलामा चढवून जो झगझगीतपणा आणण्यांत आला होता तो मात्र मला हिणकस, दिखाऊ वाटला.

शिपाई आम्हांला निरनिराळ्या दालनांतून हिंडवत होता. एका खोलींत अनेक जुनीं शस्त्रास्त्रें ठेवलेलीं होतीं. अनेक प्रकारच्या तलवारी तेथें होत्या. लांब, आखूड, रुंद पात्याच्या, कांहीं वक्र तर कांहीं सरळ अशा त्या होत्या. कांहींच्या मुठींवर हस्तिदंतांतलें कोरीव काम होतें, तर कांहींच्या मुठी सोन्याच्या, रत्नजडित होत्या. कट्यारी, जंबिये, खंजीर, बिचवे वगैरे तर अनेक होते. हीं आखूड पात्यांचीं आणि नाजुक हस्तिदंती मुठींचीं शस्त्रें मला फार आवडलीं. एखाद्या कुशाग्र बुद्धीच्या कावेबाज, निष्ठुर मुत्सद्द्याचें मन असेंच असेल नाहीं ?

टिपू व हैदरअली ह्यांच्या तलवारीदेखील तेथें होत्या. तेथें वाघनखें होतीं, तीं शिवाजीचीं, असें कांहींसें तो शिपाई म्हणालासें वाटतें. पण नीट स्मरत नाहीं. शिवाजीचीं वाघनखें तेथें असण्याची शक्यता एकंदर कमीच.

केवढा रोमांचकारी इतिहास असेल त्या शस्त्रास्त्रांचा! लढाईच्या ऐन गर्दीत त्यांतल्या कित्येक तलवारी खणखणल्या असतील, रक्तानें माखल्या असतील. गतप्राण झालेल्या सैनिकांनीं त्यांना आपल्या लाकडासारख्या निर्जीव मुटींत घट्ट धरून ठेवलें असेल. रक्ताळलेली त्यांचीं पातीं धुळींत माखलीं असतील. आणि कांहीं बापड्या एखाद्या नादान राजाच्या कमरेला शोभेच्या वस्तू म्हणून लटकून राहिल्या असतील.

रक्त प्यायला सवकलेलीं तीं हत्यारें आतां बापडीं मखमली घरांत पडून होतीं आणि एका पुजाऱ्याकडून त्यांची नेमानें पूजा करवली जात होती!

महाराजांना मानपत्रें वगैरे ज्या अनेक चांदीच्या, सोन्याच्या करंडकांतून मिळालीं, ते करंडक एका दालनांत ठेवलेले होते. सारेच किंमती आणि मौल्यवान होते. पण हत्तीच्या व बैलाच्या पायांचे करंडक मात्र मला विशेष आवडले.

आणखी एका दालनांत शिकारींत मारलेलीं जनावरें पेंढा भरून ठेवलेलीं होतीं. तेथल्या सिंहाच्या पाठीवरून मीं ममतेनें हात फिरवला. वाघाच्या मिशा ओढल्या आणि चक्क निर्भयपणें त्याच्या तोंडांत हात घातला. वासंतीला उगी-चच ऐटीनें म्हटलें, “ घाबरतेस काय? मेलेले आहेत ते!”

नंतर वाघाच्या मिशा व दांतहि बनावट होते असें कळलें, तेव्हां मीं अंमळ खट्टू झालों.

महाराजांच्या चांदी-सोन्याच्या खुर्च्या वगैरे एका दालनांत होत्या. जुन्या खुर्चीत हल्लींचे महाराज मावत नाहींत म्हणून नवी बनवून घेतलेली प्रशस्त खुर्ची शिपायानें दाखवली!

नंतर मोटा दरबार हॉल आम्हीं पाहिला. अगदीं वर महाराज व बडे मान-करी ह्यांच्याकरितां जागा आहे. मग उतरत्या पायऱ्यांवर इतर मानकरी आपल्या श्रेणीनुसार बसतात. ( कीं उभे राहतात? ). वर जाळीदार सज्ज्यांत स्त्रीवर्गाची बसायची सोय आहे. पुढच्या मोठ्या पटांगणांत खेळ वगैरे होतात आणि तो सगळा सोहळा पाहण्यासाठीं म्हणे प्रजाजनांची झुंबड उडालेली असते.

दसऱ्याला अगर इतर खास प्रसंगीं असा दरबार भरतो आणि त्या वेळेला साऱ्या राजवाड्यावर आणि सार्वजनिक इमारतींवर विजेची रोषणाई केलेली असते.

हा सगळा थाट व वैभव ठीक होतें. पण बाहेर जायच्या दरवाज्यावर ब्रिटिश राज्यचिन्ह होतें त्याचें काय ? एकदम त्या साऱ्या वैभवाची मला विलक्षण उबग आली. हे राजे-महाराजे आणि ते पेटा भरून ठेवलेले वाघ-सिंह ह्यांत फरक तो काय होता ?

तेथल्या शिपायांना बक्षीस देऊं नये, असें लिहिलेल्या पाट्या दरवाज्यावर होत्या. पण बाहेर पडतांना बहुतेक लोक बक्षीस देत होते आणि शिपाई तें घेत होते.

पुन्हा हुश्! पुन्हा सिगरेट!

"फार झालें बुवा."

"Too much!"

"आतां एखाद्या हॉटेलांत..."

पण आम्हीं चामुंडेश्वरीचें देवालय पाहून मगच हॉटेलमध्यें जायचें असें ठरवलें. म्हैसूर शहराजवळ एक उंचशी टेकडी आहे. त्यावर हें देवालय आहे. चामुंडेश्वरी हें म्हैसूरच्या राजघराण्याचें कुलदैवत! त्यामुळें त्या देवालयाला विशेष महत्त्व आलें आहे. ह्या देवालयाकडे जाण्याकरितां सुंदर डांबरी रस्ता बांधण्यांत आलेला आहे आणि त्या रस्त्यावरच्या दिव्यांची वळसे घेत वर जाणारी रांग रात्रीं तळपूं लागली कीं, अमरपुरीला जाणाऱ्या कोणा यक्षाचीं पावलें हवेंत उमटलीं आहेत असें वाटतें. ह्या रस्त्यानें रोज दोनदां महाराज चामुंडेश्वरीच्या दर्शनाला जातात.

त्या सुंदर रस्त्यानें आमची मोटार चामुंडेश्वरीच्या देवालयाकडे जाऊं लागली. दुपारची वेळ असल्यामुळें अंगावर येणारा थंड वाऱ्याचा झोत हवासा वाटत होता. आणि टेकडी जरी नुसती खडकाळ असली, तरी जसजसे आम्ही वर जात होतों तसतसें म्हैसूर शहर अधिकाधिक दृष्टिपथांत येत होतें. त्याची रेखीव शोभा दुपारच्या चकचकीत उन्हांत अधिकच रेखीव दिसत होती. आणि राजवाड्याचा उंच सोनेरी कळस त्या उन्हांत तळपत होता.

वाटेंत आम्हांला उंचावर असलेला एक छोटासा सुंदर राजवाडा दिसला. ड्रायव्हरनें सांगितलें कीं, तो राजेंद्रविलास पॅलेस. देवीच्या दर्शनाला आल्यावर म्हणे महाराज तेथें अंमळ विश्रांति घेतात आणि मग खालीं उतरतात.

"ठीक आहे बाबा!" असें म्हणण्यापलीकडे आम्हीं आणखी काय करणार ?

देवालयाच्या थोडें अलीकडे, ज्या महिषासुराला चामुंडेश्वरीनें मारलें त्याची मूर्ति आहे. हा महिषासुर साधारणतः सिनेमांतल्या राक्षसासारखा आहे. तो

चांगला जाडजूड आहे. त्याचे केस लांब आहेत. मिशा मोठ्या आहेत. त्याच्या डोक्यावर एक शिंग आहे. आणि एका हातांत सर्प व दुसऱ्या हातांत जाडसा सोटका आहे. त्याला भडक रंग देण्यांत आलेला आहे.

चांमुडेश्वरीचें देवालय विशेष प्रेक्षणीय नाहीं. त्याला एक उंच गोपुर आहे, इतकेंच. आंतलें देऊळ एकंदर मामुलीच आहे. एका वैभवशाली राजघराण्याच्या कुलदेवतेचें देऊळ ह्याहून अधिक चांगलें असेल अशी माझी अपेक्षा होती. पण राजेंद्रविलास पॅलेसच देवळाहून अधिक चांगला होता.

देवालयाच्या द्वाराजवळ अनवाणी शिपायांचा पहारा होता. हे शिपाई ठराविक वेळानें देवीला सलामी देत असतात. आम्ही गेलों तेव्हां सलामी देण्याचा हा प्रकार झाला. शिपायांनीं शिथिलपणें सलामी दिली आणि मग त्यांचा अधिकारी जेव्हां 'लेफ्ट टर्न' म्हणून ओरडला तेव्हां दोघे उजवीकडे तर दोघे डावीकडे वळले. आणि वर आणखी गाढवपणानें हसले.

गाभाऱ्यांत काळोख होता. त्यामुळें देवीचें दर्शन झालें नाहीं. तसें पाहिलें तर गाभाऱ्यांतल्या काळोखामुळें आम्हांला कुठच्याच देवाचें धडसें दर्शन झालें नाहीं. अर्थात् त्यामुळें मला कांहींच बिघडल्यासारखें वाटलें नाहीं.

राणीसाहेब दर्शनाला येणार होत्या म्हणून पडदे लावून पडदानशीन रस्ता तयार करण्यांत आला होता. हा उत्तरेंतला पडदा इकडेहि होता म्हणायचा !

देवळाजवळ ज्योतिष सांगणारे, गाइड, भिकारी वगैरे लाचार आणि बुभुक्षित लोकांचा तांडा होताच. त्यांना चुकवीत आम्हीं देवळाच्या सभोंवतीं फेरी मारली. कसलेसे कांटे तेथें सारखे कुचुकुचु टोचत होते आणि त्रास देत होते.

चांमुडेश्वरीच्या देवळाजवळ दुसरें एक देऊळ होतें. तेथल्या देवीची रथांतून मिरवणूक निघाली. देवीला लाकडी का कसल्याशा बैलावर बसवलें होतें. पुढें वाद्यें वाजत होतीं. त्यामागें दोन मशाली घेतलेलीं माणसें होतीं. देवीची गाडी एक मनुष्यच ओढत होता. देवीबरोबर दोन चार पुजारी होते. आणि मागें पोरेंटोरें होतीं. सगळीच मरगळ होती.

देवाला झोंपवणें, जेवायला घालणें, फिरवणें वगैरे पोरकट प्रकार आपल्याकडे सरसकट चालू आहेत. त्यांचीं ऐतिहासिक कारणें देतां येतील. पण त्याचें समर्थन करतां येईल असें मात्र मला वाटत नाहीं. खरोखर इतक्या गंभीरपणें आणि श्रद्धेनें आपले लोक ह्या गोष्टी कशा करूं शकतात तें मला कळत नाहीं. देवपूजेचे कांहीं विधी असावे, लोकांच्या उत्सवप्रियतेला वाव

मिळावा, हें मला मान्य आहे. पण तें अधिक चांगल्या प्रकारें करतां येईल.

परततांना वाटेंत 'टॅक्सी'वाल्यानें वासंतीला 'अम्मा' म्हणून कांहींतरी सांगितलें. तेव्हां तिला अधिकच राग आला. इथले लोक सारखे वासंतीला 'अम्मा' म्हणत आणि त्यामुळें वासंती पुन्हा पुन्हा रागावे. मात्र एक दोन दिवसांत तिला पटलें कीं इथले लोक 'अम्मा' हा शब्द फार गोड उच्चारतात. मीं तसा उच्चार करून तिला 'अम्मा' म्हणायचा प्रयत्न केला. पण वासरूं हंबरावें तसा आवाज माझ्या तोंडांतून आला आणि मग घाईघाईनें मला तेथून पाय काढावा लागला.

असो. टेकडीवरून उतरतांना वाटेंत आम्हीं एक भला मोटा दगडी नंदी पाहिला. एका प्रचंड आणि अखंड काळ्या पाषाणांतून तो कोरलेला आहे. तीनशें वर्षांपूर्वी हा तयार करण्यांत आला असें म्हणतात. हा नंदी एवढा भव्य आहे कीं, मीं त्याच्याजवळ उभा राहिलों तेव्हां माझी उंची त्याच्या गुडघ्याइतकी-देखील भरली नाहीं. त्याच्या तोंडावर एक प्रकारची तृप्ति आणि उन्मत्तपणा आहे. त्याच्या अंगावर घंटांच्या माळा कोरलेल्या आहेत. त्याचे कान कातरलेले आहेत. वास्तव चित्रण करण्याची आणि जें कोरायचें तें सुशोभित करायची वृत्ति ह्यांचा त्या शिल्पाकृतींत चांगला संगम झालेला आहे.

इथें असा हा भव्य नंदी कोरण्याची त्या कलावंताला कां इच्छा झाली असावी ? शेतींतून निर्माण झालेल्या व शेतीवर पोसल्या जाणाऱ्या संस्कृतीनें त्या उपयुक्त प्राण्याचें केलेलें हें पूजन असावें. शेतकऱ्याच्या दृष्टीनें बैल हा त्याच्याबरोबर स्वतः राबणारा, शेतें पिकवणारा त्याचा सहकारी असतो. त्याच्या जीवनांतल्या एका मूलभूत आणि महत्त्वाच्या अंशाचें तें प्रतीक असतें. त्याच्या तृप्तींत शेतकऱ्याची तृप्ति असते. त्याच्या खांद्यावर शेतकऱ्याचें जीवन उभें असतें. म्हणून त्याला त्याच्याविषयीं कृतज्ञता वाटते, अभिमान वाटतो. आणि दैवी (नैसर्गिक) सामर्थ्याचा तो अंश आहे म्हणून त्याच्याविषयीं आदर वाटतो. थोडी भीतीहि वाटते. हें सारें त्या कलावंतानें व्यक्त करण्याचा प्रयत्न केला असावा. निदान मला तसें वाटलें. पण कोण जाणे, तें केवळ माझ्या कल्पनेचें भरकटणेंहि असेल.

अशा विचारांत मी रंगलों असतां एक अगदीं मरतुकडी गाय त्या नंदी-जवळ आली आणि त्या नंदीपुढें कांहीं तरी विकत बसलेल्या एका बाईच्या पाटींत तोंड घालूं लागली. 'हुड्डुत्' करून त्या बाईनें गाईला हांकून दिलें.

आणि मग आपल्याजवळचें कांहीं तरी घेऊन नंदीपुढें ठेवा असा आम्हांला आग्रह करूं लागली. मला हसूं आलें. आणि मग तो भव्य, उन्मत्त नंदी आणि ती मरतुकडी, अधाशी गाय ह्यांचीं चित्रें माझ्या नजरेसमोर तरळत राहिलीं.

असो. अगदीं टळटळीत दुपारीं आम्ही हॉटेलवर आलों. एका पायांतला बूट काढून 'हुश्श' ! दुसऱ्या पायांतला बूट काढून 'हुश्श' ! मग कपडे काढून ' हुश्श '!

जेवण विशेष रुचकर लागलें हें सांगणें नकोच. सुदैवानें येथें चपात्या मिळाल्या. नाहींतर पहिल्यांदा भात, दुसऱ्यांदा भात आणि तिसऱ्यांदाहि भातच असा इकडचा प्रकार असतो.

जेवण झाल्यावर वासंती व प्रधान झोंपीं गेलीं. मीं मात्र दुपारीं झोंप येत नसल्यामुळें जागाच राहून त्या वेळची शांतता हुंगत, चाखत होतों.

## :६: आधुनिक सहस्रार्जुन

दुपारीं प्रधानची तब्येत बिघडली. त्याचें डोकें जड झालें. त्याला मळमळूं लागलें आणि तो कावराबावरा झाला. दगदगीचा परिणाम ! ॲस्प्रो, लिंबाचा रस वगैरे उपचार केले. पण आमच्याबरोबर कृष्णराजसागरला येण्याची कांहीं त्याची ताकद होईना. तो अंथरुणांत पडून राहिला आणि दारांत आलेल्या सर्व्हिस मोटारमध्यें बसून आम्हीं निघालों. आमची अपेक्षा अशी कीं मोटर सरळ कृष्णराजसागरला जाईल. पण सर्व्हिसच्या मोटरमधून तुम्ही इतक्या व्यवस्थितपणें कुठें जाल हें शक्यच नसतें. बाजारांत नेऊन आमची मोटर थांबवण्यांत आली आणि ड्रायव्हर व मागोमाग क्लीनर कुठंसे अदृश्य झाले. मोटारींत बसलेला एक मनुष्य मात्र 'कृष्णराजसागर' 'कृष्णराजसागर' अशा अर्थाचें कांहीं ओरडून उतारू गोळा करीत होता. अर्धा तासपर्यंत आमची मोटर तेथेंच उभी होती. आणि पैसे देऊन बसलों असल्यामुळें आम्हीहि अडकून पडलों.

त्या मोटारींतल्या माणसावर मीं रागावण्याचा प्रयत्न केला, पण तो नुसता बावळटपणें हसला. मग ड्रायव्हर आल्यावर त्याच्यावर राग काढण्याचा प्रयत्न केला, तेव्हां तो निगरगट्टपणें हसला.

ड्रायव्हरनें शिंग वाजवून आरडाओरडा करून मोटर चालू केली तेव्हां मला अंमळ बरें वाटलें. पण चटकन माझा गैरसमज दूर झाला. आमची मोटर कांहीं सरळ कृष्णराजसागरला जात नव्हती. मोटार वेळेवर सुटली असें पोलिसांना भासविण्याकरितांच निव्वळ ती जाग्यावरून निघाली होती. मोटारी वेळेवर सुटण्याबाबत येथें पोलीस लक्ष ठेवतात असें दिसतें. असो. थांबत, थांबत, उतारू गोळा करीत आमची मोटर आणखी अर्धा तास त्या तेवढ्याच भागांत हिंडली. आणि पुरेसे उतारू मिळाले असें जेव्हां ड्रायव्हर व क्लीनर यांना वाटलें तेव्हांच मोटर कृष्णराजसागरला जायला निघाली.

मोटर सुरू व्हायची म्हणजे इकडचा ड्रायव्हर ओरडून विचारतो, "राइट?" क्लीनर किंचाळतो, "राइट" आणि मग मोटर चालू होते.

म्हैसूरहून कृष्णराजसागर अजमासें बारा मैल आहे. तीस चाळीस मिनिटांत मोटर तेथें जाऊन पोहोंचते.

तेथें कावेरीला एक प्रचंड धरण बांधलेलें आहे. कृष्णराजसागर हें नांव त्याला आधींच्या महाराजांच्या नांवावरून मिळालें आहे. हिंदुस्थानांतल्या फार मोठ्या धरणांपैकीं हें एक आहे. ह्याची उंची एकशेंतीस फूट आहे आणि हें पावणेदोन मैल लांब आहे. हें बांधायची कल्पना सर मोक्षगुंडम् विश्वेश्वरैय्या ह्यांची. आणि ती तडीस नेली तीदेखील त्यांनींच. एकोणीसशें अकरा सालीं हें धारण बांधायला सुरवात झाली आणि वीस वर्षांनंतर म्हणजे एकतीस सालीं तें बांधून पुरें झालें. हें धरण बांधायला अडीच कोट रुपये खर्च आला. आणि त्यानंतर कालवे खोदण्याकरितां अधिक खर्च करावा लागला. ह्या आधुनिक सहस्रार्जुनानें कावेरी अडवल्यामुळें पन्नास चौरस मैलांचें एक प्रचड तळें तयार झालें आहे. ह्या तळ्यांतून कालवे काढण्यांत आले आहेत. हे कालवे अदमासें दीड लाख एकर जमीन भिजवतात. शिवाय ह्या धरणांतून कांहीं ठराविक पाणी सोडलें जातें. त्या पाण्याच्या नियमित पुरवठ्याच्या जोरावर खालीं पूर्वेस शिवसमुद्रम्‌चें विद्युत्‌निर्मिति-केंद्र चालतें.

ह्या कृष्णराजसागरच्या तलावांतून काढलेल्या कालव्याचें पाणी दर वर्षाला दर एकरीं दहा रुपये ह्या दरानें शेतकऱ्यास मिळतें. नवीन जमीन जर लागवडी-खालीं आणायची असेल तर मात्र वर्षाला पंचवीस रुपये द्यावे लागतात आणि त्याशिवाय त्या नव्या जमिनीपैकीं एक तृतीयांश जमीन सरकारला द्यावी लागते. ज्या लोकांची जमीन ह्या पन्नास चौरस मैलांच्या तलावाखालीं बुडाली, त्यांना ही अशी मिळालेली जमीन सरकार देतें हें अगदीं योग्यच आहे. पण एक तृतीयांश जमीन द्यायची हा सरसकट नियम चमत्कारिक वाटतो. शेतकऱ्याजवळ जमीन किती आहे त्यावर त्याच्याकडून किती जमीन घ्यायची हें अवलंबून असावें, हें अधिक योग्य वाटतें. शिवाय अधिक जमीन लागवडी-खालीं आणायची हें सध्यांचें सरकारचें धोरण पहातां, नव्या जमिनीला पाणी पुरवण्यास जास्त दर असावा हेंदेखील अयोग्य वाटतें. उलट तो कमी असायला हवा. अर्थात् हे सहज सुचलेले विचार. सर्व बाजूंनीं अभ्यास करून बनविलेलें हें मत नव्हे.

धरणाच्या अगदीं कडेला मोटर थांबली आणि खालीं उतरतांच आम्हांला त्या अजस्र आधुनिक सहस्रार्जुनाचें दर्शन झालें. आपल्या काळ्या पत्थराच्या रुंद छातीनें त्यानें पाण्याचा केवढा तरी लोट अडवून धरला होता. आणि तो अडवलेला पाण्याचा लोट अगतिकपणें मागें वळून जमीन बुडवीत दूरवर वेडा-

वाकडा पसरला होता. किंचित्सें हेलावणारें आणि उन्हाची लकाकी पृष्ठभागावर नाचविणारें तें पाणी अगदीं शांत, निरुपद्रवी वाटत होतें. आणि तिरप्या झेपा घेऊन त्या पाण्यांतले मासे वेचूं पहाणारे पक्षी, दिशा झटकन् बदलत आकाशांत चढत होते. पुन्हा संथपणें अदृश्य वर्तुळें रेखाटत होते. मुरडत, मुरडत, कोलमडत त्या पाण्याच्या लाटा कृष्णसागरची काळी भिंत चाटत होत्या. चुळ्ळुक चुळ्ळुक असा आवाज करीत चुबकून निघत होत्या.

पण हा सारा शांतपणा किती फसवा होता. आपल्या साऱ्या वजनानें धरणाच्या भिंतीवर रेलून पाणी ती लोटून टाकूं पहात होतें. प्रवाहाच्या जोरानें आणि लाटांच्या हबक्यांनीं तें ती काळी भिंत झिजवूं पहात होतें. जमिनींतून खालीं झिरपून त्याचा पाया उखडूं पहात होतें. त्यांत कुठें भेग सांपडते का तें सारखें चांचपून, शोधून पहात होतें. पुढें समुद्राकडे जाण्याची त्याची कोंडलेली प्रवृत्ति त्याला स्वस्थ बसूं देत नव्हती.

आणि जर का कृष्णराजसागरच्या त्या धरणाची छाती जरा कमकुवत झाली असती, जर का पाण्याच्या चांचपणाऱ्या बोटांना कुठें फटी मिळाल्या असत्या, तर !...तर तें प्रचंड दगडी बांधकाम, खचून कोलमडून मोडून पडलें असतें आणि मग तें आळशीपणानें, अस्ताव्यस्त पसरलेलें पाणी सारी शक्ती एकवटून, फेसाळत, घोंगावत, तुषार उडवीत, स्वतःवर आणि इतर वस्तूंवर आदळत आपटत, प्रचंड वेगानें फुंसाडत वाहूं लागलें असतें. झाडें उमळून धाडकन् पडलीं असतीं, घरादारांचा चुराडा झाला असता, गुरेंमाणसें गुदमरून, भांबावून गेलीं असतीं. त्यांचे पाय जमिनीवरून सुटले असते. आणि अगतिक-पणें तीं कुठच्या कुठें वाहून गेलीं असतीं; बुडून गेलीं असतीं. सारें कांहीं मोडून, चेंचून उध्वस्त होऊन गेलें असतें आणि मग !...मग जणुं कांहीं झालेंच नाहीं अशा थाटांत कावेरी पुन्हा वाहूं लागली असती.

पण छे ! असें कांहींच होणार नव्हतें. कृष्णराजसागरचें धरण आपले पाय रोवून ठाम उभें रहाणार होतें. त्या पाण्याचें सारें वजन आपल्या छातीवर पेलून धरणार होतें. तें कोंडलेलें पाणी विश्वेश्वरैय्या कालव्यांतून बंदिस्तपणें वहात जाणार होतें. त्यावर शेतें पोसणार होतीं, कोठारें भरणार होतीं, माणसांच्या घरांत समृद्धि नांदणार होती.

कारण त्या धरणाच्या मागें मनुष्याची बुद्धि होती—रंग, रूप, आकार नसलेली; पण ह्या साऱ्यांचें आकलन करण्याचा आश्चर्यकारक गुणधर्म असलेली. त्या

बुद्धीनें कागदाच्या चार कपट्यांवर कांहीं गणितें सोडवलीं होतीं, कांहीं संबंध प्रस्थापित केले होते आणि त्या संबंधांच्या चौकटींत तें अस्ताव्यस्तपणें पन्नास चौरस मैल पसरलेलें पाणी अगतिकपणें अडकून पडलेलें होतें. त्या बुद्धीनें आंखलेल्या कालव्यांतून मुकाट्यानें वहात होतें.

त्या अजस्र धरणावरून माणसें किती बेफिकीरपणें चाललीं होतीं ! स्वतःच्या बुद्धिमत्तेवर केवढा जबरदस्त विश्वास होता त्यांचा ! आणि किती लहान, दुबळीं दिसत होतीं तीं. त्यांच्यापैकींच कोणीं हें धरण बांधलें असेल, हें मला खरें वाटेना.

धरणावरून चालत आम्ही वृंदावन बागेकडे जाऊं लागलों. वाटेंत नेहमींच्या पद्धतीप्रमाणें एका माणसाशीं मी ओळख करून घेतली. आणि सुदैवानें तो धरणावर काम करणारा एक अधिकारी निघाला. त्यानें आम्हांला पुष्कळ माहिती सांगितली. त्यांतली कांहीं वर दिलेली आहे. विशेषतः पाण्याच्या दाबानें धरणाचे दरवाजे आपोआप कसे उघडतात आणि मिटतात ह्याची त्यानें सांगितलेली माहिती मला फार मनोवेधक वाटली. पण ती जराशी तात्त्विक असल्यामुळें इथें देत नाहीं.

आमचा निरोप घेतांना तो म्हणाला, "तुम्ही मुंबईचे लोक इतरांपेक्षां अधिक चौकस असतां."

मुंबईकरांची ही स्तुति वाजवी आहे कीं गैरवाजवी आहे तें वाचकांनींच ठरवावें.

धरणावरून आम्ही पलीकडल्या बाजूला खालीं उतरलों आणि वृंदावन बागेंत प्रवेश केला. ही बाग दोन्ही बाजूंनीं मध्याकडे उतरत्या असलेल्या कावेरीच्या पात्रांतच बनवलेली आहे. बागेंत गेलें म्हणजे मनुष्य पायऱ्यापायऱ्यांनीं उतरत मध्याकडे जातो. मध्यभागीं धरणांतून सोडलेलें कावेरीचें पाणी बाग दुभंगून पुढें वहात जातें. बागेचें प्रतिबिंब आपल्या हृदयांत साठवतें. आपल्या झुळझुळत्या दर्शनानें बागेची प्रसन्नता आणि सौंदर्य वाढवतें. बागेंतून उड्या मारीत वहात येणाऱ्या पाण्याच्या असंख्य प्रवाहांना, चुकलेल्या मुलांप्रमाणें आपल्या पोटांत घेतें. आणि बागेच्या रोषणाईसाठीं वीज निर्माण करण्याकरितां खालीं शिवसमुद्रमला जातें.

धरणाच्या कडेकडेनें जाणाऱ्या रस्त्यानें चालून ह्या प्रवाहापलीकडे जातां येतें. किंवा अधिक हौशी मनुष्याला पलीकडे न्यायला संथपणें पुढें सरकणाऱ्या होड्या

आहेत. आणि फरफरत फेसाळ घाईत जाणाऱ्या छोट्या मोटार-बोटीदेखील आहेत.

पलीकडे गेलें कीं बाग पायऱ्यापायऱ्यांनीं चढत वर जाते.

ह्या बागेंत हिरवळीचे चौकोन आणि वर्तुळें आहेत. त्या हिरवळीच्या तुकड्यांत फुलझाडांचे मधुनमधून वाफे आहेत. पानांनीं डंवरून निघालेल्या वेली तेथें रांगतात आणि कमानींवर चढतात. पण मुख्यतः तेथें भर आहे तो सुरूच्या झाडावर. ह्या झाडांना येथें अनेक आकार दिलेले आहेत. त्यांतलीं कांहीं चर्चच्या मिनारांप्रमाणें उंच व निमुळतीं होत गेलेलीं आहेत. कांहीं छोटीं घुमटाच्या आकाराचीं आहेत. त्यांतलीं कांहीं अगदींच डुबरीं आहेत. कांहीं जरा उंच आहेत. कांहीं जास्त डेरेदार आणि गोल आहेत. तर कांहीं कमी डेरेदार आणि टोंकदार शेंड्यांचीं आहेत. अनेक आकार त्या झाडांना देण्यांत आलेले आहेत. आणि कोन साधून तीं अशा प्रकारें लावण्यांत आलेलीं आहेत कीं त्यामुळें अनेक रेखीव आकृत्या निर्माण व्हाव्या. ह्या सुबक, हिरव्याचार आणि नाजुक, भुरभुरीत कांड्यासारख्या पानांच्या झाडांनीं ह्या बागेला कांहीं विशिष्ट शोभा आणलेली आहे.

ह्या हिरवळींतून अनेक रेखीव रस्ते परस्परांना काट देत बागेंतून गेलेले आहेत. ते रस्ते कधीं नुसतेच तर कधीं पायऱ्यापायऱ्यांनीं उतरत बागेच्या मध्याकडे जातात, पाण्याच्या कडेला जाऊन थबकतात, त्याच्या कडेकडेनें वहात जातात.

अशी ही बाग सुंदर आहे. आणि कृष्णराजसागरच्या धरणाच्या काळया भव्य भिंतीच्या पार्श्वभूमीवर ती अधिकच नाजुक व स्वर्गीय वाटते.

पण ह्या बागेचें खरें सौंदर्य तिच्यांतल्या वृक्षवेलींत नाहीं. आणि तिच्या रेखीव रचनेंतदेखील नाहीं. ह्या बाबतींत अधिक सुंदर असलेल्या इतर बागा मीं पाहिलेल्या आहेत. त्या बागांच्या मानानें ही बाग जरा उजाडच वाटली असती. पण तसें खरोखर झालेलें नाहीं.

कारण ह्या बागेंत खेळणाऱ्या, झुळझुळणाऱ्या, कोसळणाऱ्या, थुईथुई नाचणाऱ्या, कुंडांत सांठून राहिलेल्या पाण्यानें ह्या बागेला अवर्णनीय शोभा प्राप्त करून दिलेली आहे. ह्या सबंध बागभर कारंज्यांचे ताटवे नुसते फुलून राहिलेले आहेत. कारंज्यांचीं बनें नाचत उभीं राहिलीं आहेत. कारंज्यांच्या कुंडांत पाण्याचीं फुलें फुललेलीं आहेत. कारंज्यांचे फवारे उंच जाऊन आपले पिसारे

वाऱ्यावर डोलवीत आहेत. कारंज्यांच्या फवाऱ्यांतून झुलत्या कमानी निर्माण झाल्या आहेत. तरळते घुमट बांधले गेले आहेत. आणि पाण्याचे छोटे छोटे प्रवाह ठिकठिकाणीं वहात आहेत. कुठें ते कुंडांत विसावतात, कुठें उंचावरून स्वतःला खालीं लोटून देतात, कुठें उतारावरून घसरतात, तर कुठें छोट्या छोट्या पायऱ्यांवरून खालीं कोलमडतात. ह्या पाण्याच्या प्रवाहांतून फेसाचे मोती सारखे ओघळत असतात आणि मध्येंच एखाद्या थेंबाच्या आणि धारेच्या पोटांत मावळत्या सूर्याचा तिरपा किरण शिरतो व मग रत्नें विरघळत आहेत असें वाटूं लागतें. आणि उडत्या कारंज्यांच्या भोंवतीं तर इंद्रधनुष्यें फेर धरून नाचत असतात.

त्या परस्परांना काटणाऱ्या रेखीव रस्त्यांवरून आम्ही सावकाश रमत गमत खालीं उतरलों. वाटत होतें कीं, कारंज्यांच्या फवाऱ्यांवर हात धरावा, कारंज्यांच्या घुमटांत जाऊन बसावें, नाहीं तर हलक्या रबरी चेंडूप्रमाणें त्या फवाऱ्यांवर उडत रहावें. पण वाऱ्याबरोबर येणाऱ्या तुषारांच्या थंड स्पर्शावरच समाधान मानून घ्यावें लागत होतें.

कारंज्यांवर प्रकाश पाडणारे दिवे, डोळ्यांत खुपूं नयेत अशा प्रकारें रंगवलेले व ठेवलेले पाहून मनाला बरें वाटलें.

येतांना होडींतून यावें अशा बेतानें आम्ही चालतच पलीकडल्या बाजूला गेलों—पाण्याचा खळखळाट ऐकत, आणि त्या पाण्याच्या बरोबर मध्यभागीं असलेल्या कारंज्याचा सर्वांत उंच फवारा पहात! धरणाच्या मध्यभागीं कावेरीची काळ्या दगडांत कोरलेली मूर्ति आहे. आणि तिच्या हातांतील कलशांतून पाणी सारखें गळत असतें. तिच्या कृपेची अविरत वृष्टि सारखी चालू असते. रस्त्यांत पुराणांतलीं कांहीं दृश्येंदेखील उभारण्याचा यत्न केलेला आहे. पण तें सगळें एकंदर बाजारी वाटलें. पलीकडे सुरूचीं उंच निमुळतीं झाडें होतीं आणि त्यांच्यामध्यें कारंज्यांनीं एक सुरूचें बन निर्माण केलें होतें. एक हिरवें होतें तर दुसरें पांढरें. तेथें एक नोकर चाव्या फिरवून फवाऱ्यांची उंची कमीजास्त करून तींत संगति निर्माण करीत होता. सुरूच्या झाडांचे आकार आणि त्यांमध्यें उडणाऱ्या फवाऱ्यांच्या आकृती ह्यांमध्यें सर्वत्रच सुसंगति राखण्यांत आली होती. जेथें सुरू घुमटांसारखे होते तेथें कारंज्यांचे फवारेदेखील घुमट बांधत होते. जेथें सुरू मिनारासारखे उंच गेले होते, तेथें कारंज्यांचे फवारेदेखील कोसळणारे मिनार उभारीत होते.

एका कारंज्यांच्या कुंडाशेजारीं आम्ही बसलों. त्या कुंडांत कोसळणाऱ्या तुषारांनीं फेसाचीं फुलें फुलत होतीं. वाटलें कीं तीं फुलें वेचावीं आणि वासंतीला माळायला सांगावीं. थंड ओल्या वाऱ्याच्या फडफडणाऱ्या हातरुमालानें तोंड पुसलें जात होतें. आणि जवळच पाण्याचे प्रवाह वहात होते, त्यांची बुरबुर बोबड्या कानगोष्टी करीत होती. पायऱ्यापायऱ्यावरून फेसाळत कोलमडणाऱ्या एका प्रवाहाला पाहून वाटत होतें कीं, असंख्य शुभ्र यक्षबालकें कोलांट्या उड्या मारायचा खेळ बेभानपणें खेळत आहेत. दुसरा प्रवाह सरळ उंचावरून खालीं पडत होता. त्या पाण्याच्या रुळणाऱ्या पडद्यावर समांतर रेशमी रेषा उमटल्या होत्या. आणि खालीं फेसाची झालर सारखी विसकटत होती. आणखी एक प्रवाह उतरणीवरून घसरत होता. त्याचे अनेक पदर एकमेकांवर तिरपे चढत होते. मध्येंच त्यांना मुरड पडत होती आणि मध्येंच त्यांचें विणकाम झाल्यासारखें वाटत होतें.

वर स्वच्छ निळ्या आकाशांत मोठाले ढग आपल्या जांभळ्या मस्तींत वाऱ्या-बरोबर वहात चालले होते. आणि सूर्यकिरण ते फोडून आंतलीं रंगांचीं भांडारें उघडीं करीत होते. पक्ष्यांच्या रांगा लष्करी शिस्तींत पश्चिमेला जात होत्या. पण ती लष्करी शिस्त फार वेळ टिकत नव्हती. मध्येंच त्या रांगांत आकर्षक बांक निर्माण होत होते आणि मध्येंच त्या विस्कटत होत्या. 'वातावधूता ग्रथितेव माला' असें, मला वाटतें भासानें त्यांच्याविषयीं जें म्हटलें आहे, तें मला त्या वेळीं एकदम पटलें.

हें सारें दृश्य पाहण्यांत मी अगदीं गुंगून गेलों होतों. वासंती गप्प होती त्याअर्थी तिची तीच अवस्था झाली असावी. पण तिचा एक डोळा मात्र बागेंत येणाऱ्या बायकांच्या सुंदर रेशमी पातळांवर होता. पण पातळें जितकीं छान होतीं तितक्या पातळांतल्या बायका देखण्या नव्हत्या. इकडच्या बायका एकंदर बावळटच.

थोड्या वेळानें आम्ही ज्याची उत्सुकतेनें वाट पहात होतों तें झालें. दाटणाऱ्या काळोखांत पांढऱ्या दिव्यांचें एक मोहोळ चमकूं लागलें. धरणावरची ती दिव्यांची रांग, बाजूलाच दिव्यांनीं झगमगणारें म्हैसूर सरकारचें राजेशाही वृंदावन हॉटेल आणि बागेंतलें हें दिव्यांचें मोहोळ! कारंज्यांतलें पाणी संपून त्यांतून नुसतें तेजच उधळलें जाऊं लागलें. पाण्याच्या प्रत्येक तुषाराला तेजाचा गर्भ राहिला आणि यक्षनगरीचें अद्भुत वातावरण सगळीकडे पेटलें. पलीकडच्या बाजूला लाल, हिरवे, पिवळे, निळे, असे रंगीबेरंगी दिवे चमकूं लागले. कोणी म्हणालें

कीं, आमच्या बाजूचे रंगीबेरंगी दिवे पेटणार नाहींत म्हणून ! त्यामुळें पलीकडे जाण्याकरितां आम्ही होडीची वाट पाहूं लागलों. पण होडी बेटी येईच ना ! आम्ही खूप थांबलों. होडीवाल्या माणसाला हांका मारायला सांगितलें. पण छे ! फरफरत ती मोटर-बोट आमच्याकडे येत आहे असें वाटे आणि ती परत जाई. ढग जमूं लागले. पावसाचीं चिन्हें दिसूं लागलीं. आम्हीं अधीर झालों. शेवटीं चालत जाण्याचा निश्चय आम्ही केला. तेव्हां मात्र होडी आली. आणि आम्ही होडींत उड्या घेतल्या.

धीरे धीरे होडी चालूं लागली. समोर दिव्यांची यक्षसृष्टि आणि तिचें पाण्यांतलें पुसट हलतें प्रतिबिंब ! आणि मध्यें फ्लडलाइटनें उजळलेल्या कारंज्याचा सर्वांत उंच फवारा. तो आपला तेजाळ पिसारा हवेंत डोलवीत होता. आणि त्याच्या कोसळत्या तुषाराचा एक सुंदर पडदा तयार झाला होता. त्या पडद्याला भेदून आमची होडी पलीकडे गेली आणि तुषारांचा शिडकाव आमच्या अंगावर झाला. होडीनें असें सारखें सावकाश चालत रहावें असें वाटत होतें.

पण असें फार वेळ वाटूं शकलें नाहीं. कारण पावसाचा शिडकाव आमच्या डोक्यावर होऊं लागला. वीज डोळे मिचकावूं लागली. आणि तिच्या प्रकाशांत तेथले दिवे त्यामुळें तात्पुरते कोमेजूं लागले. आणि आम्ही तक्रार करूं लागलों. पण होडी अगदीं सावकाश चालली होती. जलविहाराचा आनंद आम्हीं अगदीं पोटभर चाखावा असा त्या म्हाताऱ्या नावाड्याचा विचार दिसला. अगदीं चेंगटपणें होडी किनाऱ्याला लागली. आणि आम्ही जमिनीवर पाय टेकतों न टेकतों तोंच पावसाच्या सरींनीं कोसळायची एकच घाई केली. त्यामुळें एकच पळापळी झाली. उजळलेले ते घुमट, त्या कमानी, तीं सुरूंचीं बनें, ह्यांकडे बघायला आम्हांला फुरसतच मिळाली नाहीं. आम्हीं थोडा वेळ एका वेलींच्या घरांत आसरा घेतला. पण त्या जेव्हां चोवटपणें डोक्यावर पाणी ओतूं लागल्या, तेव्हां जिवाचा धडा करून आम्ही वृंदावन हॉटेलच्या दिशेनें पळत सुटलों. हॉटेलमध्यें पोंहोंचलों तेव्हां आम्हीं भिजून चिंब झालों होतों. आणि माझ्या चष्म्यावर पड- लेल्या थेंबामुळें सारें दृश्य सारवल्यासारखें दिसत होतें. उजेडाची कोशिंबीर कोणीं कालवली आहे असें वाटत होतें.

हॉटेलांत एकच गर्दी झाली होती. त्या गर्दीत मीं मोठ्या शिताफीनें एक टेबल पकडलें आणि अंगांतून पाणी गळत असतां तशीच खुर्चीवर बैठक मारून गरम पेय मागवलें. वासंती ओल्या पदरानें ओले केस पुशीत होती. आणि मीं

ओल्या रुमालानें च्ष्मा पुसण्याचा प्रयत्न करीत होतों. चष्मा काढला होता तरीसुद्धां माझ्या हॅटचें थालिपीठ झालेलें मला स्पष्ट दिसत होतें.

गरम पेय घेतल्यावर अंमळ तरतरी आली आणि मग कांहींशा स्वच्छ झालेल्या चष्म्यांतून मीं बागेकडे पाहूं लागलों. पण तेथें कांहींच नव्हतें. माझे डोळे बिघडलेले असले तरी एक सबंध बाग अदृश्य करण्याइतके ते मला फसवूं लागलेले नाहींत ह्याची मला खात्री होती. तेव्हां बागेंतले दिवे सगळे गेले असावेत असा मीं निष्कर्ष काढला आणि तो बरोबर होता.

बाग अशी अदृश्य झाल्यावर आम्हांला नेणारी सर्व्हिसची मोटर माझ्या डोळ्यासमोर अगदीं स्पष्टपणें दिसूं लागली. मोटरवाल्यानें आठ साडेआठ वाजेपर्यंत या असें आम्हांला सांगितलें होतें. तेव्हां तर आठ वाजून गेले होते. आणि पाऊस जरासुद्धां कमी होत नव्हता. एखाद्या मोटारवाल्या माणसाला 'लिफ्ट' देण्याबद्दल विनंती करावी म्हणून दाराजवळ आलों. पण बहुतेक मोटारवाले लोक पसार झाले होते. आणि ज्या दोन चार मोटारी शिल्लक होत्या त्यांचे मालक कांहीं बाहेर पडण्याचें चिन्ह दिसत नव्हतें.

तेवढ्यांत एक मोटर तेथें आली. आणि तीन लोक खालीं उतरले. ते उड्या मारीत हॉटेलांत शिरले. मीं त्यांना धरणाच्या टोकापर्यंत लिफ्ट देण्याची विनंती केली. ते म्हणाले, थोडा वेळ लाइट बघून आम्ही निघूं तेव्हां तुम्हांला नेऊं. थोडा वेळ म्हणजे तास दीड तास!

मीं म्हटलें, "लाईट गेले."

ते डोळे विस्फारून म्हणाले, "ऑं? आम्हांला वाटलें कीं अजून लाइट लागलेच नाहींत."

हॉटेलांत जाऊन त्यांनीं चौकशी केली आणि लाइट गेले अशी जेव्हां त्यांची खात्री झाली तेव्हां ते मोठमोठ्यानें शिव्या देत तावातावानें बाहेर पडले. त्यांच्या बोलण्यावरून असें कळलें कीं, रोषणाई पहाण्याकरितां ते मुद्दाम बंगलोरहून मोटरनें आले होते. आपली ट्रिप फुकट गेली म्हणून ते सगळेच चडफडत होते. पण त्यांतला एक इतका संतापला कीं तो म्हणाला, "आतां ह्या म्हैसूरला क्षणभरहि थांबायचें नाहीं. आतांच्या आतां उटकमंडला जाऊं या आपण."

तो जसजसा चिडूं लागला तसतशी बाकीच्यांना गंमत वाटूं लागली. आणि त्यांच्या विनोदाला बरीच गंमत येऊं लागली. ह्या भानगडींत ते सुदैवानें मला विसरले नाहींत. त्यांनीं मुद्दाम मला हुडकून काढलें आणि मग आम्ही त्यांच्या

मोटारींतून धरणाच्या टोकाला आलों. पण तेवढें अंतर काटायला आम्हांला पंधरावीस मिनिटें लागलीं. कारण धरणावर मोटारींची एकच झुंबड उडाली होती आणि बराच वेळ सगळ्याच मोटारी कर्णे वाजवीत जागच्या जागीं उभ्या होत्या. आमची सर्व्हिसची मोटर बहुधा निघून गेली असावी असें मला वाटलें. आणि तेवढ्या रात्रीं तेथें काय करायचें ह्याची काळजी वाटूं लागली. आणि माझा कयास कांहीं फारसा चुकलेला नव्हता. सर्व्हिसची मोटर अगदीं निघायच्या बेतांत होती. आणि आमची आणखी पांचच मिनिटें वाट पहायचा ड्रायव्हरचा विचार होता. आम्हीं मोटारींत उड्या माग्ल्या. आणि चारी बाजूंनीं पडदे बंद करून अंधार गुडुप करण्यांत आलें. तेवढ्यांत आमच्या पायावर पाय देत आधींच भरलेल्या मोटारींत आणखी दोन पॅसेंजर घुसले. आणखी दाटीवाटी करून बसले. आणि मग रस्त्यावरून चांचपडत मोटर पळूं लागली.

आवाजाच्या कोलाहलांतून जेव्हां मी निरनिराळे आवाज सुटे करूं लागलों तेव्हां मला एकदम आश्चर्याचा धक्का बसला. मोटारींत मागल्या बाजूला दोन तरुण संस्कृतमध्यें संभाषण करीत होते. ते बहुधा कुठच्या तरी संस्कृत पाठ-शाळेचे विद्यार्थी असावे. इंटरपर्यंतच माझें संस्कृत होतें. आणि संस्कृतशीं माझा संबंध तुटल्यासारखाच आहे. तरीदेखील त्यांचें बोलणें मला सहज समजूं शकलें. संस्कृत भाषा कठीण आहे असा जो माझा गैरसमज होता तो बराच कमी झाला! आणि संस्कृत ही राजभाषा करावी असा आग्रह धरणारांचें म्हणणें अगदींच कांहीं वेडेपणाचें नाहीं असें वाटूं लागलें. त्या गीर्वाण भाषेला अगदीं आजचे विसाव्या शतकांतले व्यावहारिक विचार व्यक्त करण्याकरितां ते सहजपणें वाकवत होते, त्याची फार गंमत वाटत होती. मात्र 'रघुवंश' आणि 'शाकुंतल' ज्या भाषेंत मीं वाचलें तिचा असले क्षुल्लक विचार व्यक्त करण्याकरितां होत असलेला उपयोग पाहून मला विचित्र वाटलें. खरोखर त्यांत विचित्र असें कांहींच नव्हतें; तरी पण तें मला रुचत नव्हतें.

मोटरवाल्यानें त्यांना उतरायला सांगितलें तेव्हां ते उद्गारले, "अवतरयति अस्मान्?" आणि उतरून चालूं लागले.

त्यांच्या तोंडांत संस्कृत भाषा खेळत असली, तरी खिशांत पैसे खुळखुळत नव्हते असें दिसलें.

आम्ही हॉटेलांत आलों तेव्हां एकमेकांना म्हणत होतों कीं, प्रधान आला नाहीं तें बरें झालें. बेटा पावसांत भिजला असता आणखी जास्त आजारी झाला असता.

पण आम्ही पहातों तों आमच्या हॉटेलच्या खोलीला कुलूप होतें. आम्हांला पहातांच हॉटेलच्या नोकरानें खोली उघडली. मीं तसाच धावत गेलों व मॅनेजर-जवळ चौकशी केली. त्यानें सांगितलें कीं, आम्हीं गेल्यावर प्रधानच्या अंगांत एकदम उत्साह संचारला होता आणि आगगाडीनें तो कृष्णराजसागरला गेला होता. आगगाडीनें जायचें म्हणजे स्टेशनपासून दोन तीन मैल चालावें लागतें. तें प्रधानला कसें झेपलें असेल ह्याची आणि आतां तो पावसांतून येणार कसा ह्याची मला चिंता वाटूं लागली.

पण अर्ध्या तासानें प्रधान आला. तो ओलाचिंब झाला होता आणि साधारण-पणें भिजलेल्या मांजरासारखा दिसत होता. त्याच्या हॅटमधून, नाकावरून व कानाच्या पाळयांवरून पाणी गळत होतें.

येतांना बापड्याला मोटया मेटाकुटीनें एका मोटारीच्या बाहेर क्लीनरप्रमाणें उभें रहाण्यापुरती जागा मिळाली होती. आणि तसा लटकत आणि भिजत तो परत आला होता.

"Bravo" म्हणून मीं त्याच्या पाठीवर थाप मारली तेव्हां माझा हात ओला-चिंब झाला. आणि तो किती थंड झाला होता त्याची प्रत्यक्ष कल्पना आली.

# : ७ : श्रीरंगपट्टण

सकाळीं उठून धडपडत आणि चडफडत गाड्या पकडणें हा आमच्या प्रवासां-तला नित्याचा क्रमच झाला होता. श्रीरंगपट्टणला जाण्याकरितां सोमवारीं आम्ही निघालों ते अशाच घाईत. श्रीरंगपट्टण हें म्हैसूरहून अजमासें दहा मैलावर आहे. तेथें पोहोंचायला गाडीला वीस पंचवीस मिनिटें लागतात. घाईत राहून गेलेले प्रातर्विधी उरकायला तेवढा वेळ पुष्कळ होता.

खडकाळ पात्रांतून आदळत आपटत वहात असतांना, कावेरीच्या प्रवाहाच्या झालेल्या चिरटोळ्या गाडी पुलावरून जात असतांना आम्ही पाहिल्या, आणि मग तात्बडतोबच श्रीरंगपट्टण स्टेशन आलें.

दक्षिणेच्या इतिहासांत अनेक वर्षें श्रीरंगपट्टणला फार लष्करी महत्त्व होतें. होयसाळा घराण्यांतील राजे, नंतर विजयनगरचे अधिपती, मग म्हैसूरचे वाडि-यार राजे व अखेर हैदर व टिपू ह्या सर्वांनींच श्रीरंगपट्टणला फार महत्त्व दिलें होतें. विजापूरचें सैन्य, मराठे, अर्काटचा नबाब व अखेर इंग्रज ह्यांनीं त्याला अनेकदां वेढे दिले. १७९९ सालीं इंग्रजांनीं तें जिंकेपर्यंत श्रीरंगपट्टणमध्यें कोणाचा शिरकाव झाला नाहीं. ह्याचें कारण काय, तें मला कळलें नव्हतें. पण श्रीरंगपट्टणला गेल्यावर त्याचा उलगडा झाला. श्रीरंगपट्टण हें कावेरीच्या पात्रांतलें एक बेट आहे. त्याची रुंदी कमी आहे. पण लांबी बरीच असावी. कावेरीनें आपल्या विळख्यांत घट्ट पकडलेलें हें बेट शत्रूच्या तावडींत जाणें कठीण असावें. आणि निदान सहा महिने तरी केवळ अशक्यच असावें. शिवाय श्रीरंगपट्टणची आज उभी असलेली तटबंदीदेखील मोठी भव्य आणि जबरदस्त वाटते. दीड दोनशें वर्षांपूर्वी ती जवळ जवळ अभेद्यच ठरली असली तर त्यांत कांहीं नवल नाहीं.

श्रीरंगपट्टणचें स्टेशन एखाद्या जुन्या वाड्यासारखें वाटतें. त्याचें एकंदर सामान आणि रचना जुनाट वाटते. एखाद्या जुन्या वाड्याचें सामान घेऊन त्याची बांधणी केलेली असावी, असें मला वाटलें. पण नंतर असें कळलें कीं तो एक जुन्या वाड्याचाच भाग होता.

प्रवासांत मीं अनेक स्टेशनें पाहिलीं. खरें म्हटलें म्हणजे रेल्वेचीं स्टेशनें

सगळीं सारखीं असण्याची शक्यता अधिक ! पण खरा प्रकार उलट होता. ह्या स्टेशनांचे अनेक प्रकार होते. अनेक वैशिष्टयें होतीं. कांहीं धुरकटलेलीं आणि काळवंडलेलीं होतीं, तर कांहीं कशीं स्वच्छ, चकचकीत होतीं. कांहीं जुन्या दगडी राजवाडयासारखीं होतीं, तर कांहींच्या रचनेवर देवालयाची वा मशिदीची छाया पडली होती. कांहीं गुदामासारखीं दिसायचीं, तर कांहीं गोठ्यासारखीं ! कांहीं छचोर आणि नटवीं होतीं तर कांहीं गंभीर आणि भव्य ! आणि तरी सर्व एक प्रकारें सारखींच होतीं. तिकीट ऑफिस, वेटिंग रूम्स, हॉटेलें, तो बाहेर जायचा गेट, ह्या गोष्टी साऱ्या स्टेशनांत होत्याच. आणि त्या कुठें व कशा असाव्या ह्याविषयींदेखील कांहीं सर्वसामान्य नियम असल्याचें आढळून येत होतें.

श्रीरंगपट्टणच्या स्टेशनवर चिकटवलेल्या जाहिरातींत वाघाशीं लढणारा टिपू असावा हें अपरिहार्यच होतें. कर्तबगार माणसांचा ठसा मानवी जीवनावर अनेक प्रकारें उठत असतो. कधीं तो उदात्त असतो, तर कधीं हास्यास्पदहि असतो. पण तो ठसा या ना त्या प्रकारें माणसांच्या वागणुकीला आणि चालीरीतींना वळण लावीत असतो. आपल्या महाराष्ट्रांत शिवाजी होऊन गेला म्हणून अनेक 'शिवाजी कोल्ड ड्रिंक हाउसें' दिसून येतात ही एक क्षुल्लक व हास्यास्पद गोष्ट झाली. पण शिवाजीनें कल्याणच्या सुभेदाराची सून पाहून जे उद्गार काढले, त्यामुळें मराठ्यांच्या स्वभावावर जो परिणाम झाला तो किती उदात्त आहे बरें !

श्रीरंगपट्टण स्टेशनवर परत जायला गाडी किती वाजतां आहे, त्याची चौकशी केली. आणि आम्हांला तेथें सुमारें तीन चार तास घालवायला मिळतील असें कळल्यावर कपभर कॉफीची माफक तरतरी पोटांत टाकून आम्ही स्टेशनच्या बाहेर पडलों. स्टेशनच्या बाहेरच दोन मोटालीं देवालयें दिसलीं. त्यांतलें एक श्रीरंगनाथाचें आहे. श्रीरंगपट्टण हें नांव, त्या देवालयावरूनच पडलें असावें. आधीं इतर स्थळें पाहून येऊन मगच तें देवालय पहावें असें आम्हीं ठरवलें. आणि मग नेहमींप्रमाणें एका टांगेवाल्याशीं हुज्जत घालायला सुरुवात केली. आम्हीं धूर्तपणानें म्हैसूरलाच टांग्याच्या भाड्याची चौकशी केलेली असल्यामुळें, टांगेवाल्याची मात्रा चालेना. सात मैल तुम्हांला फिरवायचें आहे, हें त्यानें सात मैल म्हणजे सतरा मैल आहेत असें भासवणाऱ्या आवाजांत आम्हांला सांगितलें. मग तब्बल दोन तास आम्हांला फिरवावें लागणार, ह्या गोष्टीचें दोन मणांचें ओझें त्यानें आमच्या मनांवर लादण्याचा प्रयत्न केला. जगांत गरीबांवर कसा अन्याय होतो तें भावनेनें ओल्या चिंब

झालेल्या आवाजांत सांगितलें. 'साहेब, पोटावर मारूं नका' असें त्यानें कळवळून सांगितलें. भगवान् परमात्म्याला दहा वेळां श्रीरंगपट्टणच्या स्टेशनच्या आवारांत आणलें. शेवटीं निघून जाण्याचा बहाणा तो करूं लागला. 'आम्हीं चालत जाऊं' अशी जेव्हां ठराविक धमकी आम्हीं दिली, तेव्हां उन्हांतून चालत जाणें म्हणजे चेष्टा नाहीं असें त्यानें आम्हांला बजावलें. आम्हीं असा वेळ काढला तर सगळें पाहून होणार नाहीं असा मित्रत्वाचा इषारा दिला. 'काय साहेब चार आण्याकडे पहातां?' अशी प्रौढपणाची शिकवण दिली.

पण आम्ही अगदीं मख्खपणें आणि बेफिकीरपणें तेथें उभे होतों. सिगरेट ओढीत होतों. हसत खिदळत होतों. आम्हांला ऊन लागेल, आमचें श्रीरंगपट्टण पाहून होणार नाहीं, अगर आमची गाडी चुकेल ह्या गोष्टीची आम्हाला यत्किंचित्हि धास्ती वाटत नव्हती. टिपूची टिंगल करीत स्टेशनवर तीन तास तंगड्या हलवीत बसायचीदेखील आमची पूर्ण तयारी होती. प्रवासांत वाटणाऱ्या सगळ्या शंकाकुशंका आणि चिंता आम्हांला अजिबात चावेनाशा झाल्या होत्या. कशाचीच आम्हांला पर्वा वाटत नव्हती. रोजच्या जीवनांत जें आपण सहसा अनुभवीत नाहीं असें एक स्वातंत्र्य आम्ही तेव्हां अनुभवीत होतों. आणि त्यांत आम्हांला खूप मजा वाटत होती.

आमची मजा होत होती खरी, पण बिचाऱ्या टांगेवाल्याच्या बूटपाटलोणवाल्या गिऱ्हाइकांविषयींच्या अपेक्षा साफ धुळीला मिळत होत्या. तो एक एक पायरी उतरत, आमचें म्हणणें कबूल करायच्या अगदीं बेतांत आला होता. पण तेवढ्यांत दुसरा एक टांगेवाला तेथें आला. आम्ही सागत होतों तेवढ्या पैशांत आम्हांला न्यायला तयार झाला आणि आम्ही टांग्यांत चढून बसलों. टांगा चालू झाला.

असें झालें तशीं मात्र पहिला टांगेवाला संतापला. जवळ जवळ पंधरा मिनिटें आपलें वक्तृत्व त्यानें आमच्यावर खर्च केलें होतें. त्याच्या दृष्टीनें आम्ही त्याचें नियोजित भक्ष्य होतों. पण अचानक तें भक्ष्य दुसऱ्यानेंच अक्षरशः उचलून नेलें होतें. आमच्या टांग्यामागोमाग त्यानें आपला टांगा पिटाळला. आणि तो आमच्या टांगेवाल्याला शिव्या देऊं लागला. तो हेटाळणीनें म्हणाला, "पहा! पहा! कसा cheap घेऊन जातो तो...वा! वा! फार चांगला टांगेवाला आहे. सस्त्यांत घेऊन जातो गिऱ्हाइकाला!..."

पण लवकरच त्याच्या भावनांचा जोष कमी झाला आणि आपला टांगा फिरवून तो दुसऱ्या गिऱ्हाइकाच्या शोधार्थ निघून गेला.

टांगा स्वस्तांत मिळाला खरा. पण त्यांतून जाणें तितकेंसें सुखदायक ठरलें नाहीं. आपण 'स्लो टांगा रेस'मध्यें भाग घेतला आहे अशी घोड्याची प्रामाणिक समजूत दिसली. त्याला चाबूक मारला म्हणजे तो धावण्याचा अभिनय करी, पण धावत मात्र नसे. त्यामुळें त्या खडबडीत रस्त्यावरच्या वाढत्या उन्हांत आम्हांला बराच त्रास झाला.

टांगेवाल्यानें आम्हांला पहिल्यानें घुमज पहायला नेलें. हा घुमज टिपूनें आपल्या बापाच्या म्हणजे हैदरच्या स्मृतिप्रीत्यर्थ बांधला. त्यांत हैदरची आणि त्याच्या बायकोची कबर आहे. आणि टिपू मेल्यानंतर त्यालादेखील तेथेंच पुरण्यांत आलें. टिपूच्या इतर कुटुंबियांच्या कबरी घुमजच्या इमारतीच्या बाहेर आहेत.

ह्या घुमजच्या एकंदर रचनेवर ताजमहालची बरीच छाप आहे. ताजमहालच्या बाहेरच्या प्रवेशद्वारांतून ताजमहाल जसा चौकटींत बसविल्यासारखा दिसतो तसाच हा घुमजहि बाहेरच्या प्रवेशद्वारांतून दिसतो. ताजमहालच्या समोर जसा बगीचा आहे, तसा ह्या घुमजच्या समोरहि आहे. त्यांतली आंब्याच्या झाडांची गर्द छाया मोठी प्रसन्न वाटली आणि त्यावर आलेल्या कैऱ्यादेखील कांहीं कमी आकर्षक वाटल्या नाहींत. ताजमहालकडे जाणाऱ्या रस्त्याच्या दुतर्फा जशीं सुरूचीं उंच झाडें आहेत तशीं घुमजकडे जाणाऱ्या रस्त्यावरहि आहेत.

ताजप्रमाणेंच उंच चौथऱ्यावर घुमज आहे. ह्या चौथऱ्याच्या पायऱ्या चढूं लागलें कीं, तेथला मुसलमान भटजी तुम्हांला जुतें काढायला सांगतो. आणि त्याच वेळेला बहुधा तेथला रक्षक फोटो काढायचे नाहींत अशी सूचना देतो.

ह्या जुन्या इमारतींचे फोटो काढण्याबद्दल आम्हांला पुष्कळ त्रास झाला. कोलारच्या खाणींचे अगर हिंदुस्थान एअरक्रॅफ्ट फॅक्टरीचे फोटो काढूं नका असें कोणीं म्हटलें तर तें समजण्यासारखें आहे. पण ह्या घुमजचे अगर मीनाक्षीच्या देवालयाचे फोटो काढूं नका, अगर त्याकरितां खास परवानगी घ्या, असें कोणीं म्हटलें तर तें वेडेपणाचें वाटतें. पण अशी 'आर्डर' आमच्यावर ठिकठिकाणीं पुन्हा पुन्हा बजावण्यांत आली.

घुमजची मुख्य इमारत चौकोनी आहे. आणि तिच्यावर मोठा घुमट आहे. इमारत पांढऱ्या दगडाची आहे. पण तिच्या चारी बाजूंस ज्या विस्तीर्ण पडव्या (corridors) आहेत, त्यांचे खांब काळ्या दगडाचे आहेत. पांढऱ्या इमारतीचे हे काळे [illegible]विसंगत वाटावे; पण तसे वाटत नाहींत. मधल्या बंद दालनांत

त्या तीन कबरी आहेत. रोझवुडचा दरवाजा उघडून त्या मुसलमान भटजीनें आम्हांला आंत नेलें. मुसलमानी पद्धतीप्रमाणें कबरींवर कापड टाकलेलें होतें. दक्षिणा वगैरे द्यावी लागलीच.

ह्या सर्व इमारतींवर नक्षीकाम आहे. पण मुसलमानी पद्धतीप्रमाणें त्यांत माणसांच्या आकृती नाहींत. त्यामुळें फुलांच्या आकृतीवर अगर नुसत्याच काल्पनिक नक्षीवर सगळा भर आहे.

मुख्य इमारतीच्या चारी बाजूंना मंडपासारख्या छोट्या इमारती आहेत. ह्यांचेपैकीं एका इमारतीला दोन उंच मिनार आहेत. ते नाजुक आणि ऐटबाज वाटतात. त्या मिनारांच्यावर आम्हांला चढायला मिळालें नाहीं.

हा घुमज आपल्या परीनें चांगला असला तरी ताजमहालच्या पासंगाला-देखील तो येणार नाहीं. त्या मानानें औरंगाबादचा बिबीका मकबरा ताजमहालशीं सर्वच बाबतींत अधिक जुळता आहे. शिवाय ताजमहालच्या धर्तीवर बांधलेल्या ह्या घुमजवर हिंदु देवालयांच्या रचनेचे व शिल्पाचे कांहीं संस्कार झाले आहेत असें मला वाटलें, आणि जरा गंमत वाटली.

ह्या घुमजाच्या प्रवेशद्वाराजवळच कर्नल बेलेचें त्याच्या पुतण्यानें बांधलेलें छोटेसें स्मारक आहे—स्मारक म्हणजे एक अगदीं छोटीशी घुमटी. ह्या कर्नल बेलेला टिपूनें १७८० सालीं झालेल्या लढाईत पकडलें. पकडलें ह्यांत नवल नाहीं; कारण टिपूचें सैन्य त्याच्या सैन्याहून कितीतरी मोठें होतें. ह्या बेलेला टिपूनें एका तळघरांत कैद करून ठेवलें होतें. हें तळघर अजून अस्तित्वांत आहे. ह्या तळघरांत तो १७८२ सालीं मृत्यु पावला. त्याच्या पुतण्याला त्याचें स्मारक टिपूच्या कबरीजवळ बांधावेंसें वाटावें ह्यांत नवल नाहीं. नवल हें कीं इंग्रजांनीं टिपूची कबर उखडून टाकली नाहीं. एखाद्या मुसलमान विजेत्यानें जरूर असें केलें असतें.

घुमज पाहून झाल्यावर आम्हीं टिपूचा उन्हाळी राजवाडा (Summer Palace) पहायला गेलों. ह्याच्या भोंवतीं देखील विस्तीर्ण बगीचा आहे. हैदर आणि टिपू ह्या दोघांनाहि बगीच्यांची फार हौस असावी. कारण बंगलोरला त्यांनीं केलेले बगीचे मीं पाहिले होते. आणि श्रीरंगपट्टणालादेखील ते दिसत होते.

टिपूच्या ह्या वाड्याचें नांव 'दर्यादौलत'. मला स्थापत्यकलेची कांहींच माहिती नाहीं. तेव्हां माझें मत चुकीचें असण्याचा संभव बराच आहे. पण बाहेरून ह्या राजवाड्याचा माझ्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं[illegible] एखाद्या

गुदामासारखा वाटला. आंत शिरल्यावर मग तो अधिक आकर्षक वाटला.

हा राजवाडा एकंदर लाकडीच दिसला. त्याचा कांहीं भाग मोडला होता, तो सरकारनें दुरुस्त केला आहे. वाड्याचा दर्शनी भाग व आंतलीं दालनें सगळीं लहान लहान वाटलीं. वरच्या मजल्यावरच्या दालनांना नक्षीदार आणि कमानींचे सज्जे आहेत. त्या सज्जांत बसून खालच्या दर्शनी भागांत काय चाललें आहे तें दिसतें. हें नक्षीकाम आणि हे सज्जे मला आवडले आणि त्या सज्जांत गुडघे मोडून बसलेल्या एखाद्या इराणी शहाजादीला, खालच्या दालनांत गुडघे टेकून बसून, आपल्या मोहब्बतीची दर्दभरी कहाणी सांगावी, अशी कल्पना माझ्या दिलच्या बदामाला चावून गेली.

हे जुन्या काळचे राजवाडे पाहून माझ्या मनांत कांहीं व्यावहारिक शंका आल्याशिवाय रहात नाहींत. ह्या राजवाड्याचीं दालनें अशीं असतात कीं तीं बंद करून एकटें बसणें अगर कांहीं खाजगी बोलणें शक्य वाटत नाहीं. ह्यावरून असा प्रश्न पडतो कीं त्या काळांत एकांत हवा असला तर हे लोक काय करीत असतील? कीं एकांताची कल्पना त्या काळीं नव्हतीच? माणसें सतत समूहांतच वावरत असत कीं काय? दुसरा असा प्रश्न पडतो कीं आपले मोठाले जनानखाने घेऊन जुने राजे ह्या लहान राजवाड्यांत कसे रहात असत? मोगल बादशहांच्या जनानखान्याविषयीं मीं जें वाचलें होतें, त्यावरून त्यांचे आग्र्याचे महाल खूप मोठे असतील अशी माझी कल्पना होती. पण मीं खरोखर पाहिलें तों ते महाल अगदींच लहान होते. चार सहा बायकाच त्यांत आरामशीरपणें राहूं शकल्या असतील. मग बाकीच्या बायका कुठें असत? कीं त्या सगळ्याच चेंगराचेंगरी करून तेथेंच रहात असत? आग्र्याच्या महालाविषयीं मला जें वाटलें तेंच श्रीरंगपट्टणच्या 'दर्यादौलत' विषयीं वाटलें.

'दर्यादौलत' पहातांना वासंतीनें देखील एक व्यावहारिक प्रश्न उपस्थित केला. जणुं आपण ही जागा आतां भाड्यानें घेणार आहोंत अशा थाटांत तिनें विचारलें, "पण इथें मोरी, संडास कुठें आहे?"

'दर्या दौलत'च्या भिंतींवर आणि छतांवर सर्वत्र रंगीत नक्षी आहे. ही नक्षी नाजुक आहे. पण तिचे रंग मला भडक वाटले. आणि त्या भडक रंगांमुळें दालनें लहान व कोंदट वाटत होतीं. मला वाटलें कीं त्या भडक रंगांच्या दालनांत कोणीहि फार वेळ बसलें तर त्याचें डोकें दुखूं लागेल.

'दर्यादौलत'च्या दर्शनी भागांत टिपूनें काढून घेतलेलीं चित्रें आहेत. एका

बाजूला निरनिराळ्या राजेरजवाड्यांचीं चित्रें आहेत. त्यांतल्या बायकांच्या गालांवर विंचवाच्या नांग्यांसारख्या केसांच्या नांग्या आणलेल्या आहेत. त्या मोठ्या गमतीदार दिसतात. तशाच प्रकारें कानाजवळ गालांवर बटा लोंबत्या ठेवणाऱ्या आजच्या मुली मीं पाहिल्या आहेत. त्याहि मला तितक्याच गमतीदार वाटतात, हें ओघानें आलेंच. त्या चित्रांतली एक बाई मर्दपणें हुक्का ओढतांना पाहून खिशांतल्या सिगरेटविषयीं तिरस्कार वाटूं लागला. आणि आपणहि एखादा हुक्का बाळगावा असें वाटूं लागलें.

तिथला रक्षक त्या चित्रांतल्या राजेराजवाड्यांचीं नांवें फटाफट सांगत होता. त्याच्या सांगण्यावरून ते सगळे टिपूचे समकालीन होते, अशी माझी कल्पना होत होती. पण त्यांतली एक बाई चितोडची पद्मिनी आहे असें तो म्हणूं लागला, तेव्हां त्याच्या ज्ञानाविषयीं शंका येऊं लागली. आणि त्याच्या बोलण्याकडे आधींच जें अर्धवट लक्ष होतें, तें नंतर पूर्ण दुर्लक्ष झालें.

दुसऱ्या बाजूला टिपूनें मुद्दाम काढवून घेतलेलें कर्नल बेलेच्या पराभवाचें चित्र आहे. आपण ह्या इंग्रजाला धूळ चारली ह्या गोष्टीचा टिपूला भलताच अभिमान वाटत असावा. हें चित्र बरेंच मोठें आहे. त्यात कर्नल बेलेचें सैन्य चारी बाजूंनीं टिपू व हैदर ह्यांनीं वेढलेलें आहे. एका बाजूनें लांबलचक टेलेस्कोपमधून बघून कर्नल लाली हा फ्रेंच अधिकारी ब्रिटिश सैनिकांवर तोफा डागीत आहे. टिपूचे सैनिक इंग्रजांचीं कापलेलीं मुंडकीं टिपूला दाखवीत आहेत आणि पालखींत बसलेला कर्नल बेले एकंदर फारच चिंतातुर झालेला आहे. तो चिंतातुर झालेला आहे असें आपण अनुमानच काढायचें. कारण चित्रांत चेहऱ्यावरचे भाव अजिबात दिसत नाहींत. सगळेच चेहरे लाकडी ठोकळ्यांसारखे दिसतात. इंग्रजांचीं कापलेलीं मुंडकीं आणि टिपूच्या सैनिकांचीं धडावर शाबूद असलेलीं मुंडकीं ह्यांच्या चेहऱ्यावरच्या भावांत मला तरी फरक दिसला नाहीं.

चित्रांत एका बाजूला निजाम पळतांना दाखविला आहे. ह्या निजामाची पळण्याची शक्ति अफाट असली पाहिजे. दुसरा बाजीराव पळपुटा खरा. पण निजामाची आणि त्याची तुलनाच करणें अशक्य. मला अशी एकहि लढाई आठवत नाहीं कीं, जिच्यांतून निजाम पळाला नाहीं. पण तरी तो कधीं कोणाच्या हातांत सांपडला नाहीं. तो खूप वर्षे जगला आणि आपलें राज्यदेखील त्यानें टिकवून धरलें. त्याला पळवून लावणाऱ्यांचीं राज्यें बुडालीं, पण त्याचें राज्य मात्र शाबूद राहिलें. मला वाटतें कीं लढाई करण्यापूर्वी निजामाचे सेनापती

त्याला विचारीत असावे, " आज मराठ्यांशीं लढाई आहे. पलायनाला केव्हां सुरवात करायची ? आणि आश्रय कुठें घ्यायचा ? "

त्या चित्रांत एक चरणारी गाय दाखवली आहे. तें पाहून मीं आश्चर्यानें विचारलें,

" ह्या लढाईच्या चित्रांत हे प्राणी कशाला आले ? "

त्या रक्षकानें सांगितलें कीं त्या प्राण्यांच्या चित्रांत एक रूपक आहे. टिपू निजामाबद्दल असें म्हणतोय् कीं तूं लढाईत गाईसारखा निरुपद्रवी आहेस. त्या चित्रकारानें बहुधा खांडेकरांच्या रूपककथा वाचल्या असाव्या !

गाईला घाबरणाऱ्या वासंतीला मात्र गाय निरुपद्रवी असते हें पटूं शकलें नाहीं.

ह्या राजवाड्यांत म्हणे वेलस्ली कांहीं दिवस रहात असे. आपल्या देशापासून हजारों मैल दूर असलेल्या ह्या देशांत येऊन तो जिंकणाऱ्या ह्या मूटभर इंग्रज लोकांविषयीं मला नेहमींच कुतूहल वाटतें. केवढ्या अचाट, धाडसी कल्पना असतील त्यांच्या ! केवढा जबरदस्त आत्मविश्वास वाटत असेल त्यांना !

राज्य कसें करावें ह्याविषयींच्या त्यांच्या कल्पना व्यापक आणि उदार असाव्या असें दिसतें. निदान या राजवाड्यांत असलेल्या लॉर्ड डलहौसीच्या नोटिशीवरून तरी तसें दिसून येतें. एक ऐतिहासिक महत्त्वाचें ठिकाण म्हणून या राजवाड्याचें जतन करण्याचें ब्रिटिश सरकारनें ठरविलें असल्याचें त्यांत म्हटलें आहे. त्या नोटिशीवरून असेंहि दिसतें कीं, टिपूचा पराभव झाला तेव्हां त्यानें आपल्या राजवाड्यांतलें कर्नल बेलेच्या पराभवाचें चित्र अर्धवट खरडून टाकलें होतें. ( ह्यावरून टिपूच्या स्वभावावर गमतीदार प्रकाश पडतो. ) पण मग इंग्रजांनीं तें चित्र पुन्हा पहिल्याप्रमाणें रंगवून दुरुस्त केलें. ब्रिटिश साम्राज्यवादाच्या त्या चढत्या काळांत, ब्रिटिश विजेत्यांनीं इतकें औदार्य दाखवावें हें विशेष वाटतें. दुसऱ्या एखाद्या विजेत्यानें तें चित्र पुसून त्यावर टिपूच्या पराभवाचें चित्र रंगवलें असतें.

मात्र कदाचित् असेंहि असेल कीं, ब्रिटिश लोकांना आपल्या सामर्थ्याविषयीं आणि मोठेपणाविषयीं विलक्षण आत्मविश्वास वाटत असेल आणि आपल्या मोठेपणाला अशा चित्रांनीं बाध येईल असें त्यांना वाटलें नसेल. कदाचित् तें चित्र पाहून त्यांना नुसतें हसू आलें असेल.

पण ब्रिटिशांचें औदार्य नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. राज्यकर्ते ह्या नात्यानें

त्यांनीं तें अनेक प्रकारें दाखविलें आहे. ब्रिटिश गेले; पण त्यांची ही परंपरा आपण चालू ठेवली पाहिजे.

राजवाडा पाहून झाल्यावर आम्ही टिपूनें बांधलेली मशीद पहायला गेलों. आम्ही तेथें जातांच तेथला पेश इमाम पुढें आला आणि आम्हांला मशीद दाखवूं लागला. आमच्या हिंदु देवळांत अमक्या ठिकाणीं जायचें नाहीं, वगैरे बंधनें असल्यामुळें आम्हीं जरा बिचकतच आंत प्रवेश केला.

तेव्हां पेश इमाम म्हणाला, "तुम्ही कुठेंहि जाऊं शकतां. जुतें बाहेर काढून ठेवलें कीं, आमच्या मशिदींत कोणत्याहि धर्माचा मनुष्य मोकळेपणानें कुठेंहि जाऊं शकतो."

त्याच्या त्या उद्गारांचा माझ्या मनावर फार परिणाम झाला. आमच्या हिंदूंच्या धार्मिक विचारांत फार मोठें औदार्य आणि विशालता भरलेली आहे; पण आमच्या आचारांत मात्र संकुचितपणा, भेदभाव, सोवळें-ओवळें ह्यांची भरताड आहे. बाकीचे धर्म सर्वांना आपल्या पोटाशीं ओढायला उत्सुक असतात. हिंदु धर्माचें तसें नाहीं. उलट कोणी बाटला म्हणून, कोणी शूद्र म्हणून आम्ही लोकांना बाहेर ढकलीत आलों आहोंत. मला असें वाचल्याचें आठवतें कीं, काश्मीरमधल्या लोकांनीं पुन्हा हिंदु होण्याची इच्छा दर्शवली असतां काशीच्या पंडितांनीं त्यांना शुद्ध करून घ्यायला नकार दिला. त्यांनीं तेव्हां तसें केलें नसतें, तर काश्मीरच्या प्रश्नाचें स्वरूप आज निराळें झालें असतें.

पेश इमाम हिंदु-मुस्लिम ऐक्याची उदार अघळपघळ कहाणी सांगत होते. हिंदु आणि मुसलमान भावाभावासारखे हिंदुस्थानांत नांदत होते, असें त्यांचें म्हणणें. त्यांच्यांत वैर माजवलें तें ब्रिटिशांनीं! त्यांनीं ह्याबाबत पूर्णैय्याचें उदाहरण दिलें. पूर्णैय्या हा ब्राह्मण टिपूचा प्रधान होता. त्यानें फितुरी करून श्रीरंगपट्टण जिंकायला इंग्रजांना मदत केली असा त्याच्यावर आरोप आहे. पेश इमाम ह्यांचें म्हणणें असें कीं, पूर्णैय्या बेइमान नव्हता. उलट टिपूचे दोन मुसलमान सरदार बेइमान होते. त्यांनीं टिपूचा घात केला. पूर्णैय्या म्हणे इतका चांगला होता कीं, त्यानें एका हिंदु देवळाचें सामान टिपूला मशीद बांधायला दिलें! पण हे इंग्रज लोक मोठे बदमाश! त्यांनीं अशी बातमी पसरवली कीं, पूर्णैय्यानेंच फितुरी केली. आणि आमचे भोळे भाबडे हिंदु-मुस्लिम भाई त्यावर विश्वसून परस्परांची दुष्मनी करूं लागले. तोबा! तोबा! काय हा इंग्रजांचा कावा!

त्या मशिदींत पहाण्यासारखें कांहींच नव्हतें. मला ती अगदींच सामान्य

वाटली. तिला दोन उंच मिनार आहेत, हेंच तिचें वैशिष्टय. बोलत बोलत आम्ही त्यापैकीं एका मिनाराजवळ आलों. आम्हांला वाटलें कीं पेश इमामसाहेब आमच्याबरोबर वर येतील. पण इमामसाहेबांची जीभ तल्लख असली, तरी बुद्धेपणामुळें पाय कमजोर झाले होते. त्यामुळें आम्हांला वर जाण्याची शिफारस करून इमामसाहेब मागें वळले.

वाटोळ्या अरुंद जिन्यावरून ठेचकळत आम्ही वर चढलों. धापा टाकीत एक मजला चढल्यावर मागचा पुढाऱ्याला विचारीत होता. "काय संपलें का?" पण दर वेळेला आणखी एक मजला वर असल्याचें आढळून येई. अखेर जिना संपला, तेव्हां वर जायला एक शिडी होती. 'हॉव हॉव' करीत आम्ही मिनारावरून सृष्टिसौंदर्य पाहिलें. "हें कावेरीचें पात्र" ही माहीत असलेली माहिती एकमेकांना दिली. आणि "ती पहा चामुंडी टेकडी" असें आश्चर्यानें आ वासून एकमेकांना सांगितलें.

मागें मी महाबळेश्वरला होतों तेव्हां तेथें सृष्टिसौंदर्य पहायला आलेले लोक बोट दाखवून म्हणत, "तो पहा प्रतापगड." नंतर आम्ही प्रतापगडाला गेलों तेव्हां तेच लोक बोटें दाखवून विलक्षण कौतुकानें एकमेकांना सांगूं लागले, "तें पहा महाबळेश्वर!"

असो. मिनारावरून सृष्टिसौंदर्य पहातांना वासंती तेथून आमच्या खालीं ठेवलेल्या चपला जाग्यावर आहेत कीं नाहीं तें बघायला विसरली नाहीं.

"अय्या! तें पहा......" असें तिनें बराच वेळ म्हटल्यावर मीं अतिशय उत्साहानें म्हटलें, "अय्या! ती पहा वासंती."

त्यामुळें माझ्या पाठींत एक चापटी बसली आणि कांहीं वेळ संभाषण अशक्य झालें.

नंतर ठेचकळत उतरण्याचा कार्यक्रम झाला. शिडीवरून उतरतांना माझा पाय प्रधानच्या डोक्यावरच्या फेल्ट हॅटवर पडला तो केवळ नजरचुकीनें. माझा प्रयत्न त्याच्या नाकावर पाय देण्याचा होता.

इमामसाहेबांना दक्षणा देऊन आम्ही टांग्यांत बसलों. आतां थोडा वेळ बसायला मिळेल अशी अपेक्षा! पण घोडा जागच्या जागीं जरा अंमळ हलला आणि टांगेवाला म्हणाला, "वॉटर गेट देखो साब."

नदीवरून पाणी आणण्याकरितां तटबंदींतून केलेला हा बोगद्यासारखा रस्ता आहे. ह्याचें वैशिष्टय असें कीं, कमरेवर हात ठेवून त्याचें कसें कौतुक करावें

ह्याचा तुम्ही विचार करीत असतां, त्यांतून अचानक उधळलेल्या गाई येतात आणि तुम्हांला मुसंडी मारून पुढें जातात.

इंग्रजांनीं चढाई केली, तेव्हां स्वतः टिपू ह्या वॉटर गेटजवळ लढायला गेला. आणि तेथेंच लढतां लढतां मेला. तो जेथें पडला तेथें एक दगड खूण म्हणून ठेवलेला आहे. त्या ठिकाणाजवळच टिपूच्या पूर्णपणें मोडून गेलेल्या वाड्याचा चौथरा आहे.

तें सगळें पाहून क्षणभर माझ्या डोक्यांत इतिहासाचीं पानें फडफडलीं.

पुन्हां टांग्यांत चढून बसलों. आणि मग उतरलों तें तळघर पहायला. ह्या तळघरांत टिपूनें कर्नल बेलेला कैदेंत ठेवलें होतें. अनेक खांब आणि कमानी असलेलें तें तळघर कांहीं भयानक वाटलें नाहीं. तें एका बाजूनें उघडें होतें. तेथें चांगला उजेड होता आणि हवा खेळत होती. कदाचित् पूर्वी तें सर्व बाजूंनीं बंद असेल. तळघरांत एक जुनी तोफ पडलेली आहे.

अखेर आम्हीं रंगनाथाचें देवालय पाहिलें. इकडच्या पद्धतीप्रमाणें देवालयाला टोलेजंग गोपुर आहे. हीं गोपुरें कितीहि पाहिलीं, तरी दर वेळेला आपल्या भव्यतेनें आणि शिल्पाच्या विपुल सौंदर्यानें मन भरून आणि भारून टाकतात. हें देवालय इकडच्या देवळांच्या मानानें मोठें नसलें तरी आपल्या इकडच्या देवळांहून खूपच मोठें आहे. इकडच्या देवालयांची भव्यता आणि विस्तार पाहिला कीं, आपलीं देवळें खुजीं आणि हास्यास्पद वाटूं लागतात. देवालयांत असंख्य खांब आहेत. गाभाऱ्याच्या द्वाराजवळ गरुडाची मोठी मूर्ति आहे. गरुडाचें नाक आहे चोंचदार आणि शरीर आहे पीळदार. सळसळतें सामर्थ्य तिच्यांतून प्रतीत होतें.

आंत गाभाऱ्यांत अपरिहार्यपणें काळोख होता. पुजाऱ्यानें दिवटी लावून आम्हांला शेषशायी विष्णूची मूर्ति दाखवली. मूर्ति काळ्या पाषाणाची आहे. ती अजमासें दोन पुरुष लांब असावी. भगवान् मुकुट घालून झोपले आहेत. मुकुट घालून झोपणें एकंदरींत गैरसोयीचेंच असावें. भगवानांचे पाय चुरीत लक्ष्मी बसली आहे. तिची मूर्ति मात्र अगदींच लहान आहे. लक्ष्मी-नारायणाचा हा जोडा फारच विजोड होता.

हें रंगनाथाचें देवालय फार जुनें आहे. हैदर आणि टिपू ह्यांनीं त्याचा नाश केला नाहीं ह्याचें कारण म्हणे ते ह्या रंगनाथाला मानीत असत. निदान अशी आख्यायिका आहे.

"आणखी कांहीं पहायचें नाहीं ना रे बुवा ?" आम्हीं बाहेर आल्यावर

टांगेवाल्याला प्रश्न केला.

"इथें एक झुलती कमान होती, साहेब. पण ती अलीकडे कोसळली." टांगेवाला हळहळला.

"छान झालें!" असें म्हणून सुस्कारा सोडीत आम्हीं त्याचे पैसे दिले आणि स्टेशनवर गेलों. आम्ही वेळेवर गेलों होतों. तेव्हां गाडी लेट होणें अपरिहार्यच होतें.

स्टेशनवर बसून आम्हीं शहाळीं खाल्लीं. त्यांतलें एक जून होतें अशी आम्हांला तक्रार करायची होती. कानडी तर सोडूनच द्या, पण 'जून' ह्याला हिंदी प्रतिशब्दहि सुचेना. तेव्हां रागानें 'जून जून' असें पुटपुटण्यापलीकडे आम्हांला कांहींच करतां येईना. भाषा येत नसली म्हणजे मनुष्य अगदीं मूर्ख ठरतो यांत शंका नाहीं.

आमचें पुटपुटणें ऐकून तो शहाळीं विकणारा मुलगा म्हणाला, "जून?" आणि मग "जून, जुलै, ऑगस्ट..." असें मोटमोठ्यानें हसत म्हणूं लागला.

त्यानें कोटी केली होती. बेटा महाराष्ट्रांत जन्माला आला असता, तर प्रथितयश साहित्यिक झाला असता.

अखेर गाडी आली व यथावकाश हॉटेलमध्यें पोहोंचलों. आंघोळीला भरपूर गरम पाणी होतें. त्यानें अंघोळ केल्यावर शीण गेला आणि आलाहि. 'पोट फार भरलें आहे, जेवायचें नाहीं,' असा आमचा निश्चय होता. पण परस्परांच्या आग्रहामुळें तो मोडावा लागला. जेवण झाल्यावर खोकल्यावर औषधें घेण्याचा सांघिक कार्यक्रम झाला. मग अंमळ वामकुक्षी...

चार वाजतां चंदनी तेलाचा कारखाना पहायला निघालों. वासंतीनें बिछान्यांतून हलण्याचें नाकारलें. आणि जांभया देत "आतां फार झालें. आपण नाहीं हलणार. No, No, आतां आपण सरळ मुंबईला जाणार बुवा. Home, sweet home!" वगैरे ती बडबडूं लागली.

म्हैसूरपर्यंत जाऊन परतायचें असें तिनें आधींच ठरवलें होतें. त्यांत वावगें कांहीं नव्हतें असें आतां तिचें मत झालें होतें.

तिनें असा सत्याग्रह केल्यामुळें मी व प्रधान टांग्यांतून निघालों. टांगा थोडा वेळ चालला आणि थांबला.

आम्हीं विचारलें, "काय रे बाबा?"

टांगेवाला गंभीरपणें म्हणाला, "घोडा पिसाब् करतोय् साहेब."

त्याच्या टांग्यांतून पुन्हा हॉटेलवर येईपर्यंत हा प्रकार चारदां झाला. घोडे व बैल हा प्रकार धावतांना करूं शकतात, असा आमचा अनुभव होता. पण ह्या टांगेवाल्याचा घोडा मोठा लाडका दिसला. नशीब कीं घोड्यानें विधि केल्यावर 'सफाई' करण्याकरितां त्यानें बरोबर एक लोटी बाळगली नव्हती!

म्हैसूरमधल्या सर्व इमारतींप्रमाणेंच चंदनी तेलाच्या कारखान्याची इमारतदेखील चांगली आहे. कारखान्याच्या आवारांत आम्ही गेलों तों पुष्कळसे कावळे मोठ्यानें काव काव करीत तेथें आले. ते सगळे आपल्यापैकीं एकाचा त्वेषानें पाठलाग करीत होते. कारखान्याच्या आवारांत त्यांनीं त्याला पाडलें आणि चोंची मारून बेजार केलें. तो बापडा त्यांच्या तावडींतून कसाबसा निसटून उडाला आणि मग बाकीचे कावळेदेखील त्याचा त्वेषानें पाठलाग करीत निघून गेले. त्या कावळ्यानें, त्यांच्या सामाजिक नीतिनियमांचा असा कोणता भयानक भंग केला असेल, कोण जाणे!

आम्ही प्राध्यापक आहोंत असें कळतांच मॅनेजरसाहेबांनीं आमचें विशेष स्वागत केलें. कारण ते स्वतःहि ह्या कारखान्याचे मॅनेजर होईपर्यंत प्रोफेसरच होते. आपलें (मला वाटतें) केमिकल इंजिनिअरिंगचें खातें बंद करून सरकारनें आपली ह्या कामावर बदली केली, ह्याबद्दल ते खूप चिडलेले दिसले. आणि तो राग आमच्यासारख्या परक्या माणसांजवळदेखील ते वक्तृत्वपूर्णतेनें व्यक्त करीत होते.

कारखान्यांत फिरून आम्हीं तेल काढण्याची क्रिया पाहिली. ती अगदींच सोपी आहे. यंत्राच्या साहाय्यानें पहिल्यानें चंदनाच्या लाकडांचा बारिक भुगा करतात. मग तो मोठ्या भांड्यांत बंद करून, त्यांतून पाण्याची वाफ सोडतात. तींत चंदनाच्या तेलाची वाफ मिसळून ती मिश्र वाफ निराळ्या ठिकाणीं जाते. तेथें ती थंड होऊन द्रवस्वरूप होते. असें झालें कीं तेल हलकें असल्यामुळें वर तरंगतें व पाणी खालीं रहातें. मग वरचें तेल काढून घेण्यांत येतें. आणि त्यांत जें थोडें पाणी असतें तें उकळून काढून टाकण्यांत येतें.

कारखान्यांत चंदनाचा इतका घमघमाट होता कीं आमच्या हाताला चंदनी तेल लावलें, तेव्हां त्याचा निराळा असा वास आम्हांला आलाच नाहीं.

म्हैसूरमध्यें होणारें सर्व चंदन सरकारी मालकीचें समजलें जातें. एखाद्याच्या बागेंत जरी चंदनाचें झाड उगवलें, तरी सरकारला तें कळवावें लागतें. ह्यामुळें चंदनाचें तेल काढण्याची मक्तेदारी सरकारचीच आहे. मक्तेदारी असली

म्हणजे खूप फायदा मिळतो हें आम्हांला माहीत होतें. पण मॅनेजरसाहेबांनीं जेव्हां खरोखर किती फायदा होतो तें सांगितलें तेव्हां आम्ही थक्कच झालों. त्यांनीं सांगितलें कीं सरकारचें सहा लाख रुपयांचें भांडवल कारखान्यांत गुंतलेलें आहे. आणि फायदा किती होत असेल असें तुम्हांला वाटतें? साठ लाख रुपये! सहारों टक्के फायदा! आणि कोलारला दहा हजार फूट खोल जाऊन सोनें काढ-णाऱ्या कंपन्या बापड्या साडे सहा टक्के कमावीत होत्या!

मॅनेजर म्हणाले कीं कारखान्याच्या कार्यक्षमतेंत वाढ करायला पुष्कळच जागा होती आणि तशी सुधारणा झाल्यावर नफ्यांत वाढ झाली असती.

ह्या कारखान्यांत दर महा ४००० पौंड तेल तयार होतें. ह्या तेलाचा बहुतेक खप परदेशांत होतो. त्याचा उपयोग अत्तरें बनविण्याकरितां होतोच, परंतु त्वचेच्या रोगावरचें औषध म्हणूनदेखील त्याचा फार मोठ्या प्रमाणावर उपयोग होतो.

मॅनेजरनीं असें एक विधान केलें कीं आपल्या देशांत होतात त्याहून पाश्चात्य देशांत त्वचेचे रोग अधिक होतात. कारण म्हणे त्यांच्या अंगावर सारखे कपडे असतात. शिवाय ते अंघोळ करीत नाहींत व त्यांच्या अंगाला सूर्यप्रकाशदेखील लागत नाहीं. ह्या म्हणण्यांत तथ्य असेल कदाचित्. पण आपल्या देशांत त्वचेचे रोग फार मोठ्या प्रमाणावर असल्याचें मला तरी आढळून आलें आहे आणि हे रोग खालच्या वर्गांतच नाहींत, तर मध्यमवर्गीयांत देखील फैलावलेले आहेत.

हा कारखाना पाहून झाल्यावर रेशमाचा कारखाना पहाण्याचा आमचा विचार होता. पण पांच वाजून गेल्यामुळें कारखाना बंद झाला होता. तेव्हां टांग्यांतूनच त्याचे बंद दरवाजे पाहत आम्ही परतलों.

हॉटेलवर आलों तेव्हां वासंतीच्या अंगांत उत्साह संचारला होता. उत्साह संचारणें साहजिक होतें. कारण बाजारांत जाऊन खरेदी करण्याचे विचार तिच्या डोक्यांत आले होते.

संध्याकाळीं दिवे लागण्याच्या सुमारास आम्ही बाजारांत गेलों. रात्रीच्या वेळेला म्हैसूर शहर अगदीं मुंबईसारखें दिव्यांनीं लखलखत असतें. त्यामुळें फिरायला मजा वाटते.

येथें पाहुण्यांनीं विकत घेण्यासारख्या गोष्टी म्हणजे रेशमी साड्या व कापड आणि चंदन, हस्तिदंत वगैरेंच्या कलाकुसर केलेल्या वस्तू! वासंतीनें रेशमी साड्यांची मोठ्या उत्साहानं चौकशी केली. पण त्यांच्या जबरदस्त किंमती पाहून तिनें आपली खरेदी आवरती घेतली.

नंतर आम्ही कलाकुसरीच्या वस्तूंच्या एका दुकानांत गेलों. त्याचें आणि आमचें कांहीं पटलें नाहीं. तेथून बाहेर पडून आम्ही रमत गमत दुसऱ्या एका दुकानाजवळ थांबलों आणि बाहेरूनच तेथील माल पाहूं लागलों.

तेवढ्यांत त्या दुकानाच्या मालकानें आम्हांला आंत बोलावलें. मीं म्हटलें, "आम्ही नुसते पहात आहोंत."

तो मृदुपणें म्हणाला, "मग आंत येऊन पहा कीं. विकत घ्यायची कांहीं जबरदस्ती नाहीं."

सगळेच दुकानदार असें म्हणतात. पण हे गृहस्थ ते मनापासून बोलत आहेत असें वाटलें. आणि आम्ही आंत शिरलों.

आम्हीं आंत शिरतांच ते मराठींत म्हणाले, "आपण मुंबईकडचे का?"

आम्हांला आश्चर्य वाटलें. आनंदहि झाला. मीं म्हटलें, "हो. आपणहि मुंबई-कडचे का?"

ते म्हणाले, "नाहीं. पण मी कांहीं वर्षे मुंबईला होतों."

आमच्या भाषेंत बोलून त्यानें आमच्या मनांत स्वतःविषयीं विश्वास आणि थोडी आपुलकी निर्माण केली होती.

आम्ही ही वस्तु पहा, ती वस्तु पहा असें करूं लागलों. किंमती विचारूं लागलों. विचारविनिमय करूं लागलों. शांतपणें तो आम्हांला वस्तू काढून दाखवीत होता. पण त्या गोंधळांत आमची कांहींच खरेदी होत नव्हती. तो-देखील विकत घेण्याचा जास्त आग्रह करीत नव्हता. आणि आम्हांला वस्तू दाखविण्याचा कंटाळा तर मुळींच दाखवीत नव्हता. त्यामुळें न बिचकतां आमचें मन त्या वस्तूंत रमत होतें.

थोडा वेळ इकडचें तिकडचें बोलणें झालें. त्यानें आमची चौकशी केली. आणि मग तो हळूच म्हणाला, "मी बरेच दिवस मुंबईला होतों आणि तुम्ही-देखील मुंबईचे आहांत. म्हणून माझी अशी इच्छा आहे कीं तुम्हीं माझ्या दुकानांत सरबत प्यावें. तुमची कांहीं त्याला हरकत आहे का?"

मीं ताबडतोब संशयानें त्याच्याकडे पाहिलें. पण सरळपणें आमच्याकडे पहात तो म्हणाला, "तुम्हीं माझ्याकडून माल घ्यावा म्हणून नाहीं असें मीं करीत. पण माझी आपली तशी इच्छा आहे."

असें कोणी परका माणूस म्हणाला तर तें खोटें वाटतें. पण त्या माणसाच्या बाबतींत मला तें खरें वाटलें. आम्हीं सरबत घेतलें. जिन्नस पहाणें चाललेंच होतें.

मग तो आर्जवीपणानें म्हणाला, " खरें सांगूं का ? हे इतके जिन्नस पाहून तुमचा गोंधळ उडाला आहे. तुम्ही जर रागावणार नसाल तर मी एकेक वस्तु तुम्हांला दाखवतों. ती घ्यायची कीं नाहीं तें तुम्ही ठरवा. मग दुसऱ्या वस्तू पहा अं ?"

दुकानदारानें असें म्हटलें म्हणजे गिऱ्हाइकाला राग येतो. तो आपल्याला वस्तू नीट पाहूं देत नाहीं असें वाटतें. पण ह्या माणसानें आम्हांला आधीं पंधरा मिनिटें गोंधळ घालूं दिला असल्यामुळें आम्हांला त्याचें तें आर्जवी बोलणें पटलें.

पण तेवढ्यांत मीं मात्र त्याच्याकडे नीट निरखून पाहून घेतलें. कारण हा माणूस एक कुशल विक्रेता आहे, हें माझ्या ध्यानांत आलें होतें. गृहस्थ मध्यम उंचीचा, किडकिडीत होता. त्याचा चेहरा व आवाज दुसऱ्यावर छाप वठवणारा मुळींच नव्हता. असें असूनदेखील तो मोठा कुशल विक्रेता होता.

पहिल्यानें कमी किंमतीच्या वस्तू, मग जास्त किंमतीच्या, मग पुन्हा कमी किंमतीच्या अशा प्रकारें तो वस्तू आम्हांला दाखवीत होता. आपण फार पैसे खर्च करीत आहोंत अशी कल्पना तो आमच्या मनांत रुजूं देत नव्हता. आणि तरी सारखें आणखी कांहीं घ्यावें अशी इच्छा आमच्या मनांत निर्माण करीत होता.

सुरवातीला तो आमच्या कलाकलानें घेत होता. पण मग हळुहळू तो आम्हांला मार्गदर्शन करूं लागला. अमकें घ्या, तमक्याची तुम्हांला जरुरी आहे, असें म्हणूं लागला. पण तो असें म्हणत असतांना तो स्वतःचें हित पहातो आहे असें मुळींच वाटत नव्हतें. आमचा कल त्यानें ओळखला होता आणि आमच्या मनांतलेंच तो बोलत होता. निदान तसें वाटत होतें.

मी आणि वासंती ह्यापैकीं वासंतीच्या हौशीला अधिक महत्त्व आहे हें ओळखून तो एखादी गोष्ट घ्यावी असें तिला पटविण्याचा मुख्यतः प्रयत्न करीत होता. पण एकंदर व्यवहाराच्या मीं बाहेर आहें असें तो मला मुळींच वाटूं देत नव्हता. उलट एखाद्या वरिष्ठ कोर्टासारखा तो माझा उपयोग करीत होता.

आपल्या किंमतींत तो मुळींच फरक करायला तयार नव्हता. त्यामुळें आधीं आम्ही थोडे असंतुष्ट झालों तरी पुढें तो फसवीत नाहीं असा आम्हांला विश्वास वाटूं लागला.

तो म्हणाला, " आधीं किंमती जास्त सांगून मग त्या कमी करणें मला योग्य वाटत नाहीं."

मीं म्हटलें, " पण आतांच्या तुमच्या किंमती योग्य आहेत कशावरून ? " तो

म्हणाला, "तुम्ही दुसऱ्या दुकानांत चौकशी करून या. तोंपर्यंत माल घेऊं नका. किंवा इथल्या सरकारी इन्स्टिटय़ूटमधला मालच तुम्ही जाऊन पहा ना उद्यां. म्हणजे तुम्हाला कळेल कीं आपल्याला माल थोडासा स्वस्तच मिळाला आहे."

ह्यानें आमची खात्री पटली. आणि पुढें आम्ही इस्टिटय़ूटमध्यें गेलों, तेव्हां आम्हांला दिसून आलें कीं त्यानें आम्हांला माल स्वस्त दिला नसला तरी निदान महाग तरी दिला नव्हता.

आमच्या मनांत घ्यायच्या होत्या त्या वस्तु घेतल्यावर आम्ही जाण्याची भाषा करूं लागलों. त्याला बिल बनवायला सांगूं लागलों. तो म्हणाला, "बिल तर बनवतोंच, पण ही गंमत पहातां का जरा?"

त्यानें आम्हांला एक तांदुळाच्या दाण्याएवढा हस्तिदंताचा हत्ती दाखवला. वासंती म्हणाली, "अय्या! काय ह्याची किंमत?"

तो म्हणाला, "चार आणे. पण ह्यांतला एकेक मी तुम्हांला फुकट देणार आहें."

आणि गुंजेच्या घरांत बंद करून त्यानें ते हत्ती आमच्या स्वाधीन केले. वासंती तो माझ्या खिशांत टाकीत म्हणाली, "नीट ठेवा हं तो, नाहीं तर हरवाल."

मग त्यानें हळुहळू अधिक आकर्षक गोष्टी काढल्या. त्या स्वस्त होत्या. आम्हांला हव्या तशा होत्या. वासंती व प्रधान पुन्हां त्याच्या कौशल्याला बळी पडली. आणि आधीं केली होती तितकीच खरेदी त्यांनीं पुन्हा केली.

मध्यें हस्तिदंताच्या फण्या त्यानें दाखवायला काढल्या. त्यांतली एक मोडकी होती.

मीं संशयानें म्हटलें, "अरे, ह्या फण्या लवकर मोडत असाव्यात. आपल्याला नकोत ह्या असल्या."

ह्यावर तो हसून म्हणाला, "तुम्ही मघाशीं मागत होतांत तशी ही लांबलचक फणी आहे. पहा कशी मोडली आहे ती. पण ही आखुड फणी हस्तिदंत आडवा कापून बनवलेली आहे. म्हणून तिचे दाते मोडायचे नाहींत. लोक आपले चांगली दिसते म्हणून ती लांबडी घेतात. पण तुम्ही ही घ्या. अर्थात् तुम्हांला हव्या असल्या तर तसल्याहि आहेत माझ्याकडे."

आपल्यावरचा विश्वास जरा डळमळीत करून त्यानें तो नंतर अधिकच बळकट केला होता. आणि इतर गिऱ्हाइकांहून आम्ही अधिक शहाणे आहोंत असें आम्हांला पटवून दिलें होतें.

अखेर 'आतां आम्ही कांहीं घेणार नाहीं' असें आम्ही ओरडूं लागलों तेव्हां हसत हसत त्यानें बिल केलें. बिल करतांना तो म्हणाला, "खरें म्हटलें तर तुम्ही फार थोडी खरेदी केलीत. माझ्या दुकानांतून दीड-दोनशें रुपयांची खरेदी केल्याशिवाय मीं कोणाला जाऊंच देत नाहीं."

पुन्हा आम्हांला पटलें कीं इतरांहून आम्ही जरा वस्तादच आहोंत !

नेहमींप्रमाणें आम्हीं म्हटलें कीं, "बिल जरा कमी करा कीं."

आढेवेढे घेऊन तो म्हणाला, "बरें. पण कमी केलेले पैसे मी परत देणार नाहीं. तेवढ्या पैशाची मी तुम्हांला वस्तु देईन. कारण पैसे दिले तर ते तुम्ही विसरून जाल; पण वस्तु दिली तर तुम्हाला माझी आठवण राहील."

शेवटीं प्रधाननें त्यानें सूट दिलेल्या पैशांत थोडी भर घालून आणखी एक वस्तु विकत घेतली !

त्या माणसाला विनोदबुद्धीहि होती. खरेदी करतांना मीं एक काठी उचलीत म्हटलें, "कोणीं फुकट दिली तर ही काठी मी घेईन बुवा."

वासंती म्हणाली, "कशाला ती ?"

मीं म्हटलें, "कांहीं नाहीं तर निदान बायकोला मारायला बरी !" तेव्हां तो चटकन् म्हणाला, "हां साहेब ! तुम्ही ह्या काठीनें इथें माझ्यादेखत बाईंना मारणार असाल तर मी ती तुम्हांला फुकट देईन."

त्यानें आम्हांला आमच्या वस्तू आमच्या इच्छेप्रमाणें व्यवस्थित बांधून दिल्या. वाटल्यास पोस्टानें पोहोंचत्या करायचीदेखील तयारी दाखविली. मुंबईहून आम्हीं वस्तू मागवाव्या म्हणून आपलें कार्ड आम्हांला दिलें.

इतर चांगले विक्रेते मीं पाहिले आहेत. ते तुमच्यावर अशी छाप पाडतात कीं, त्यामुळें नाखूष असूनदेखील तुम्ही वस्तू विकत घेतां. त्या घेणें तुम्हांला भाग पडतें. अशानें माल खपतो, पण गिऱ्हाईक असंतुष्ट रहातें. आपण फसलों, आपल्या मनासारखी खरेदी झाली नाहीं, असें त्याला वाटत रहातें. पण ह्याची विक्री करण्याची पद्धत अधिक उच्च दर्जाची होती. आमच्या मनासारखें सगळें झालें असें आम्हांला वाटत होतें आम्ही संतुष्ट होतों.

आणि अर्थातच त्यानें आम्हांला फसवलें नव्हतें.

आम्ही जातां जातां तो सांगत होता. "तुम्ही मघाशीं म्हणालांत त्या वस्तू उद्यां दाखवतों. उद्यां या."

आम्ही हसून म्हटलें, "ह्या दुकानांत पुन्हां आलों तर आमचा पुढचा

प्रवास आम्हांला रद्द करावा लागेल."

आणि आम्ही चालूं लागलों.

त्याच्या कौशल्यानें मी तर थक्क झालोंच होतों, पण विक्रीची कला कॉलेजांत शिकविणारा प्रधानदेखील थक्क झाला होता.

# :८: शिवसमुद्रम्‌चा धबधबा

म्हैसूरच्या आसपास पहाण्यासारखीं इतकीं स्थळें आहेत कीं आमच्या तेथल्या आणखी एक दिवसाच्या मुक्कामांत काय पहावें ह्याबद्दल आमचा आदल्या दिवशीं खूप विचारविनिमय झाला. आणि कांहींच ठरेना. एकदां वाटे कीं, हळिबेड बेलूर आणि श्रवण बेळगोडा हीं ठिकाणें पहावीं. हीं ठिकाणें पहायचीं म्हणजे म्हैसूरहून गाडीनें हसनला जावें लागतें. आणि तेथून मोटारीनें पुढें पंचवीस तीस मैल जावें लागतें. एका दिवसांत तीं पाहून घेणें शक्य नव्हतें. शिवाय असें कीं आम्हीं देवळें पुष्कळ पाहाणार होतों. उलट धबधबा मात्र आमच्यापैकीं कोणींच पाहिला नव्हता आणि पुढें पहायला मिळाला नसता. त्यामुळें आम्हीं शिवसमुद्रम्‌ला जाण्याचें अखेर ठरवलें. शिवाय आमची अशीहि अपेक्षा होती कीं, तेथें जातांना वाटेंत आम्हांला सोमनाथपूरचें देवालयदेखील पहायला मिळेल. पण आमची ती अपेक्षा कांहीं पुरी झाली नाहीं.

शिवसमुद्रम्‌ला जाण्याकरितां नेहमींप्रमाणें आम्हीं सकाळीं उठून धांवपळ करीत गाडी पकडली. श्रीरंगपट्टणला जाणारी गाडीच पुढें मद्दूरला जाते. आणि हीं दोन्हीं ठिकाणें बंगलोर-म्हैसूर मार्गावर आहेत.

गाडींत शिरल्यावर आम्हीं एकमेकांना गालावर राहिलेला दाढीचा साबण दाखविला. राहिलेले प्रातर्विधी उरकले आणि सिगरेटा शिलगावल्या.

म्हैसूरच्या आसपास शेती समृद्ध दिसली. शेतांतून ऊस चांगला पोसला होता. पानवेली माजल्या होत्या. सगळें कसें हिरवें दिसत होतें. आणि कावेरींतून काढलेल्या पाटांचें पाणी ठिकठिकाणीं झुळझुळत होतें. पाटांच्या काटांना हिरवळ बिलगली होती. आणि आंत किरणें डुंबत होतीं.

वाटेंत मंड्य स्टेशन लागलें. मंड्यला साखरेचा मोटा कारखाना आहे. स्टेशनवरून फॅक्टरीची इमारत दिसत होती. इमारत छान आहे. तिच्यापुढें तितकीच छान बाग आहे आणि त्या बागेंत एक कारंजें आहे. कारखान्याची इमारत बांधताना इतकी सौंदर्यदृष्टि दाखवलेली आपल्या हिंदुस्थानांत क्वचितच दिसते.

थोड्या वेळानें मद्दूर आलें. तेथें उतरून बाहेर पडलों तेव्हां मोटारवाल्यांनीं

आम्हांला घेरलें. त्यांना फक्त कानडी भाषा येत होती. आणि आम्हांला कानडी मुळींच येत नव्हती. आम्हीं "शिवसमुद्रम्" असें म्हणतांच एक मोटरवाला "हां हां" म्हणून आम्हांला आपल्या मोटारींत ढकलूं लागला. तेवढ्यांत दुसरा पुढें होऊन तावातावानें त्याच्याशीं भांडूं लागला. त्याच्या म्हणण्याचा मथितार्थ असा दिसला कीं पहिला मोटरवाला आम्हांला बनवीत होता. त्याची मोटर शिवसमुद्रम्‌ला जात नव्हती, किंवा उशीरां जाणार होती.

एकच गोंधळ माजला. आम्हांला हे मोटरवाले धडपणें शिवसमुद्रम्‌ला नेणार होते कीं नाहीं तें कळत नव्हतें. ते पैसे किती घेणार होते तें उमगत नव्हतें आणि आमची परत यायची काय सोय होती त्याचा पत्ता लागत नव्हता. त्यांची कावकाव मात्र चालू होती. ह्या परिस्थितींत आपण कांहीं तरी परिणामकारक बोलावें असें मला वाटणें सहाजिक होतें. पण पुन्हा भाषेची अडचण आली. तेव्हां नुसतें त्या मोटरवाल्यांकडे रागानें पाहून आणि माझ्या खांद्यावर ठेवलेला एकाचा हात हिसडून टाकून मी असें दर्शविलें कीं, आम्हीं म्हणजे कांहीं त्या मोटारवाल्यांची खाजगी मालमत्ता नव्हतों.

तेवढ्यांत सुदैवानें एक इंग्रजी जाणणारा मनुष्य तेथें देवदूतासारखा उपस्थित झाला. आमच्या हृदयांतली मळमळ आम्ही त्याच्याजवळ व्यक्त केली. तेव्हां त्यानें त्या मोटारवाल्यांना समजावलें आणि आम्हांला एका मोटारींत बसवलें. कुटची तरी गाडी यायची होती ती आली आणि तिच्यांतील उतारू कोंबल्यावर क्लीनर म्हणाला, "राइट."

धडधडत आणि हिसके देत आमची मोटर शिवसमुद्रम्‌च्या मार्गानें चालूं लागली. त्या तीस मैलांच्या प्रवासाला आम्हांला दोन तासाहून अधिकच वेळ लागला.

वाटेंत एका गांवांतल्या टुकार हॉटेलसमोर आमची मोटर अर्धा तास थांबली. आणि आम्हीं तेथें नास्ता घेऊं शकतों असें ड्रायव्हरनें आपल्या मोडक्या तोडक्या हिंदीला परिणामकारक हातवाऱ्यांची कुमक देऊन सांगितलें. हॉटेलमध्यें गेल्यावर तेथल्या पोऱ्यानें पदार्थांचीं काहीं परिचित आणि बरीचशीं अपरिचित नांवें सांगितलीं. अपरिचित वस्तू खाण्याची अर्थातच आमची इच्छा होती. म्हणून त्यांतल्या एका वस्तूचें नांव घेऊन, "ये क्या है?" असा पंजा हालवून मीं प्रश्न केला.

त्या पोऱ्याच्या चेहऱ्यावरचें प्रश्नचिन्ह तसेंच असलेलें पाहून, प्रधाननें तोच

प्रश्न अधिक हातवारे करून समजावणीच्या स्वरांत विचारला.

तेव्हां त्या पोऱ्यानेंहि पंजा हलवून "क्या है" असा उच्चार केला आणि मग तो व इतर पोऱ्ये एकमेकांकडे पाहून हसूं लागले.

आम्हांला हसूंहि आलें आणि रागहि आला. अखेर आमच्या चिरपरिचयाची इडली आम्हीं मागवली. आणि सांबारानें माखलेल्या अवस्थेंत ती नेहमी-प्रमाणें आली. ती उचलून मीं निःशंकपणें तिला चावा घेतला आणि माझ्या दातांतून जबरदस्त शिणिक उठली. त्या पांढऱ्या इडलीचें अंतःकरण दगडांनीं इतकें काळेंकुट्ट झालेलें असेल अशी माझी कल्पना नव्हती.

आमच्या कानडी बंधूंनीं अखेर असे गनिमी काव्यानें आम्हांला खडे चारले होते. आणि ते बोलत असतांना त्यांच्या तोंडांत इतके दगड कां खडबडतात त्याचाहि नकळत खुलासा झाला होता.

त्या ठिकाणाहून मोटर सावकाश सुटली. इथें मोटारी वेळेवर सुटतात कीं नाहीं हें पहाण्याची जबाबदारी पोलिसांवर आहे असें दिसतें. कारण पोलिस मोटर सोडण्याबद्दल घाई करूं लागला तेव्हां क्लीनरनें उगीचच्च हँडल फिरवलें आणि मग झांकण उघडून मोटरच्या इंजिनाकडे तो पाहूं लागला. पोलिसला फसविण्याची ही क्लृप्ती होती हें उघडच होतें. थोड्या वेळानें ड्रायव्हर व क्लीनर ह्यांना आपल्या लबाडीचें हसूं आलें आणि तेव्हां त्यांची लबाडी उमगून पोलीसदेखील रागावत हसूं लागला. लबाडी आणि निरागसपणा ह्यांचें तें चमत्कारिक मिश्रण होतें. मग उगीचच्च धांवपळ व ओरडाओरड झाली आणि आणखी थोडा वेळ काढण्यांत आला. अखेर आतां अगदीं निघायचेंच्च अशा आविर्भावानें ड्रायव्हर गाडींत चढला. आणि क्लीनरदेखील मोटरला वळसा घालून हँडल मारायला धावला. पण तेवढ्यांत तेथला एक बघ्या उत्साहानें पुढें झाला आणि आपली हँडल मारायची इच्छा त्यानें व्यक्त केली. आपल्या इकडे अशा माणसाला खेंकसून दूर करण्यांत आलें असतें. पण त्याची हौस ड्रायव्हर व क्लीनर ह्या दोघांनाहि समजूं शकली. त्यांनीं त्याला हँडल मारायला दिलें. तो उत्साहानें हँडल फिरवूं लागला. आजुबाजूचे लोक त्याला जोरांत प्रोत्साहन देऊं लागले आणि ड्रायव्हर व क्लीनर त्याला सूचना देऊं लागले. सगळे हसत होते. त्यांना मजा वाटत होती. त्यांच्या त्या निरागस आनंदाची मला खरें म्हटलें म्हणजे मौज वाटायला पाहिजे होती. पण उशीर होत असल्यामुळें मीं मनांतल्या मनांत चरफडत होतों.

अखेर मोटर एकदांची सुरू झाली. पण मोटर चालवायला ड्रायव्हरऐवजीं दुसरा एक हौशी इसम बसला होता. पण त्याच्या हौसेमुळेंच कीं काय, मोटर अगदीं निरुत्साही झाली. आणि तो गिअर बदलूं लागला कीं बंद पडूं लागली. असे हो-नाहीं करीत शिवसमुद्रम्‌ला पोंहोंचायला आम्हांला बराच वेळ लागला.

तेथें पोंहोंचलों तेव्हां भर दुपारची वेळ होती. तथला प्रदेश सगळा रुक्ष आणि उजाडच होता. जिच्यांत धबधबा कोसळत असावा अशी दरीहि कोठें दिसेना. आणि पोटाच्या पोकळींत टाकायला अन्नहि मिळणें तेथें तितकेंच मुष्कील दिसत होतें.

तेवढ्यांत मोटारींतल्या एक दोन माणसांनीं आम्हांला पोक्त उपदेश केला कीं, धबधबा पहायचे कांहीं हे दिवस नव्हेत. आणि एका पोरानें अशी बातमी आणली कीं धबधबा मुळीं कोरडाच आहे ! आणि मोटारवाल्यानें जेव्हां पॉवर स्टेशन बघण्याची परवानगी मागायला आम्हांला एका अधिकाऱ्याकडे पाठवलें तेव्हां "सध्यां जेवणाची सुट्टी आहे. ती संपली म्हणजे या" असें उत्तर मिळालें !

मी त्याला समजुतीच्या स्वरांत आमची बाजू सांगितली. आणि मग त्यानेंहि तितक्याच समजुतीच्या स्वरात आपली बाजू सांगितली. आणि मधल्या वेळांत धबधबा पाहून येण्याची सूचना केली.

आम्हीं मोटरमध्यें बसून जरा पुढें धबधब्याकडे निघालों. वाटेंत एका बांधून काढलेल्या मोठ्या पाटांतून फेसाळून पांढरें झालेलें पाणी सोसाट्न वहात होतें —धांवत होतें. एका अर्धवट बंद लोखंडी दरवाज्याच्या पलीकडे तें अधिरे-पणानें घुसत होतें. शिवसमुद्रम्‌च्या पॉवर स्टेशनचीं राक्षसी टरबाइन्स चालवा-यला तें चाललें होतें.

पांढऱ्या रंगांत हिरवा रंग विरघळत होता आणि हिरव्यांत पांढरा ! तें दृश्य डोळे निववणारें होतें. पण हें पाणी धबधब्याच्या वरच्या बाजूनें वळवून घेतलें आहे, ह्याचें वाईट वाटत होतें.

आम्हीं मोटरमधून उतरलों आणि तेथला एक पोऱ्या बरोबर घेऊन पुढें जाऊं लागलों. सगळें रुक्ष होतें आणि ओसाडहि होतें. तेथें कांहीं सुंदर असेल अशी शंकादेखील येत नव्हती. मला वाटूं लागलें कीं, हा पोऱ्या आम्हांला पाण्याचा लहानसा ओघळ दाखवील आणि तो धबधबा किती सुंदर आहे तें

आम्हांला कौतुकानें पहावें लागेल—मिटक्या मारीत वर्णनें करून एकमेकांना पटवून द्यावें लागेल.

पण तेवढ्यांत आम्हीं टेकडीच्या कडेला आलों. आणि डोंगरांची एक नालाची आकृती झालेली मला आढळून आली. त्या नालाच्या मध्यें दरी होती. आणि त्या नालाच्या चिंचोळ्या भागावरून फेसाळत खालीं पडणाऱ्या पाण्याचा तुकडा दिसत होता.

जरा पुढें सरकलों आणि सगळा धबधबाच दृष्टिपथांत आला. धबधब्याला पुरेसें पाणी होतें. माझ्या नजरेसमोर तें फेसाळत दोन अडीचशें फूट स्वतःला खालीं लोटून देत होतें—कोसळत होतें. आणि खालीं निर्माण झालेल्या संथ हिरव्या डोहांतून कावेरी फेसाळत झिरझिरत पुढें वहात चालली होती. एक वळण घेऊन अदृश्य झाली होती. पुढें सगळा रुक्षपणाच पसरलेला दिसत होता.

वर झाडेंझुडपें नसलेले ते भुंडे डोंगर! एखादें झाड निरुत्साहीपणानें त्यांच्या उतारावर उभें राहून त्यांचें दैन्य अधिकच उघडें करीत होतें. उंचीमुळें, अजस्रपणामुळें प्राप्त होणारी भव्यतादेखील त्याच्याजवळ नव्हती. रखरखीत तळपणाऱ्या उन्हाचें कोरडें वाळवंट भकासपणें सर्वत्र पसरलें होतें. एखाद्या निरुत्साही झाडाची चुळकाभर सावली त्या वाळवंटांत सांडली होती. त्याच्या अफाट विस्तारावर बोट ठेवीत होती आणि ह्या रुक्षतेच्या चौकटींत तो फेसाळणारा, कोसळणारा, ओला धबधबा एखाद्या चित्रासारखा निसर्गानें बसवलेला होता.

माझी भूक, कंटाळा, त्रासिकपणा, सगळें कांहीं मी विसरून गेलों. आणि डोळे भरून तें दृश्य पाहून घेतलें. धबधब्याचें पाणी दोन अडीचशें फूटच खालीं कोसळत होतें. म्हणजे तें दृश्य काहीं डोळे फिरवून सोडणारें नव्हतें. पोटांत भीतीची पोकळी निर्माण करणारें नव्हतें. पण तरी त्या दृश्यांत अनपेक्षितपणा होता, विपुलतेचें वैभव होतें. घोंघावणारा, फेसाळणारा जिवंतपणा होता, अस्थिरपणात स्थिर झालेलें सौंदर्य होतें. तृप्त करणारा तुडुंबपणा होता, खळखळणारी निर्भरता होती, धुक्याची संदिग्धता होती. ठिबकणारी, वळसा घेऊन अदृश्य होणारी हुरहुर होती आणि हृदय आर्द्र करणारा ओलावा होता.

टक लावून मी सारखा त्या दृश्याकडे पहात होतों. पाण्याचे चार झोत तेथें निरनिराळे, स्वतंत्रपणें कोसळत होते. त्यांतला एक, वेगळ्या निघालेल्या भावासारखा फटकून उभा होता. आणि बाकीचे तीन एकमेकांना अंमळ खेटलेच होते. पण प्रत्येकाची रीत निराळी होती. एक आपला हत्तीच्या सोंडेसारखा

सरळ खालच्या डोहांत कोसळत होता आणि त्याचा पृष्ठभाग फोडून त्याच्या पोटांत लुप्त होत होता. आणि असें वाटत होतें कीं भूमीचा भेद करून पाताळांत पोहोंचल्याशिवाय त्याची तृप्ती होणें शक्य नव्हतें. धाराधारांचा, रेघारेघांचा बनलेला, कापुसलेला आणि तरी एखाद्या खांबासारखा बांधीव, किंचित् फुटणारा आणि तुषारांना टिचक्या मारणारा असा तो ओघ होता. पाठीमागच्या कड्यापासून तो अलग झालेला होता आणि तरी त्याला भिजवीत होता. डोहांत बुडतांना, तो उमलणाऱ्या फेसाची झालर त्यावर पसरीत होता. आणि तुषारांचें विरणारें धुकें, पायानें धूळ उडावी, तसें उडवीत होता.

दुसरा एक ओघ फुगीर, खडबडीत टेपाडावरून पसरत, घसरत, फाटत खालीं येत होता. एखाद्या फाटक्या पारदर्शक वस्त्रासारखा त्या टेपाडावर पसरला होता. आणि खालच्या डोहांत सावकाशपणें वळसा घेऊन पडत होता. दुसरे दोन ओघ त्याच उतरत्या कड्यावरून, त्याला चिकटूनच खालीं कोसळत होते. मध्येंच एखाद्या दगडावर आपटून उड्या घेत होते. खडकाच्या पोकळींत थबकत होते. एखाद्या कपारीच्या टोंकावर फाटत होते. निरनिराळ्या धारानीं खालीं पडत होते, आणि पुन्हा एखाद्या उताराच्या ओंजळींत त्या धारा एकत्र येऊन पाण्यांत पडतांना पुन्हा फाटत होत्या.

त्यांत छोटे छोटे ओहोळ आणि ओघळ मूळ ओघांतून फुटून निराळे निघत होते. मोठाल्या दगडांना वळसे घालीत होते, त्यांच्या भेगांतून झिरपत, त्यांना ओले करून त्यांच्यावरून ठिबकत, एखाद्या ठिकाणीं तुरतुरत्या धारेनें खालीं पडत, पुन्हा मूळ ओघांना येऊन मिळत होते, किंवा वेगळेपणानें डोहांत आपली पाण्याची धार सोडीत होते.

अशा अनेक प्रकारांनीं पाणी खालीं कोसळत होतें. त्या ओसाड डोंगरांतून कुठून तें फेसाळत, ईर्षेनें सोसाट्यानें येत होतें, आणि स्वतःला खालीं लोटून देत होतें. अतिशय वेगानें, घोघावत, सतत खालीं पडत होतें. त्याच्या लड्याच्या लड्या उलगडत होत्या. गुंतत होत्या. अखेर डोहांत विरघळत होत्या. मध्येंच ते ओघ पलटा खात होते. मध्येंच त्यांना आटे पडत होते. मध्येंच त्यांच्यांतल्या असंख्य धारा गुंफल्या जात होत्या, फुटत होत्या, फांकत होत्या. पण अखेर खालीं डोहांत कोसळण्याची क्रिया अविरतपणें चालू होती. एकच घोष ऐकूं येत होता. आणि त्या कोसळण्याच्या त्वरेमुळें, पाण्याचें द्रवरूप कायम राहूनदेखील त्याला चैतन्यरूप प्राप्त झालें होतें. उन्हांत तें चकाकत होतें आणि त्यामुळें असें वाटत

होतें कीं, त्या क्षणीं धबधब्याचें कोसळणें थांबलें होतें आणि त्या दृश्याचें कोरीव लेणें झालें होतें.

आम्हीं तो कालवा लांबून पाहिला आणि निसरड्या खडकांवरून आधार घेत, घसरत उतरून अगदीं जवळ जाऊनहि पाहिला. वासंती अर्थात् वर राहूनच हात हलवून आम्हांला उत्तेजन देत होती. प्रधान उतरतांना तीन चार फूट घसरून एकदम जेव्हां खालीं गेला, तेव्हां तो धबधब्याची नक्कल करतो आहे कीं काय असा मला संशय आला. पण नंतर अनुभवानें तें अपरिहार्यच होतें असें पटलें. कोसळणाऱ्या एका झोताच्या अगदीं कडेला मीं जाऊन बसलों. त्या वेगानें धावणाऱ्या प्रवाहांत माझे डोळे सोडून दिले. माझा हात त्या झोतांत बुडवला. त्याच्या वेगाचा हाताला बसणारा झटका अनुभवला. त्याच्या ओलेपणानें आणि थंडपणानें मी सुखावलों. त्यांतल्या पाण्यानें मीं तोंड धुतलें आणि चुळके भरभरून मीं तें प्यायलों. कड्यावरून निर्भरपणें स्वतःला खालीं लोटून देणाऱ्या पाण्याला असें वाट चुकून माझ्या काळोख्या, गरम पोटात जाऊन काय वाटलें असेल कोण जाणें. पण माझ्या अंगाअंगांतून मात्र तृप्तीचे ओहोळ वाहूं लागले. डोक्यावरचा सूर्याचा ताप उचलला गेला.

वरून ड्रायव्हर हाक मारीत होता, सोबतचा पोऱ्या घाई करीत होता, पण मला तेथून उठवेच ना! आणि अखेर असें वाटूं लागलें कीं, तो धबधबा माझ्या अंगांतच कोसळत आहे. सुंदर दृश्य पाहिलें कीं माझें असेंच होतें. तें दृश्य आणि मी ह्यांत मला भेद करतां येईनासा होतो.

थोड्या वेळानें मी बसलों होतों तेथून उठलों आणि पुढें सरकून, त्या कड्यावर झोपून, खालच्या डोहाकडे डोकावून पाहूं लागलों. खालीं डोहांत हिरवें स्वच्छ पाणी तुडुंब भरून झुंबत होतें. आपली सारी तृप्ती, त्या फुटक्या पण कधीं रित्या न होणाऱ्या डोहांत साठवून ठेवत होतें. आणि अंमळ विसावल्यावर, अंमळ झुंबल्यावर, फेसाळत, खेळत बागडत आपल्या खडकाळ पात्रांतून पुढें जात होतें.

अखेर मी उठलों तेव्हां माझ्या ध्यानांत आलें कीं, कपारींत सांठलेल्या पाण्यांतच मी झोंपलों होतों आणि माझे कपडे भिजले होते. उन्हांत धापा टाकीत आम्हीं तो कडा चढलों. वर वासंती तोंड वांकडें करून बसली होती. मी खालीं बसलों होतों तेथून पडून दोन माणसें मेलीं होतीं असें तिला कोणी सांगितलें होतें म्हणे! तेथून खरोखर पडण्याची कांहींच शक्यता नव्हती. पण

मी जिवंत आणि चांगला शाबूत आहे असें तिला पटायला थोडा वेळ लागला.

आम्हीं वर गेलों तेव्हां ड्रायव्हर आम्हांला उशीर केल्याबद्दल आमच्या बरोबरच्या त्या पोऱ्यावर शिरा ताणूं लागला. तेव्हां त्याला खूप आवाज चढवून हिंदुस्थानींत तडकावणें मला भागच पडलें. माझें बोलणें त्याला कितपत समजलें कोण जाणे, पण माझा सूर त्यानें ओळखला आणि तो नरम आला.

असो. तेथल्या अधिकाऱ्याकडून पॉवर स्टेशन बघण्याची आम्हीं लेखी परवानगी घेतली. तेव्हां कोणाच्या तरी कल्याणाकरता काढलेल्या फंडाला पैसे द्यावे लागलेच. तेथें जबरदस्ती कांहींच नव्हती आणि तरी पैसे देणें भाग पडलेंच.

पॉवर स्टेशन अर्थात् कड्याच्या खालीं कावेरीच्या प्रवाहाच्या कडेला आहे. तेथें जायचें म्हणजे दोनअडीचशें फुटांचा सरळ उतार आहे. हा उतार उतरण्याकरिता तेथें ट्रॉलीची सोय केलेली आहे. जवळ जवळ सरळ अशा त्या उतारावर रूळ टाकलेले आहेत. आणि त्या रुळावरून एक छोटी ट्रॉली जाते. ही ट्रॉली एका लोखंडी दोरानें वर खेंचली जाते अगर खालीं सोडली जाते. ह्या ट्रॉलींतले बांक अशा कोनानें बसवलेले आहेत कीं ट्रॉली वाकडी असली, तरी आपण सरळ बसल्यासारखें वाटावें.

ट्रॉलीत बसलों आणि ट्रॉली खालीं घसरूं लागली तेव्हां पोटांतून कांहींतरी वर येत आहे असें वाटूं लागलें आणि हात आपोआप कठड्यावर घट्ट झाले. कोलारच्या केजच्या अनुभवानंतर ह्या अनुभवाचें कांहीं विशेष वाटलें नाहीं. तरी पण तो अनुभव पुरेसा रोमांचकारी होता. भूमीचा आधार सुटला नव्हता तरी तो सुटल्यासारखें वाटत होतें. पुढें आपण किती खोल जात आहों तें सारखें दिसत होतें आणि ट्रॉली जसजशी पुढें जात होती तसतसें वरून थोडें दिसणारें अंतर मोठें होत होतें.

वर उंच कडा होता, खालीं दरी होती आणि त्यांच्यामध्यें एका दोरीनें सांवरलेली आमची चिमुकली ट्रॉली हळुहळू घसरत खालीं जात होती.

'दोरी तुटली तर?' ही ठराविक खरी, पण पुरेशी खमंग भीति त्या वेळीं वाटल्यावांचून राहिली नाहीं.

खालीं पॉवर स्टेशनमध्यें पोंहोंचल्यावर तेथल्या अधिकाऱ्यानें तेथील यंत्रांविषयीं तांत्रिक माहिती सांगितली. तांबड्या हिरव्या दिव्यांचे सिग्नल, वाजणाऱ्या घंटा, मीटरमधल्या नाचणाऱ्या सुया, असंख्य खटके आणि बटनें, अजस्र यंत्रें आणि त्यांच्या पोटांतील गुंतागुंत, ह्या सर्व गोष्टी पाहून चकित

होण्याकरितांच बहुतेक बघ्ये येतात. यंत्र म्हणजे आजच्या युगांतला देव, दैत्य आणि जादुगारहि आहे. त्याचें दर्शन लोक भाविकतेनें घेतात. आणि त्याच्या किमयेनें थक्क होऊन परत जातात. तेथल्या अधिकाऱ्याला हें माहीत होतें म्हणून त्यानें आम्हांला ती यंत्रांची सगळी जादू दाखवली. बाकीचे लोक तेवढ्यावर संतुष्ट झाले. आम्हीं चार प्रश्न अधिक विचारले.

त्यानें सांगितलें कीं सहा फूट व्यासाच्या प्रचंड नळांतून पाणी दोनशें चाळीस फूट खालीं येतें आणि अकरा राक्षसी टरबाइन्स फिरवतें. त्यावर डायनॅमो चालतात आणि वीज तयार होते. पुढची तांत्रिक क्रिया काय असते तें विचारताच त्यानें ट्रॅन्सफॉर्मर्स, कॉइल्स वगैरे घटपटाचा आमच्यावर इतका मारा केला कीं, आमच्या डोक्यांत तीं प्रचंड टरबाइन्स फिरत आहेत असें आम्हांला वाटूं लागलें. शिष्टाचारानुसार आम्हीं हसरे चेहेरे करून, समजतंय् असा भाव चेहऱ्यावर आणला. पण त्यामुळें तो खूप होऊन कीलोवॅटस् वगैरे अनेक शब्द उच्चारून आम्हांला माहितीखालीं गुदमरून टाकूं लागला. आणि चुळबुळत तें ऐकण्यापलीकडे आम्हांला कांहींच करतां येईना.

आम्हांला समजण्यासारखी माहिती इतकीच होती कीं, तेथून म्हैसूर राज्यांतल्या बऱ्याच मोठ्या भागाला विजेचा पुरवठा होत होता.

आम्हीं एका नोकराबरोबर हिंडून मग तीं सगळीं टरबाइन्स पाहिलीं. नेहमींप्रमाणें त्यानें आम्हांला यंत्राच्या कुठच्या तरी भागाला हात लावायला सांगितला. आम्हीं भीत भीत तसा हात लावला. आणि मग किती गरम आहे अगर किती थंड आहे असें म्हणून आश्चर्य व्यक्त केलें व दाखविणाऱ्याचें समाधान केलें.

पॉवर स्टेशनच्या कडेला, त्या अकरा अजस्त्र नळांतलें कोंडलेलें, टरबाइन्स फिरवून दमलेलें पाणी शिमीट कॉंक्रिटच्या कुंडांत सोडलें होतें. त्याच्या कोंडलेल्या शक्तीनें कोठें धोका पोहोंचूं नये म्हणून मुद्दाम तीं कुंडें बांधलेलीं होतीं.

त्या चौकोनी कुंडांत तें पाणी विलक्षण जोरानें घुसत होतें. तेथें तें आदळत होतें. उमळत होतें. उकळत होतें. त्याला दरदरून फेस सुटला होता. आणि अखेर कुंडांच्या तीनहि बाजूनीं तें उतू गेल्यासारखें बाहेर घोंघावत होतें. कावेरीच्या प्रवाहांत जाऊन मिळत होतें. खडकाळ पात्रांतून खेळत बागडत, वळसा घेऊन जात होतें—अदृश्य होत होतें.

त्या कावेरीच्या पात्राकडे कितीतरी वेळ टक लावून मीं पहात होतों.

म्हैसूरला आल्यापासून ह्या कावेरीचें दर्शन मला रोज घडत होतें. कृष्णराज-सागरच्या अजस्र धरणानें अडलेली तिला मीं पाहिली होती. वृंदावन बागेंतल्या असंख्य कारंजांतून थुई थुई नाचत आकर्षक आकृती निर्माण करतांना मीं तिला पाहिली होती. म्हैसूरच्या आसपासच्या शेतांतून पिकें पोशीत, पाटांतून झुळझुळतांना ती माझ्या नजरेस पडली होती. श्रीरंगपट्टणच्या बेटाला तिनें आपल्या दोन्ही प्रवाहांनीं मारलेली मिठी मीं पाहिली होती. शिवसमुद्रम्‌ला कड्यावरून कोसळतांना मी तिला पाहिली होती, डोहांत डुंबतांना पाहिली होती, अजस्र टरबाइन्स फिरवितांना पाहिली होती आणि ती पुढें वहात चालली होती. म्हैसूर राज्याशीं असलेला तिचा ऋणानुबंध संपला होता. आतां ती मद्रास प्रांतांत चालली होती.

पण जाण्यापूर्वी ह्या म्हैसूर राज्यांतल्या लोकांना तिनें किती प्रकारें सुखवलें होतें! तिनें त्यांचीं शेतें पिकवलीं होतीं. बागा फुलवल्या होत्या. कारंजीं नाचवलीं होतीं. घरें उजळलीं होतीं, रोषणाईचा थाटमाट उडवून दिला होता, कारखान्यांचीं अजस्र यंत्रें फिरवलीं होतीं. किती तृषार्तांना तिनें पाणी दिलें असेल! किती सौंदर्यासक्तांचे डोळे तिच्या पाण्यांत डुंबले असतील! हें सगळें तिनें अनेक वर्षे केलें होतें आणि पुढेंहि ती तेंच करीत रहाणार होती. तिच्या हातांतल्या कलशांतलें अमृत तसेंच झिरपत रहाणार होतें. त्या कलशाला भोक पडलें होतें म्हणून तर तो कधीं रिता होत नव्हता. आकाशांतूनच त्यांत पाणी ओतलें जात होतें. आणि जीवनाचा तो लोट तसाच न आटतां वहात रहाणार होता.

मला गहिंवर आला. आणि मीं मनोमन हात जोडले.

पुन्हा आम्हीं त्या ट्रॉलींत बसलों आणि वर चढलों. पुन्हा अर्ध्या वाटेवर आम्हांला दुसरी खालीं जाणारी ट्रॉली भेटली. आम्हीं वर पोंहोंचलों.

मोटरवाले उशीर झाला म्हणून बोंबलत वर उभे होतेच. आम्हांला चहा अगर सरबत घेऊं देण्यासदेखील ते तयार नव्हते. आम्हीं वाटेंत लागलेल्या त्या भिकार हॉटेलांत चहा घ्यावा असें त्यांचें मत होतें. त्यांच्या हलकटपणाची अतिशय चीड आली. ठरल्या वेळेपेक्षां त्यांनीं आम्हांला तेथें उशीरां आणलें होतें. आणि आतां ठरल्या वेळेच्या आधीं ते आम्हांला परत नेऊं पहात होते. त्यांच्याविषयीं मला काय वाटतें तें सांगायला माझी जीभ नुसती वळवळत होती. पण काय उपयोग! भाषेच्या अज्ञानामुळें तोंड दाबून धरल्यासारखें झालें होतें.

बरें, त्यांना जा म्हणून सांगून परतण्याची सोय करावी म्हटलें, तर तेवढी चौकशी करायलादेखील ते आम्हांला फुरसत देत नव्हते.

अखेर त्यांच्या घाईला न जुमानतां आम्हीं तेथल्या सरकारी रेस्ट हाऊसमध्यें गेलों. तेथले वेटर मोठे आदबशीर वाटले. आणि आमची सरबराई करायची त्यांनीं फारच उत्सुकता दाखवली. बहुधा त्यांना गिऱ्हाइकी फारशी मिळत नसावी. दुर्दैवानें लिंबाचें सरबत घेण्याइतकाच आम्हांला वेळ होता. नाहींतर त्या आदबशीर खानसाम्याचें पाककौशल्य आम्हीं खात्रीनें पारखलें असतें. तेथल्या वेटरनें सांगितलें कीं, तेथें रहायचीदेखील सोय होती. आम्हीं आंत जाऊन पाहिलें तों प्रशस्त, उजेड असलेल्या खोल्यात आरामशीर फर्निचर होतें. आमच्या तोंडाला पाणी सुटलें. वाटलें कीं एक रात्र तेथेंच रहावें. त्या मोटारवाल्याची जिरवावी. आराम करावा आणि दुसऱ्या दिवशीं निघावें. पण त्या वेटरनें सांगितलें कीं, रहाण्याकरितां परवानगी घ्यावी लागते; आणि ती मिळते म्हैसूरला नाहीं तर बगलोरला! नशीब इतकेंच कीं, ती परवानगी देण्याकरितां लंडनला ऑफिस काढलें नव्हतें.

आम्ही मुकाट्यानें बाहेर पडलों आणि मोटारमध्यें बसलों. पण मोटारमध्यें बसल्या बसल्या माझ्या डोक्यांत सारखा विचार येत होता कीं, केव्हां तरी मी पुन्हा ह्या शिवसमुद्रमूला येईन, ह्या सुंदर रेस्ट हाऊसमध्यें राहीन आणि मग संध्याकाळच्या वेळीं त्या कड्याच्या टोकावर बसून त्या कोसळणाऱ्या धबधब्याकडे पहात बसेन, स्वतःला विसरून जाईन.

मोटार चालू झाली. रुक्ष रस्त्यावरून नजर निर्हेतुकपणें फिरत होती. वाटेंत एका देवळाच्या छपरावर असलेला नंदी पाहून आश्चर्य वाटलें. माकडांचीं अनेक संमेलनें पाहून मात्र वाटलें नाहीं ! एके ठिकाणीं टोपलींत छोटीं पिवळीं लांबडीं फळें दिसलीं. कसलीं आहेत म्हणून विचारलें तेव्हां कळलें कीं ते रेशमाचे कोष होते. किती सुंदर, मऊ, उबदार घरें होतीं तीं! तुतीच्या पानाची मेजवानी करून त्यांत गुरगुटून झोपायला त्या रेशमाच्या किड्यांना किती मौज वाटत असेल!

गाडीच्या वेळेच्या आधीं चांगले दीड दोन तास त्या मोटारवाल्यानें आम्हांला स्टेशनवर आणून सोडलें. आम्हांला तसें सोडण्यांत त्याला काय मिळालें कोण जाणे ! कारण ती गाडी आल्याशिवाय त्याला परत जायला पॅसेंजर मिळणें शक्य नव्हतें. मोडक्या तोडक्या हिंदींत मीं हे विचार त्याच्याजवळ व्यक्त

केलेच आणि अपेक्षेप्रमाणें तो ते ऐकून निर्लज्जपणें हसला.

गाडी यायला वेळ होता म्हणून स्टेशनवरच्या हॉटेलांत गेलों. सारा मामला कळकटच होता आणि तेथला पोऱ्या त्या मामल्याला साजेसाच होता. पण बेटा उत्साही दिसला आणि साहेब लोकांकरितां खास कपबशा काढून आणि सफाई करून त्यानें आम्हांला चहा तर चांगला दिला. पण आम्हीं अधिक उत्साह दाखवून ऑम्लेट मागवलें, तेव्हां मात्र त्याची करामत लंगडी पडली. आणि अखेर आम्हीं पाव मागितल्यावर त्यानें जो पदार्थ पुढें आणला त्याला वीट कां म्हणूं नये हा भाषिक प्रश्न आम्हांला सहाजिकपणें पडला. कारण तो भयंकर टणक होता आणि त्याचा आंबुसपणा सोडल्यास त्याची चव साधारण मातीसारखीच होती. तो पाव खाल्ल्यानंतर बराच वेळ गरम हवा खात आम्ही स्टेशनवर बसलों.

अखेर गाडी आली तेव्हां आम्ही तंगड्या पसरून गाडींत अधिक आराम-शीरपणें बसलों. वटवट अर्थात् चालू होतीच. त्या वटवटींत आमचें तिघांचेंहि तीन बाबतींतलें गाढ अज्ञान मोठ्या गंमतीदारपणें व्यक्त झालें.

वाटेंत मेंढ्यांचा कळप पाहून मीं म्हटलें, “ त्या पहा मेंढ्या. ”

तेव्हां वासंतीनें प्रश्न विचारला, “ मेंढी म्हणजे कोण हो ? बकऱ्याची बायको मेंढी ना ? ”

हें ऐकतांच मीं आणि प्रधाननें अर्थात् हास्याचे मजले चढवले.

“ हा हा हा हा ! ”

“ हो हो हो हो ! ”

“ ह्यॅ ह्यॅ ह्यॅ ह्यॅ... ” वासंतीनें वेडावलें.

त्या गंभीर विषयावरची चर्चा अर्थातच वाढली. कोणाचा नवरा कोण आणि कोणाची बायको कोण ह्याची शहानिशा चालू असतांना प्रधान म्हणाला, “ मेंढीचा नवरा एडका. ”

मीं जादा शहाणपणानें म्हटलें, “ काय मूर्ख आहेस रे ? एडका नव्हे, मेंढा. ”

ह्यावर प्रधान हसत म्हणाला, “ कमाल केलीस बुवा ! मेंढा आणि एडका निरनिराळे आहेत, अशी तुझी कल्पना आहे कीं काय ? ”

तो मोठ्यानें हसूं लागला.

वासंती हा मोका कसा सोडील ! ती तोंडावर हात ठेवून आश्चर्य व्यक्त करीत म्हणाली, “ अय्या ! एवढेंसुद्धां माहीत नव्हतें तुम्हांला ? ”

सगळ्यांच्याहून मोठ्यानें हसण्याशिवाय मला दुसरा मार्ग राहिला नाहीं.

प्रधानचा शहाणपणा तेवढा शाबूत राहिला होता. पण त्याला तडा जायला वेळ लागला नाहीं. थोड्या वेळानें तो खिडकीबाहेर पहात म्हणाला, "हीं कसलीं झाडें रे?"

मीं म्हटलें, "ते माड आहेत."

तो म्हणाला, "ऑं! पण तीं दिसतात तर नारळीच्या झाडासारखीं!"

ह्यानंतर मीं आणि वासंतीनें हास्याचा कल्लोळ उडवला हें सांगायला नकोच.

आणि मग अखेर आम्हीं तिघेंहि कशीं मूर्ख आहोंत तें पटल्यामुळें आम्हीं पुन्हा मोकळेपणानें हंसलों.

अशा प्रकारच्या अज्ञानाचीं फार गंमतीदार उदाहरणें मला माहीत आहेत. इंग्रजीचा प्रोफेसर असलेल्या माझ्या एका मित्राची अशी प्रामाणिक कल्पना होती कीं, सूर्य पूर्वेला उगवतो तसा चंद्र पश्चिमेला उगवतो!

लॉरेल आणि हार्डी ह्या दुकलीच्या एका चित्रपटांत अशा प्रकारच्या अज्ञानाचें एके ठिकाणीं फार छान प्रदर्शन आहे. एका शेळीचें दूध काढायचा त्याच्यावर प्रसंग येतो. तेव्हां एक दुसऱ्याला विचारतो, "शेळीचें दूध कसें काढतात तें तुला माहीत आहे काय?"

दुसरा आत्मविश्वासानें म्हणतो, "हो. त्यांत काय आहे? शेळीची शेपटी धरून वरखालीं केली कीं दूध पडतें."

आणि मग दोघे शेळीची शेपटी जोरजोरानें हलवितांना दाखविलें आहे!

असो. तंगड्या ताणून मूर्खपणा करीत आम्ही म्हैसूरला पोहोंचलों आणि तेथें जेवून तंगड्या ताणून झोंपीं गेलों.

## :९: नीलगिरीचें दर्शन

बुधवारीं लवकर उठून कुठें धांवत जायचें नव्हतें. त्यामुळें चांगली लांबलचक झोप काढली. डबल नास्ता घेतला, घोटून दाढी केली आणि मनसोक्त अंघोळ केली.

कपडे करून बाहेर पडल्यावर, पहिल्यानें वासंतीचें मुंबईचें तिकीट काढलें. सगळ्या प्रवासाची दगदग तिला झेपली नसती असें आम्हांला दोघांना वाटत होतें. स्टेशनवरच्या इन्क्वायरी क्लार्कला उलटेसुलटे प्रश्न विचारून आम्हीं तीन दिवसांत इतकें हैराण केलें होतें कीं, त्याच्याकडे पुन्हा जाण्याचें धैर्य मला अगर प्रधानला होईना. तेव्हां त्या कामाकरितां आम्हीं वासंतीला पुढें ढकललें. तिनें माहिती मिळवितांच मीं तिकीट काढलें आणि पुन्हा रिझर्वेशन करायला तिचीच रवानगी केली. तिची गाडी म्हैसूरहून तीन वाजतां निघणार होती आणि आमची उटकमंडला जाणारी बस दुपारीं बारा वाजतां हॉटेलवर येणार होती.

तिकीट काढल्यावर आम्हीं जरा म्हैसूरमध्यें शेवटचें भटकून घेतलें. पहिल्यानें आम्ही एक्झिबिशन बिल्डिंगमध्यें गेलों. तेथें म्हैसूरमधली शेती आणि औद्योगिक उत्पादन ह्यांची निरनिराळ्या वस्तूंच्या प्रतिकृती व चित्रें ह्यांच्या द्वारें उत्कृष्ट माहिती दिलेली आहे. त्याचप्रमाणें सर्व हिंदुस्थानांत निरनिराळ्या ठिकाणीं होणाऱ्या कलाकुसरीच्या अनेक वस्तू तेथें ठेवलेल्या आहेत. उद्योगधंदे आणि शेती ह्यांविषयीं तेथें मिळालेली माहिती फार मनोरंजक आणि उपयुक्त वाटली. पण आम्ही खरे थक्क झालों, ते कलाकुसरीच्या वस्तू पाहून! इतकी सफाई, इतका नाजुकपणा, इतकी विविधता त्यांच्यामध्यें होती कीं, डोळे त्यांच्यावरून काढवत नव्हते. असल्या वस्तूंची सोबत आपल्या रोजच्या जीवनांत आपल्याला मिळाली तर किती बरें होईल, असें मला वाटलें. आणि मग वाटलें कीं ह्या घेण्यासारखी आपली परिस्थिति नाहीं हेंच तर बरें आहे. कारण रोजच्या जीवनांत अशा वस्तूंची अडगळच होण्याचा संभव जास्त. आपली श्रीमंती संभाळण्यांतच ज्यांचा सारा जन्म फुकट जात आहे, अशीं अनेक माणसें माझ्या माहितीचीं आहेत. आणि त्यांच्यांत जमा होण्याची माझी इच्छा नाहीं.

ह्या प्रदर्शनांतल्या वस्तू अतिशय आकर्षकपणें मांडून ठेवलेल्या मला आढ-

ळल्या. तेथल्या कापडाची तर वासंतीच्या मनावर भुरळ पडली. "हें येथें विकतां का?" असा तिनें शिपायाला प्रश्न विचारला. आणि त्यानें नाहीं म्हटलें तेव्हां ती खट्टू झाली. "मग मेलें इथें मांडून कशाला ठेवलें आहे तें?" असा तिनें मला रागावून प्रश्न विचारला. आणि त्या प्रश्नाचें तिला समाधानकारक असें उत्तर मला देतां न आल्यामुळें ती अधिकच रागावली.

त्यानंतर आम्हीं टेक्निकल इन्स्टिटयूटच्या शोरूम्स बघितल्या. तेथें म्हैसूरमध्यें बनणाऱ्या कलाकुसरीच्या वस्तू मांडलेल्या आहेत. एखादी वस्तू आवडली तर तावडतोब तेथेंच विकत घेतां येते.

लाकडाचे सुंदर हत्ती, हस्तिदंताच्या पेट्या आणि मूर्ती, शिंगांचे बनवलेले ॲश ट्रे अशा अनेक छान वस्तू तेथें होत्या. तसल्याच वस्तू आम्हीं आधीं दुकानांत पाहिल्या होत्या आणि थोड्या खरेदीदेखील केल्या होत्या. पण तेव्हां त्या वस्तू पहाण्यांत मी रमलों नव्हतों. त्या विकत घेण्याकरितां आपण पहात आहोंत ह्या कल्पनेनें माझें मन नाखूष झालें होतें. पण येथें विकत घेण्याची जबरदस्ती नव्हती. मालाची तारीफ ऐकावी लागत नव्हती. त्यामुळें माझें मन त्या वस्तू पहाण्यांत रमलें. किती तरी वेळ मी त्या शोरूममध्यें भटकत होतों. सगळ्या वस्तूंवरून माझी नजर हळुवारपणें आणि चिकित्सकपणें फिरवीत होतों. वासंती निघण्याची सूचना करीत होती, पण माझा पाय तेथून निघतच नव्हता.

विशेषतः एका झाडाला हत्तीनें सोंडेनें विळखा घातला आहे, अशा स्वरूपाचा हॅटस्टँड मला फार आवडला. हत्ती तर तेथें अनेक होते. कांहीं उधळलेले, कांहीं सोंडा उचललेले, तर कांहीं गजसपणें चालत असलेले. कांहीं शिसवी, तर कांहीं रोझवुडचे! नटेश्वराच्या मूर्तीदेखील तेथें मी अनेक पाहिल्या. ह्या नटेश्वरानें खरोखर मला भुरळ घातली आहे. त्याच्या चेहेऱ्यावर व्यक्त होणारी तीव्र भोगलालसा आणि कलात्मक उन्माद, त्याच्या रेखीव अवयवांत सळसळणारें सामर्थ्य, त्याच्या उचलेल्या एका पायांतून व्यक्त होणारा उन्मत्त आत्मविश्वास आणि विजिगीषु वृत्ति, त्याच्या लांब हातांतलें लालित्य, त्याची एकंदर गतिमानता, आणि त्याच्या भोंवतींचें तें दैवी भव्य चक्र!

हिंदु मनाचा एके काळचा हा आदर्श होता. जीवनाकडे पहाण्याची ही वृत्ति हिंदूंना मान्य होती. पण आतां आम्ही किती बदललों आहोंत! भोगाची आम्हांला शरम वाटते, सामर्थ्याचा अव्हेर करण्यांत आम्ही भूषण मानतों आणि जीवन जगण्याचा आम्हांला उत्साहच वाटेनासा झाला आहे. सगळ्या

हौशी आणि प्रवृत्ती दडपून टाकण्यांत आम्हांला मोठेपणा वाटतो. छे ! छे ! हें बदललें पाहिजे आणि तो नटेश्वर ज्या वृत्तींतून निर्माण झाला ती वृत्ति पुन्हा आमच्या अंगांत बाणली पाहिजे.

अखेर अनिच्छेनेंच तेथून मी बाहेर पडलों. हॉटेलमध्यें येऊन आम्हीं जेवण वगैरे उरकलें आणि आपल्या सामानाबरोबर वासंतीनें माझेंहि सामान बांधून तयार केलें. माझ्याकरितां आतांपर्यंत ज्या अनेक बारीक बारीक गोष्टी ती करीत आली होती त्या आतां पुढच्या प्रवासांत माझ्या मलाच कराव्या लागणार होत्या. अमकें हरवूं नका, तमकें हरवूं नका, असें ती मला सांगत होती आणि मला काम करावयाची संवय नसल्यामुळें माझें कसें अडेल तें प्रधानाला सांगत होती. आपला नवरा एखाद्या लहान मुलासारखा आपल्यावर अवलंबून आहे अशी कल्पना करून घेण्यांत बायकांना फार आनंद वाटत असतो आणि त्यांची तशीच कल्पना राहूं देण्यांत पुरुषांचा बराचसा फायदा असतो.

तीन वाजतां वासंतीची गाडी होती. तिला गाडींत नीट बसवून द्यायला मीं हॉटेलच्या मॅनेजरला सांगितलें. गृहस्थ फारच चांगला ! तिची त्यानें चांगली सोय केली असें वासंतीकडून नंतर कळलें.

बारा वाजतां मोटार हॉटेलच्या दारांत आली आणि मी व प्रधान निघालों. वासंतीनें चेहेऱ्यावर हास्याची बरीच पावडर फांसली होती. पण तिचा चेहरा अंमळ उतरलाच होता. पुन्हा पुन्हा मीं तिला हात हलवला.

मोटारनें गांवांत फारसा वेळ काढला नाहीं. ती लवकरच मार्गाला लागली. म्हैसूरहून उटकमंड शंभर मैल दूर आहे. तेथें पोहोंचायला आम्हांला जवळजवळ आठ तास लागले. अर्थात् मध्यें ठिकठिकाणीं थांबण्यांत बराच वेळ गेला. म्हैसूर–उटकमंड रस्ता फार चांगला आहे. कांहीं भागांत पक्की सडक आहे, तर कांहीं भागांत कॉंक्रीटचा रस्ता आहे.

म्हैसूरच्या आसपास हिरवळ आहे. पण म्हैसूर राज्याची सरहद्द संपेपर्यंत प्रदेश रुक्षच आहे. आणि समुद्रसपाटीपासून म्हैसूरच्या पठाराची उंची जरी अडीच हजार फूट असली, तरी वाटेंत आम्हांला उन्हाचा बराच त्रास झाला. त्याच्या जोडीला मोटारींतल्या लोकांची बडबड होतीच. ह्या कानडी लोकांना वक्तृत्व-कला उपजतच प्राप्त होत असावी. नेहमींच ते मोठ्या अभिनिवेशानें बोलत असतात आणि आपल्या बोलण्यानें लोकांचीं डोकीं उठत असतील हें समजण्या-इतकें डोकें त्यांना बहुधा नसतें.

वाटेंत आमच्या मोटारींत एक पोस्टमन चढला. बावळटपणाचा एक अस्सल नमुना म्हणून अजून तो माझ्या स्मरणांत राहिला आहे. अगदीं किडकिडीत आणि मरतुकडा! त्याचा चेहेरा खप्पड आणि कळकट होता. आणि त्यानें घातलेल्या आपल्या केसांच्या भल्या मोठ्या अंबाड्यानें त्या चेहेऱ्याची शोभा खात्रीनेंच वाढत नव्हती. त्यानें कोरा, खळीमुळें कडकडीत असलेला पोस्टाचा गणवेश घातला होता. त्या कडकडीत गणवेशांत तो अडकल्यासारखा दिसत होता. आपल्या टोपींत आपला अंबाडा अर्धवट कोंबतांना त्याला फारच प्रयास झाले असावे आणि त्या टोपीचाहि कांहीं कमी छळ झाला नसावा. कारण ती तीन ठिकाणीं मोडली होती.

अंबाड्याचा निर्देश वर आलाच आहे, तेव्हां त्याच्याविषयीं आणखी थोडें लिहितों. दक्षिणेंत सगळे लोक अंबाडे घालून हिंडत असतील अशी माझी कल्पना होती; आणि पूर्वी म्हणे खरोखरच तसें होतें; पण आतां मात्र अंबाडे-वाले लोक तेथें क्वचितच दिसतात. सुधारणा आतां खेड्यापाड्यांपर्यंतदेखील जाऊन पोहोंचली आहे आणि सगळेच लोक आतां सर्रास केस कापून तुळ-तुळीत भांग पाडूं लागले आहेत.

मोटर टिकठिकाणीं थांबत होती. आम्ही चांगले खरपूस भाजून निघत होतों. सिगारेट ओढली तर डोकें चढत होतें, नाहीं ओढली तर काय करावें तें सुचत नव्हतें. वाटेंतल्या हॉटेलांतल्या चहाचे नमुने फारच नमुनेदार होते आणि उघडा संडास ही चीज दृष्टीस पडल्यावर नैसर्गिक विधि उरकणेंदेखील मुश्कील झालें होतें.

हा सगळा त्रास कमी होता म्हणून कीं काय, एके ठिकाणीं दोन-चार शिष्ट माणसें मोटारींत चढलीं. आमच्याच शेजारीं ते लोक दाटीवाटी करून बसले. मग त्यांच्या ध्यानांत आलें कीं, कांहीं तरी राहिलें आहे. तें आणण्या-करितां एक मनुष्य सायकलीवरून गेला आणि सावकाश परत आला. त्यानंतर एका माणसाला ते आपल्याबरोबर चालण्याचा आग्रह करूं लागले. तो नाहीं म्हणूं लागला आणि त्या 'गोड' भांडणांत आणखी वेळ मोडला. ते जोंपर्यंत मोटारींत होते, तोंपर्यंत त्यांनीं जिथें तिथें वेळ मोडला. कुठें कोणाला निरोप कळवायचा होता, वस्तू द्यायच्या होत्या, नाहीं तर निदान सिगरेट्स तरी विकत घ्यायच्या होत्या. शिवाय त्यांना इंग्रजी येत होतें, तरी ते हळू बोलायला शिकले नव्हते.

ते उतरून गेले तेव्हां आम्हांला हायसें वाटलें.

वाटेंत उन्हामुळें घडलेली गंमतीदार गोष्ट मीं पाहिली. उकडत असतां एकदम वाऱ्याचा झोत आला. त्या झोतामुळें रस्त्यावरची धूळ वाटोळी वाटोळी उडूं लागली. गरगरत वर जाऊं लागली. सोबत गवताच्या काड्या आणि पानें-देखील वर उडूं लागलीं. त्या गरगरत्या धुळीचा व गवताचा एक उंच बारीकसा खांब तयार झाला. आणि रस्त्यावरचा इतर धुरळा व वाळलेलीं पानें वाऱ्याच्या झोतांत त्या खांबामागून अधीरेपणानें धांवलीं—आगीच्या बंबामागून धांवणाऱ्या पोरांसारखीं !

इतका वेळ आम्ही सपाट प्रदेशांतून चाललों होतों. पण आतां नीलगिरीचीं बळडीं दिसूं लागलीं, आणि रस्त्याला चढण लागूं लागली. घाटाच्या सुरुवातीलाच एका रामाच्या देवालयाजवळ मोटार थांबली. ड्रायव्हर लगबगीनें उतरला आणि देवासमोर उदबत्त्यांचा जुडगाच्या जुडगा लावून परत आला.

आम्हीं विचारलें, " उदबत्त्या कां लावल्यास ? "

तो म्हणाला, " ह्या देवळांत उदबत्त्या लावल्याशिवाय आम्ही घाट चढत नाहीं. उदबत्त्या लावल्या म्हणजे घाटांत धोका पोहोंचत नाहीं. "

ह्या बापड्या अशिक्षित ड्रायव्हरांना त्यांच्या अंधश्रद्धेबद्दल हसण्यांत अर्थ नाहीं. कारण चांगले शिकलेले वैमानिकदेखील अंधश्रद्धपणानें वागतांना मीं पाहिलेले आहेत. देव नांवाची गोष्ट जोंपर्यंत आहे, तोंपर्यंत माणसें दैवगतीवर विश्वास ठेवणारच.

थोडा फार घाट आम्ही चढलों हें खरें, पण नीलगिरीचें सौंदर्य कोठें आमच्या नजरेस पडलें नाहीं. जंगल थोडें थोडें दाटत होतें. पण तें गर्दहि नव्हतें आणि भीतिदायकहि नव्हतें.

कांहीं वेळानें आम्ही म्हैसूर-मद्रास सरहद्दीवर येऊन पोहोंचलों, आणि म्हैसूर हद्दींतच आमची मोटर थांबली. ड्रायव्हरनें सांगितलें कीं, मोटारच्या इजिनांत बिघाड झाल्यामुळें मोटार घाट चढूं शकणार नाहीं. तेव्हां उटीहून जी मोटार खालीं येईल तीच आम्हांला वर घेऊन जाईल आणि तिच्यांतले उतारू घेऊन आमची मोटर परत म्हैसूरला जाईल.

आम्हीं घाबरून विचारलें, " येईल ना रे बाबा तुझी मोटार ? नाहीं तर रात्र इथेंच जंगलांत काढायला लावशील. "

ड्रायव्हर म्हणाला, " काळजी करूं नका, साहेब. मेल आहे ना माझ्या

गाडींत. मेल वर जायलाच पाहिजे."

ह्यामुळें आम्हांला जरा विश्वास वाटूं लागला.

जवळच्याच एका खोपटांत जाऊन आम्हीं चहा मागवला आणि कॉफी घेतली. दोन तेलकट शिळे बडे पण खाल्ले. ड्रायव्हरनें तेथें शक्य तितकी आमची सरबराई राखण्याचा प्रयत्न केला. म्हणजे बसायचा बाक झटकून दिला आणि पाण्याचे ग्लास स्वच्छ धुवायला सांगितले.

तेथून आम्ही बाहेर पडलों आणि इकडे तिकडे पाहूं लागलों.

समोरच सरहद्दीवरचा म्हैसूर सरकारचा भव्य दरवाजा दिसत होता. त्यावर म्हैसूरची एकत्र असलेल्या दोन गरुडांची सोनेरी राजमुद्रा होती. पलीकडे मद्रास हद्दींत असला दरवाजा कोठें कांहींच नव्हता. फक्त 'Prohibition Ahead' असें भल्या मोठ्या अक्षरांत दरडावून सांगणारी पाटी होती.

सरहद्दीनें माझी निराशाच केली. लहानपणीं तर माझी अशी कल्पना होती कीं सरहद्दीवर मोठी तटबंदी असेल, त्या तटबंदीच्या पलीकडे पाण्यानें भरलेला खंदक असेल. पलीकडे जायचें म्हणजे एक पूल त्या खंदकावर पडत असेल आणि त्या पुलावरून पलीकडे गेलें म्हणजे तो ताबडतोब उचलला जात असेल. शिवाय उग्र मुद्रेनें संगिनी रोखून परस्परांकडे तोंड करून सैनिकांच्या रांगा तेथें उभ्या असतील, आणि केव्हां गोळ्या झडतील व तरवारींचा खणखणाट सुरू होईल त्याचा कांहींच नेम नसेल. सरहद्दीविषयीं ही कल्पना आतां अर्थातच माझ्या मनांत राहिलेली नाहीं. तरी पण सरहद्द ओलांडण्यांत कांहीं विशेष आहे असें मनाला वाटतेंच. पण इथें तसें वाटायला लावणारें कांहींच नव्हतें. तारेचें कुंपणदेखील नव्हतें! दोन्ही सरकारचीं पोलिस नाकीं होतीं. पण तीं जराशीं दूरच होतीं. प्रधान अगदीं सहजपणें सरहद्द ओलांडून मद्रास प्रांतात गेला. मी म्हैसूर राज्यांतच राहिलों. आणि दोन निरनिराळ्या राज्यांत उभे राहून आम्हीं गप्पा मारल्या!

नंतर आम्ही म्हैसूर हद्दींतच रस्त्याच्या कडेला असलेल्या धर्मशाळेंत गेलों. तेथल्या कट्ट्यावर बसलों आणि मग थोड्या वेळानें झोपलोंदेखील. किती सुंदर एकांत होता तेथें. तेथें असलेल्या एक दोन झोपड्या आणि पोलिस नाकें सोडलें तर तेथें वस्ती अजिबात नव्हती—तेथेंच नव्हे, तर आसपासच्या बऱ्याच मैलांच्या टापूंतदेखील नसावी. त्यामुळें तेथें विलक्षण स्तब्धता होती. इतक्या स्तब्धतेंत प्रत्येक आवाजाचा स्वतंत्रपणा, निराळेपणा तीव्रतेनें जाणवत होता.

आणि त्या आवाजाचें मनावर संस्कार करायचें सामर्थ्य वाढलें होतें. एखाद्या गुहेंत बोललें म्हणजे जसा आवाज घुमतो, तसे हे आवाज मनांत घुमत होते.

आजुबाजूला दाट जंगल होतें. मात्र तें हिरवें आणि मन प्रसन्न करणारें नव्हतें. निष्पर्ण साग आणि वटल्यासारखीं वाटणारीं बांबूंचीं बनें तेथें गच्च वाढलेलीं होतीं. त्या बांबूंचा सुकलेला पाचोळा आणि सागाच्या निष्पर्ण पिंजारलेल्या फांद्या, ह्यांमुळें सगळें कसें भकास वाटत होतें. तें वाढलेलें गवत, सुकलेला पाचोळा, पिवळे पोक्त बांबू, आणि भेगा पडलेले दाढरलेले सागांचे बुंधे ह्यांची पिंगट, करड्या, राखाडी रंगाची अवकळा सर्वत्र पसरली होती. शांतता जणुं पोट फुगून मेली होती आणि तेवलें उष्ण दगाळ वातावरण त्या वेड्यावाकड्या, पिंजारलेल्या फांद्या ओरबाडत होत्या.

तेथल्या झोपड्यांच्या आसपास कोंबड्या आपल्या पिलांचे ताफे घेऊन धुळींत नसलेलें अन्न शोधीत होत्या. आणि त्या निष्पर्ण झाडांच्या फांद्यांवर दुःखी चेहेऱ्याचीं माकडें रिकामटेकडीं बसलीं होतीं. मध्येंच अस्वस्थपणें शेपट्या उंचावून इकडून तिकडे जात होतीं. रांगेनें रस्त्याच्या कडेला बसत होतीं. क्वचित् एकमेकांना चपकारे मारत होतीं. माकडें हीं लोकांना विनोदाचा विषय वाटतात. पण त्यांचे चेहेरे मला नेहमींच दुःखी दिसतात.

धर्मशाळेच्या कट्ट्यावर आम्ही पडून राहिलों होतों. मोटार येण्याची वाट पहात होतों. खरें म्हणायचें म्हणजे मला मोटर यायचीच काय पण कशाचीहि उत्सुकता वाटत नव्हती. नुसतें तेथें गप्प पडून रहावेंसें वाटत होतें.

तेवढ्यांत आमच्या मोटरचा क्लीनर तेथें आला. दबकत दबकत आमच्याशीं बोलण्याचा प्रयत्न करूं लागला. आम्ही मराठे असें कळतांच तो म्हणाला, "मला मराठी येतें."

त्यामुळें त्याच्याविषयीं आम्हांला कुतूहल वाटलें आणि आम्हीं त्याची चौकशी केली. त्यानें आम्हांला आपली कहाणी सांगितली. हिंदुस्थानांत सर्वत्र ऐकूं येणारी तीच ती कहाणी ! दारिद्र्याची, अगतिकेची आणि सोशिकपणाची ! तो आम्हांला म्हणाला, "साहेब ! मला वाटलें तुम्ही मुसलमान आहांत !"

मी थक्कच झालों. माझ्यावर अनेक आरोप आजपर्यंत झाले आहेत, पण मी मुसलमान असल्याचा आरोप कोणी केलेला नाहीं. माझ्या हिंदुत्वाचा मला तसा अभिमान असल्यानें मीं मनांतून त्याच्यावर जरा रागावलोंच ! आणि मग त्याला असें कां वाटलें त्याचा विचार करूं लागलों.

मला वाटतें, आम्ही राष्ट्रभाषेंत बोलण्याचा प्रयत्न करीत असल्यामुळें असें झालें असावें. कारण इकडे दक्षिणेंत हिंदी जर कोणाला थोडी फार येत असेल तर ती मुसलमानांनाच. म्हणून इथल्या सामान्य लोकांच्या दृष्टीनें ती मुसलमानांचीच भाषा असावी. शिवाय प्रधानदेखील ह्या कल्पनेस कारणीभूत असावा ! प्रधानचे केस वाढलेले होते. त्याचे काट अर्ध्या गालावर उतरलेले होते. आणि त्यानें काळ्या काचांचा चष्मा लावलेला होता. मला असा संशय येतो कीं, त्यानें तेव्हां शर्टहि हिरव्या रंगाचा घातला होता. आपली फेल्ट हॅट घातल्यावर तो सिनेमांतल्या चोरासारखा दिसत होता हें खरें आहे, पण फेल्ट हॅट काढल्यावर त्यानें मुसलमानासारखें दिसायला कांहींच हरकत नव्हती. त्याच्याबरोबर असल्यामुळें मीहि मुसलमान ठरलों होतों, कीं माझ्या पोषाखांतहि कांहीं मुसलमानी झांक होती तें प्रधानच सांगू शकेल.

असो. आम्हीं अशा जरा गप्पा केल्या. जरा सिगारेट ओढली आणि जरा माकडांना दगड मारले. माकडांच्या उभारलेल्या शेपट्यांच्या हुकाप्रमाणें वांकड्या झालेल्या टोकांना सिगारेटचें टोक लावण्याची मला फार इच्छा होत होती. पण ती अपुरीच राहिली ! तेवढ्यांत वरून मोटार आली. मोटारींच्या डोक्यावरच्या सामानाची अदलाबदल झाली आणि मग आमच्या पुढच्या प्रवासास सुरुवात झाली.

म्हैसूर–मद्रास सरहद्द ही नुसती राजकीयच नव्हे तर नैसर्गिक सरहद्दहि आहे असें आमच्या लवकरच ध्यानांत आलें. कारण सरहद्द ओलांडली कीं, जंगल अधिक दाट व हिरवें होतें, घाटाचा खरा चढ सुरू होतो आणि भाषादेखील बदलते. कानडीचें अधिराज्य संपून तामीळचा प्रदेश सुरू होतो.

मोटार सुरू झाली. आणि खिडकीबाहेरचें सौंदर्य नजरेनें लुटण्यांत आम्ही मग्न झालों. तें निष्पर्ण भकास जंगल मागें पडलें होतें, आणि आतां हिरवें गर्द अरण्य सुरू होत होतें.

तेवढ्यांत छोटेंसें हरीण आपली तोकडी शेपटी हलवीत आमच्या मोटरसमोरून रस्ता ओलांडून गेलें. आम्हांला विलक्षण आनंद झाला. आणि मोटारींतल्या लोकांनीं जेव्हां सांगितलें कीं, वाटेंत हत्तीदेखील दिसण्याचा संभव आहे, तेव्हां तर आम्ही टकटकां बाहेर पाहूं लागलों. मला तर प्रत्येक झाडाच्या आड हत्ती लपून बसले आहेत असें वाटूं लागलें. असें वाटत होतें कीं, एखाद्या माजलेल्या हत्तीनें सोंड उभारून कर्कश आवाज करावा आणि आमच्या मोटारवर धडक मारून तिचा चुराडा करावा. माझींदेखील दोन चार

झाडें मोडावीं. आणि मग हॉस्पिटलमध्यें पडल्या पडल्या भेटायला आलेल्या मित्रांना आपल्यावर ओढवलेल्या रोमांचकारी प्रसंगाची हकीकत सांगावी. सगळ्यांच्या मनांत आपल्याविषयीं जबरदस्त आदर निर्माण करावा !

मला वाटतें कीं माझ्यासारखें मध्यमवर्गीय सुरक्षित जीवन जगणाऱ्या सगळ्यांच्याच मनांत अशा इच्छा घोळत असाव्यात. आणि बढाई मारण्याची हौस सोडून दिली, तरी शारीरिक संकटांना ज्या जीवनांत तोंड द्यावें लागत नाहीं तें जीवन अपुरें वाटतें. आपल्या शारीरिक सामर्थ्याचा प्रत्यय आल्या-शिवाय स्वतःविषयीं खरा अभिमान वाटूं शकत नाहीं.

माझी इच्छा ढीग होती. पण गजराजांची कांहीं मला दर्शन देण्याची इच्छा दिसली नाहीं. खूप टकटकां पाहून मी अखेर हिरमुसला होऊं लागलों तेवढ्यांत मागें बसलेला क्लीनर ओरडला, “ तो पहा, तो पहा हत्ती. ”

आम्ही माना बाहेर काढकाढून पाहूं लागलों. पण आम्हांला कांहीं हत्ती दिसला नाहीं.

आमच्या ड्रायव्हरनें त्या क्लीनरच्या ओरडण्याकडे सुरुवातीला लक्ष दिलें नाहीं. पण तो सारखाच जेव्हां बोटें दाखवीत राहिला, तेव्हां ड्रायव्हरला सुबुद्धि सुचली आणि मुंबईच्या लोकांना हत्ती दाखविण्याकरतां त्यानें मोटर थांबवली. थोडा वेळ टकटकां पाहिल्यावर आम्हांला अखेर झाडाझुडपांच्या गर्दीतून गजराजांचें अंधुक दर्शन झालें. हत्ती फार मोटा नव्हता, पण चांगला पुष्ट दिसला. शांतपणें तो झाडाझुडपांच्या छायेंत विसांवा घेत उभा होता. खालीं उतरून जवळ जाऊन पहावें अशी मला फार इच्छा होती. पण मोटर-ड्रायव्हरनें बहुधा ऐकलें नसतें, आणि शिवाय धोका होताच.

हत्तीनें जाग्यावरून हलावें म्हणून ड्रायव्हरनें मोटरचें शिंग वाजविलें. त्याबरोबर हत्ती हलला आणि डुलत डुलत पावलें टाकीत जंगलांत दिसेनासा झाला. आमची मोटरहि मग पुढें चालू झाली. त्यानंतर आणखी कांहीं जंगली जनावरें दिसतील अशा आशेनें आम्हीं खूप टकटकां पाहिलें, पण आमच्या नजरेस कांहींच पडलें नाहीं. एवढे गवे व वाघ त्या जंगलांत वस्ती करून आहेत; त्यांपैकीं एखादा जरा रस्त्याच्या कडेला येऊन उभा राहिला असता आणि आमच्याकडे पाहून हंसला असता, तर मी म्हणतों, काय बिघडलें असतें ? प्रधाननें तर आनंदानें त्यांचे फोटो काढले असते आणि त्यांना पोस्टानें पाठवून दिले असते.

आम्ही जात होतों त्या रस्त्याच्या कडेनें एक लहानशी नदी वहात होती. कधीं वळसे घेत, तर कधीं सरळ; कधीं वेगानें, तर कधीं संथपणें! कधीं तिच्या पाण्यांत हिरवें प्रतिबिंब थरथरत होतें, तर कधीं सूर्याचे किरण डुंबत होते. कधीं खडकांतून तिचें पाणी खळाळत होतें, तर कधीं झाडांच्या सांवलींत लपलेल्या डोहांत हिरवा विसांवा घेत होतें. जमिनींत, पाळेंमुळें घट्ट रोंवून, स्वतःला सांवरीत, किनाऱ्यावरचीं झाडें त्या प्रवाहावर झुकलीं होतीं. आणि गर्द कमानींतून, उन्हाचे कवडसे टिपीत, ती नदी वळसे घेऊन अदृश्य होत होती. ती कुठच्या यक्षभूमीकडे चालली होती बरें? वाटत होतें कीं एका लहानशा होडींत बसून त्या नदींतून तरंगत जावें आणि झाडींत दडलेल्या त्या रहस्याचा भेद करावा.

थोडा वेळ अशी ती नदी अदृश्य होई खरी, पण पुन्हा रस्त्यानें एक वळण घेतलें आणि एक चढण चढली कीं ती दृष्टिपथांत येई. किती तरी वेळ त्या नदीनें लपंडाव खेळत खेळत आम्हांला सोबत केली. पण अखेर एकदां ती लपली ती कायमचीच. ती दृष्टिआड झाली तेव्हां माझें मन विषण्ण झालें.

गनात विहार करतांना वाट चुकलेल्या कुठच्या राजकन्येच्या अश्रूंतून ती नदी निर्माण झाली होती बरें? कुठें होता त्या राजकन्येचा आवडता देखणा राजपुत्र? मस्तकावर तुरा लावून तो माझ्या हृदयांत घोड्यावरून दौडत होता. सगळ्यांच्याच हृदयांतून तो दौडत असतो. कांहींना त्या टापांचा आवाज ऐकूं येतो आणि कांहींना तो येत नाहीं इतकेंच!

आम्ही वर वर जात होतों तसतसा वनप्रदेश किती हिरवा आणि किती ओला होत होता! डोंगरांच्या कड्यांवरून हिरवी संपत्ति खालीं दऱ्यांत कोसळली होती, उतारांवर अडकली होती, रस्त्याच्या कडेला बिलगली होती. तिचे ढीगच्या ढीग अस्ताव्यस्तपणें जिकडे तिकडे पडले होते. विद्युल्लतेच्या लत्ता-प्रहारानें नीलगिरीच्या मस्तकावर कोसळलेलें हें वैभव पावसांत नहात होतें. सूर्यप्रकाशांत चमकत होतें.

पाऊस पडत होता आणि ऊनहि पडलें होतें. ओली थंडी कपड्यांत शिरूं पहात होती. पावसाचे थेंब अंगावर ठिबकत होते. चष्म्याच्या काचांवर जमून त्या हिरव्या दृश्याचें भिंग फोडून टाकीत होते.

वाटेंत आम्हांला एक छोटें खेडें लागलें. खेडें कसलें! दहा बारा घरें रस्त्याच्या कडेला बिलगून उतारावर तोल सांवरून उभीं होतीं. घरें सगळीं

बांबूंचींच होतीं. बांबूंच्या भिंती, बांबूंचीं छपरें, बसायला बांबूंचीं बाकें आणि भोंवतीं बांबूंचीं कुंपणें. खेळण्यांतल्यासारखीं तीं घरें होतीं. त्यांच्यासमोर उवलींशीं अंगणें होतीं. आणि त्या अंगणांत अरण्य आलें होतें. सारें गांवच मुळीं अरण्यांत अर्धवट बुडालेलें होतें.

जरा पुढें, पावसांत भिजूं नये म्हणून एक काळासांवळा, उघडानागडा माणूस, गवताच्या गंजींत अंग चोरून लपून बसला होता.

किती वेगळें आणि आकर्षक होतें हें सगळें ! आपल्या हिंदुस्थानांत असें कांहीं असेल अशी मला कल्पनाच नव्हती. मला वाटूं लागलें कीं मी कुठच्या तरी दूरच्या देशात आहें. अद्भुताच्या सीमारेषेवर येऊन पोंहोंचलों आहें !

थोड्या वेळानें गुडालूरला आम्ही पोंहोंचलों आणि तेथें मोटार थोडा वेळ थांबली. नीलगिरीच्या उतारावर वसलेलें हें छोटेंसें गांव मोठें टुमदार आहे. टुमदार कौलारू घरांच्या उतरत्या रांगा भोंवताली दिसतात. थंडाव्यानें भिजलेल्या ह्या गांवावर पावसाचा शिडकाव सारखा होत असावा. निदान आम्ही पोंहोंचलो तेव्हां तरी होत होता. ह्या गांवच्या जंगली ठेवणींत आधुनिकता गंमतीदारपणें मिसळली होती. येथें हॉटेलांतून विजेचे दिवे लागले होते आणि छाती उडवीत ठिमकणारीं पंजाबी ढंगाचीं गाणीं रेडिओवरून ऐकूं येत होतीं. हे विजेचे दिवे आणि हीं गाणीं आमच्या चांगलीं परिचयाचीं होतीं. पण येथें मात्र तीं परकीं आणि चवदार वाटत होतीं.

थंडाव्यानें भुकेला धार चढली होती. त्यामुळें आम्ही तेथल्या एका हॉटेलांत गेलों. तेथें अतिशय लुसलुशीत असा पांढरा पाव आम्हाला फार दिवसांनीं खायला मिळाला. त्या पावाबरोबर हॉटेलवाल्यानें दिलेलें चवचवीत मटण मोठें रुचकर लागलें. आणि वर गुलाबी रंगाचा, तुरटसा चहा जो त्यानें आम्हांला दिला, त्यामुळें जीभ खूप झाली, छाती शेकली आणि अंगांत उबारा आला. इथें इतकें चांगलें खायला मिळाल्यामुळेंच बहुधा ह्या ठिकाणच्या गुडालूर या नांवांत प्रधाननें लाडुगूर असा सोयिस्कर व अर्थपूर्ण फरक केला असावा. मोटरवाल्यानें शिंग वाजवलें तेव्हां त्याला चिल देऊन आम्ही धांवतच मोटारींत शिरलों; पण नंतर मात्र पेट्रोलच्या पंपाजवळ मोटार दहा मिनिटें उभी होती.

आतां आम्ही अधिकाधिक उंच चाललों होतों. जे कडे आम्हीं वेंधले होते, ते आतां खालीं छात्या पुढें काढून नीलगिरीला सांवरून धरत असलेले दिसत होते. आणि त्यांच्या पायाशीं म्हैसूरचें पठार दूरवर पसरलेलें होतें. प्रचंड खडक संध्या-

काळचें गुलाबी उन्ह खांत मस्तपणें पडले होते. आणि डोंगरांच्या वळयावळयांतील गच्च झाडी अंधाराच्या भीतीनें अंग चोरून घेत आहे असें वाटत होतें.

जसजसे आम्ही वर गेलों तसतसें त्या भोंवतालच्या दाट हिरव्या झाडीचें स्वरूप पालटूं लागलें. आतां केवढाले तरी सरळ उंच गेलेले वृक्ष आमच्या नजरेस पडूं लागले. त्यांचे शेंडे थेट आकाशाला जाऊन भिडले होते आणि गगनचुंबी हें विशेषण केवळ अतिशयोक्तींतून निर्माण झालेलें नाहीं हें पटवीत होते. सिंकोना, युकॅलिप्टस्, रबर वगैरे झाडांचीं आम्ही नुसतीं नांवेंच ऐकत होतों. पण आतां तीं प्रत्यक्ष पाहिलीं. ह्या सरळ, निमुळत्या होत गेलेल्या झाडांच्या मध्यें तशींच पण लहान आकाराचीं झाडें वाढलेलीं होतीं. आणि त्याच्यावर पांढऱ्या फुलांचे झुपके आलेले होते. कुठें कुठें चहाच्या बागा दिसत होत्या. चहाच्या त्या डुबऱ्या, पानांनीं डंवरलेल्या झुडपांविषयीं मला विशेष आत्मीयता वाटावी हें सहाजिकच होतें. ह्या कॉफीच्या साम्राज्यांत चहाकडे रसिक दृष्टीनें पहाणारे लोक विरळेच असले पाहिजेत. त्यामुळें ही आत्मीयता जास्त तीव्र झाली होती. ह्या चहाच्या झुडपाचें उन्हा-वाऱ्यापासून संरक्षण करण्याकरतां त्यांच्या बागांतून झुपकेदार पानाचीं झाडें लावलेलीं होतीं. चहाच्या बागांप्रमाणेंच कॉफीच्या बागादेखील मधून मधून लागत होत्या. पण त्याच्याकडे मी केवळ अलिप्त दृष्टीनेंच पाहूं शकलों. रस्त्याच्या कडेला अनेक वेली आणि झुडपें माजलीं होतीं आणि त्याच्यावर चिमुकलीं रंगीबेरंगी फुलें फुललीं होतीं. तीं फुलें मला बालकवींच्या कवितेतील शब्दांसारखीं वाटलीं. ह्या वृक्षराजीच्या सान्निध्यामुळेंच कीं काय, अर्धवट वाळलेल्या रस्त्यावरच्या ओलाव्यांतूनहि झाडांच्या आकृती निर्माण झाल्या होत्या. तीं ओलाव्याचीं पर्णहीन, वेडींवाकडीं झाडें मी किती तरी वेळ न्याहाळत होतों.

तें सारें दृश्यच माझ्या मनःपटलावर अजून गोंदलेलें आहे. दूरवर धूसरपणें म्हैसूरचें पटार दिसत होतें. नीलगिरीच्या आसमंतात टेकड्यांच्या रांगा वेड्यावांकड्या पसरलेल्या होत्या आणि त्याचा चुण्याचुण्यांचा विस्तृत, वैभवशाली उतार सावकाश, थाटामाटानें उतरत गेलेला होता. मध्येंच तो उतार तुटला होता. आणि नीलगिरीला पाठीचा आधार देत, आपलीं बोडकीं डोकीं पुढें काढून, रांगडे कडे उभे होते. त्या उताराच्या चुण्याचुण्यांतून काळसर हिरवी गर्द झाडी दबा धरून बसली होती. ह्या साऱ्या दृश्यावर काळेभुरके ढग लंपटपणें तरंगत होते. अगदीं जवळ निमुळत्या होत गेलेल्या विस्ताराचे भव्य वृक्ष सरळ आकाशाला

जाऊन भिडले होते आणि त्यांच्या काळसर पोक्त बुंध्यांत घोटाळणाऱ्या झुडपांवर चिमुकलीं फुलें हसत होतीं. सगळें हिरवें होतें. सगळें ओलें होतें. नीलगिरीचा नीलिमा सर्वत्र सांकळला होता आणि त्या नीलिम्यांतून मावळत्या सूर्याची झळाळी पोपटी रंगाची दिसत होती. असा पोपटी सूर्यास्त मीं कुठेंच पाहिला नव्हता. पर्वतांचें आणि वृक्षराजीचें असें विपुल वैभवहि मीं कधीं न्याहाळलें नव्हतें.

मग सूर्यास्त झाला. विषण्ण संधिप्रकाशांत धुकें तरंगूं लागलें. आणि थोड्याच वेळानें त्या साऱ्या दृश्यावर काळोख फांसटला गेला. हेडलाइटसूच्या तीव्र प्रकाशाच्या पळत्या झोगद्यांतून आमची मोटर चालली होती. त्या प्रकाशाच्या झोतांत झाडेंझुडपें परस्परांत चमत्कारिकपणें मिसळलीं होतीं, झांकलीं गेलीं होतीं. मोटरींतल्या डायल्स चकचकत होत्या, सुया नाचत होत्या आणि मोटरच्या इंजिनाचा आतांपर्यंत न जाणवलेला आवाज कर्णरंध्रें भरून टाकीत होता.

थंडी अंगाला चिकटली होती. आपली लांब बोटें कपड्यांच्या आंत सरकवत होती. ती सर्व बाजूंनीं कपड्यांत शिरली. बुटांतदेखील तिनें प्रवेश केला. पायाच्या तळव्यांत ती चिकटली. पायांचीं बोटें तिनें बधिर केलीं. हात तर थंडीनें पोळून निघाले. कानाच्या पाळया नुसत्या थंडगार झाल्या. नाकाचा शेंडा आपला नाहीं असें वाटूं लागलें. डोळ्यांत आंतदेखील थंडी शिरली. चष्मा जरा सरकला कीं त्याच्या फ्रेमच्या थंड स्पर्शानें चटका बसूं लागला आणि केसांत तर थंडीनें आपलें घरच बांधलें होतें.

खाकेंत हात मुडपून, नाकांतून वाफ सोडीत आम्ही कुडकुडत बसलों होतों आणि मोटर धांवत होती. मध्येंच दिव्यांचें एक मोहोळ नजरेसमोर तरंगूं लागलें. तें पैकारा गांव होतें. तेथें विजेचा मोठा कारखाना आहे. तेथल्या पाण्याचें झुळझुळणें ऐकत आम्हीं ती दिव्यांची यक्षभूमि मागें टाकली. आणि मग थेट उटकमंडच्या यक्षनगरींत प्रवेश केला.

हॉटेलचे एजंट अंगावर तुटून पडले.पण आम्ही थंडीनें कुडकुडत असतां जेवढा धीरगंभीरपणा दाखवतां येईल तेवढा दाखवून म्हणत होतों, "मॉडर्न हिंदु हॉटेल."

आणि तेथेंच आम्ही गेलों.

चार घांस जेवण घेतलें. दिवसाला सहा आणे ह्या भाड्यानें ब्लँकेटें घेतलीं. स्वतःच्या उबेनें अंथरुणें गरम होईपर्यंत अर्धा तास तळमळत काढला. आणि मग डोक्याला वाजणाऱ्या थंडीवर कांहीं उपाय शोधून काढण्याचा अयशस्वी प्रयत्न करीत असतां झोपेनें आम्हांला नकळत आपली गुंगी दिली.

## :१०: उंच वृक्ष आणि चिमुकलीं फुलें

सकाळ झाली. झोप पळाली. पण अंथरुणांतून हलावें असें मला वाटत नव्हतें. कारण थंडींत आम्हीं अगदीं बुचकळून निघत होतों. पांघरुणाबाहेरचे हात ती कांकडून टाकत होती. चेहेऱ्याच्या कातडींतून आंत जाऊन खोलवर डसत होती. श्वासाबरोबर श्वासनलिकेंत शिरून अस्वस्थ करीत होती. पांघरुणाच्या फटीफटींतून आपलीं बोटें आत सरकवत होती. जरा बाजूला वळलें कीं तिच्यामुळें थंड झालेला अंथरुणाचा भाग चटके देत होता. शक्य तों अवयव आंखडून, सगळें शरीर पांघरुणांत गुरगुटण्याचा प्रयत्न मी करीत होतों. खोलींतल्या रिकाम्या फायर प्लेसमध्यें जर विस्तव पेटवला तर त्याच्या नारिंगी ज्वालानीं मिटक्या मारीत थंडी कशी खाऊन टाकली असती, त्याविषयींच्या उबदार कल्पनांचे निखारे मनांत फुलत होते आणि शरीरावर मात्र थंडीचा कांटा उलत होता.

असे बराच वेळ आम्ही आळशीपणांत गुरफटून होतों. अखेर कल्पनेनें स्वतःच्या कमरेंत लाथ मारून मीं स्वतःला उठवलें. प्रधाननेंहि तसेंच केलें असावें. उत्साहानें मीं ताबडतोब तोंड धुतलें. तो उत्साहच मला नडला. कारण मला थंडगार पाण्यानें तोंड धुवावें लागलें. प्रधाननें आळशीपणा केला. आणि त्यामुळें त्याला नोकरानें आणलेलें गरम पाणी मिळालें. नंतर तो एक दिवसाआड दाढी करीत असल्यामुळें, मीं माझे गाल सोलून काढीत असतां, तो सिगारेटच्या धुरानें गाल फुगवीत होता.

अशा स्थितींत मीं त्याला 'दुष्टा, हरामखोरा!' म्हणावें हें सहाजिकच होतें. नव्हे, मीं त्याला 'अधमाधमाधमा' असेंच म्हणायला हवें होतें आणि त्यांतला 'धमाधमा' हा आवाज तोंडाऐवजीं हातानें काढायला पाहिजे होता.

बाहेर व्हरांड्यांत गेलों, तेव्हां तिरप्या सूर्यकिरणांचे सपकारे त्या उंच वृक्षांवर मारले गेले होते आणि त्यांच्या पानापानांवरून उन्ह खालीं गळत आहे असें वाटत होतें. त्या वृक्षांच्या लांबलचक सांवल्या अस्ताव्यस्तपणें जमिनीवर लोळत होत्या आणि सर्वत्र डोंगराच्या उतारावरून उन्ह घसरगुंडीचा खेळ खेळत खालीं उतरलें होतें.

गरम म्हणून नोकरानें आणलेला पण आम्हीं घेईपर्यंत थंड झालेला चहा घेऊन आम्ही बाहेर पडलों, तेव्हां आम्हाला त्या तिरप्या सूर्यप्रकाशांत उटकमंडचें दर्शन झालें. सभोंवतीं नीलगिरीच्या शिखरांचे उंचवटे आणि मध्यें खोलाटींतलें मैदान, अशा भव्य नैसर्गिक ॲम्फिथिएटरमध्यें उटकमंड वसलेलें आहे. मधल्या मैदानांत पांढरें लाकडी कुंपण असलेला, लंबवर्तुळाकार रेसकोर्स आहे. त्याच्या एका बाजूला स्टेशन व मोटर स्टँड आहेत, दुसऱ्या बाजूला बाजार आहे आणि सभोंवतालच्या उतारांवर घरांच्या उतरंडी रचलेल्या आहेत. एखाद्या स्टेडियमच्या उतरत्या पायऱ्यांवर प्रेक्षक बसलेले असावे तशीं तीं पांढरीं पिवळीं घरें दिसत होतीं. आणि सकाळच्या तिरप्या उन्हांत त्या प्रेक्षकांच्या चेहेऱ्यावर असतें तसलें औत्सुक्यदेखील त्या घरांवर चमकत होतें.

आम्हीं सावकाश ऊन चाखीत, उतारावरून खालीं उतरलों आणि रेसकोर्सला वळसा घालून बाजारांत गेलों. इथली बाजारपेठ मोठी आहे आणि एखाद्या मोठ्या शहरांत मिळाव्या त्या सर्व वस्तू येथें मिळतात. येथील वळसे घेत चढउतार करणारे रस्ते चांगले डांबरी आहेत. ह्या रस्त्यांवरून नेहमीं सुंदर मोटारी तर फिरत असतातच, पण आमच्यासारख्याना फिरण्याकरितां येथें पुष्कळ टॅक्सी आहेत. रात्रीच्या वेळीं येथें दिव्यांचा चकचकाट होतो. आणि पूर्वी येथें युरोपियन लोक येत असत तेव्हां म्हणे रात्रीं येथें ते नाचगाण्याची मोठी मौज उडवून देत असत.

उटकमंडला Queen of hill-stations म्हणतात तें मला अनेक प्रकारें पटलें. शहर वसण्याकरितां इथें विस्तीर्ण जागा आहे; त्यामुळें शहराचा विस्तार मोठा असला आणि मोकळी जागा पुष्कळ असली तरी शहराला एक प्रकारचा बांधेसूदपणा आलेला आहे. येथें रस्ते चांगले आहेत. पाणी व वीज ह्यांची मुबलकता आहे. येथील हवा थंड असली तरी अगदीं अस्वस्थ करून सोडण्याइतकी थंड नाहीं. आणि पाऊस जरी येथें भरपूर पडत असला, तरी तो तेथें रहाणें अशक्य करीत नसावा. कारण पावसाळ्यांतदेखील तेथें लोक वस्तीला असतात असें आम्हीं ऐकलें. महाबळेश्वरला जशी सापांची फार भीति असते, तशी येथें नाहीं. कारण इतक्या उंचीवर आणि इतक्या थंडींत साप तग धरूं शकत नाहींत. मात्र शिकार करायची असली तर येथें वाघ, रानडुकरें व हरणें मिळूं शकतात. मन प्रसन्न करणारी, चित्रविचित्र फुलांनीं सुशोभित केलेली हिरवळ येथें सर्वत्र पसरलेली आहे. आणि उतारावर उभे

राहून आकाशाला मस्तक भिडविणारे भव्य वृक्ष नीलगिरीच्या राजवैभवाची साक्ष येथें देत असतात. निळ्या शिखरांच्या आणि निळ्या आकाशाच्या पार्श्वभूमीवर ते निश्चल वृक्ष पाहिले कीं मनाचीं क्षितिजें रुंदावतात. दृष्टि निर्मल होते. कल्पनेची ईर्षा चढते. विचारांना धार येते.

दिवसभर मनमुराद भटकलें तरी येथें यत्किंचित्‌हि दमायला होत नाहीं. उटकमंडला Queen म्हणण्यांत विशेष औचित्य आहे असें मला वाटतें. कारण येथलें सौंदर्य राजस व भव्य असलें तरी त्यांत पौरुष कमीच आहे. येथें अक्राळविक्राळ दऱ्या नाहींत, बेछूटपणें हजारों फूट खालीं कोसळणारे कडे नाहींत आणि दाट भीतिदायक जंगलेंदेखील नाहींत. तेथल्या सगळ्या सौंदर्यांत एक प्रकारचें मार्दव आहे आणि तेंच मार्दव तेथल्या लोकांच्या वागणुकींत-देखील आहे. तामीळ लोक इतरत्र जरी तितके चांगले वाटत नसले, तरी येथें त्यांची वागणूक मोठी आदबशीर असते.

माथेरानला मी हिल स्टेशन समजायला तयार नाहीं. तें जर हिल स्टेशन असेल तर मग वारुळाला टेकडी कां समजूं नये? पण महाबळेश्वरची तुलना उटकमंडशीं करणें योग्य ठरेल. दोन्ही ठिकाणें आपल्या परीनें सुंदर असलीं तरी त्यांत गंमतीदार फरक आहे. उटकमंडला जसें एक बांधेसूद शहर एकत्र वसलेलें आढळतें तसें महाबळेश्वरला आढळत नाहीं. एवढी मोठी, साधारण सपाट अशी जागाच तेथें नाहीं. त्यामुळें तेथील वस्ती विखुरलेली आहे. एक बंगला दुसऱ्या बंगल्यापासून किती तरी दूर असतो आणि प्रत्येक बंगला एकाकीपणें आपल्याच गुर्मींत असतो. महाबळेश्वर हें खेडवळ आणि रांगडें वाटतें. तेथली बाजारपेठ तुटपुंजी आहे. तेथें वस्तीहि थोडी असते. नागर जीवनाच्या सुखसोयी तेथें फारशा नाहींत. तेथें चढउतार फार आहेत. डोळे फिरवणारे कडे आहेत. अक्राळविक्राळ दऱ्या आहेत. तेथें उटकमंडसारखे उंच गगनचुंबी वृक्ष नाहींत, पण तेथली झाडी अधिक किर्र आणि भीतिदायक आहे. पावलोपावलीं तेथें साप निघायची धास्ती असते. आणि तेथल्या लोकांत नागर आदबशीरपणापेक्षां, खेडवळ रांगडेपणाच अधिक आहे. उटकमंडला Queen म्हटलें तर महाबळेश्वरला King म्हणणें योग्य दिसेल. मात्र हा King फक्त पांच हजार फूट उंचीचा आहे. उटकमंडला साजेल असा Kign शोधून काढा-यचा म्हणजे हिमालयांतच गेलें पाहिजे.

आम्ही बाजारपेठेंत गेलों. तेथें खोकल्याचें कारण (म्हणजे सिगारेटस्)

आणि त्यावरचें औषध या दोहोंची एकदमच खरेदी केली आणि मग आम्हीं तेथल्या बागेंत जायला निघालों. वाटेंत आम्हीं एका म्हाताऱ्या गृहस्थांना बागेचा रस्ता विचारला, तेव्हां ते म्हणाले, "चला, मीच येतों तुमच्याबरोबर."

आणि काठी टेकीत टेकीत ते गृहस्थ आमच्याबरोबर चालूं लागले. आमची चालण्याची गति एकदम मंदावली. आम्ही किती हळू चाललों तरी त्या गृहस्थांच्या पुढेंच जात होतों आणि मग त्यांच्याकरितां आम्हांला थांबावें लागत होतें. अशा थाटांत बागेंत पोहोंचल्यावर ते म्हणाले, "आपण जरा बाकावर बसूं या. कारण मीं नुकतीच न्याहारी केली आहे."

उटकमंडची ही बाग डोंगराच्या उतारावर वसवलेली आहे. निरनिराळे गगनचुंबी वृक्ष ही त्या बागेची मुख्य शोभा ! आपल्या पानांच्या हिरव्या लोकरीची शाल पांघरून सुरूच्या जातीचीं उंच झाडें तेथें उभीं होतीं. त्यांच्या त्रिकोणी पर्णसंभाराचे हिरवे मिनार मधून मधून वाऱ्यावर डुलत होते. युकॅलिप्टसच्या पांढऱ्या खोडाच्या झाडांचीं नाजुक पांढुरकीं पानें विगलितपणें खालीं लोंबत होतीं आणि औषधी गंध हवेंत सोडत होतीं. कांहीं झाडें नुसतीं सरळसोट खूप उंच गेलीं होतीं आणि फक्त त्यांच्या डोक्यांवर पर्णसंभारांचे झुपके दिसत होते. कांहीं झाडांच्या फांद्या छाटलेल्या होत्या आणि हात तुटलेल्या योद्धयासारखीं तीं दिसत होतीं. शिवाय इतर अनेक निबर, भेगा गेलेल्या खोडांचे जुने वृक्ष तेथें होते. त्यांच्या खोडांना सांवल्या चिकटल्या होत्या आणि त्यांच्या पानांतून उन्ह खेळत होतें.

वळसे घेत वर जाणाऱ्या रस्त्यांवरून आम्ही ह्या वृक्षांच्या खालून हिंडत होतों. आणि बागेचें सौंदर्य न्याहाळत होतों. जागोजाग तेथें हिरव्या गवताचे गालिचे अंथरलेले होते. ठेंगण्या टुसक्या झुपकेदार झुडपांचे वाफे आणि कुंपणें तेथें होतीं. त्यांच्या नाजुक नक्षीदार पानांचे झुपके मोठे गोंडस वाटत होते. यक्षबालकांच्या हातांसारखीं तीं पानें वाटत होतीं. त्यांतलीं कांहीं छोटीशीं लालचुटुक पानें तर फुलांच्या सौंदर्याशीं स्पर्धा करीत होतीं.

तेथल्या फुलांचें सौंदर्यदेखील लक्ष वेधून घेणारें होतें. लालसर, डाळिंबी, निळया, पांढऱ्या रंगाचीं अनेक फुलें तेथें फुललीं होतीं. एका तुरेदार फुलांत तर अनेक गुलाबी नाग फणा काढून उभे होते. दुसऱ्या एका नारिंगी तुऱ्यांत चिमुकलीं फुलें इतकीं दाटीवाटी करून बसलीं होतीं कीं, तीं चिरडलीं कशीं नाहींत ह्याचें आश्चर्य वाटत होतें. कांहीं फुलें इतकीं नाजुक आणि विर-

विरीत होतीं कीं, तीं पाहतां पाहतां वाऱ्यांत विरघळून जातील असें वाटत होतें. आणि इतक्या सुंदर फुलांच्या सान्निध्यांत असूनदेखील गवतावरचीं छोटीं पिवळीं, पांढरीं फुलें आपल्या साध्या सौंदर्यानें मन आकर्षून घेत होतीं. लांब, नाजुक देठावर तरंगणारें त्यांतलें एक मीं खुडून घेतलें आणि किती तरी वेळ माझ्या मुठींत मी तें संभाळीत होतों. जणुं तें हरवूं नये अशी माझ्या हृदयांतल्या सौंदर्यासक्तीनें मला शपथच घातली होती.

फुलांची विखुरलेली शोभा आम्हीं बागेंत सर्वत्र पाहिली. पण जेव्हां आम्हीं तेथल्या फुलांच्या जोपासना-गृहांत ( nursery ) गेलों तेव्हां अनेक रंगांचें भांडारच आमच्या नजरेसमोर खुलें झालें. बावरून फडफडणारीं असंख्य फुलपांखरें एकत्र कोंडलीं आहेत असें वाटत होतें. बालकांचीं निर्व्याज हास्यें, प्रीतीच्या लाजऱ्या छटा, तेथें पुष्परूपानें गोठल्या होत्या. इंद्रधनुष्यानें लाजावें अशीं रंगांचीं मनोहर मिश्रणें तेथें झालीं होतीं. चौफेर उधळलेलें तें सौंदर्य पाहून माझें भान हरपलें.

त्या तंद्रींतच बाकी सगळ्या बागेंत मी हिंडलों. अनेक प्रकारें ती बाग सुंदर करण्यांत आली होती. वेलींनीं आच्छादिलेल्या छोट्या गुहा आणि गुंफा तेथें बनवलेल्या होत्या. कुठें एखादा दगड असला तर त्याच्याभोंवतीं पाण्याची तळी करून त्यावर एखादी वेल सोडलेली होती. आणि त्या दगडावर वेलीवरचीं फुलें फुलत होतीं. साधारण मध्यभागीं बँडस्टँड होता आणि त्याच्यासमोर एक पाण्याचें छोटें डबकें होतें.

पानाफुलांना नजरांनीं गोंजारीत मी त्या बागेच्या बाहेर पडलों. तेथें सारें किती शांत होतें. उन्ह झाडांच्या फांद्यांत अडकलें होतें, हिरवळीवर विसावलें होतें. गावातले आवाज तेथें पायात रबरी बूट घालून येत होते. निस्तब्धतेंत हरवून जात होते. आणि फुलांवर तरंगणारें एखादें पिवळें फुलपांखरूं तसेंच पहातां पहाता अदृश्य होत होतें. वाऱ्याची झुळूक आली कीं त्या निश्चल वृक्षावरचीं पानें तेवढीं लवलवत होतीं आणि त्यांची निश्चलता मनांत् अधिकच स्थिर होत होती. बागेंत माळी कुठें तरी खुरपीत होता आणि एक म्हातारें युरोपियन जोडपें मूकपणानें, कांहींच न पहात, समोर पहात बसलें होतें.

शांततेच्या त्या झंकारानें माझें मन व्यापून टाकलें. जीवनातले सगळे नेहमींचे परिचित आवाज मला परके परके वाटूं लागले. युद्ध, महागाई, दुष्काळ ह्या सगळ्या गोष्टी मला खोट्या वाटूं लागल्या. माझें शिकवणें, माझें

लेखन, माझे वादविवाद हेदेखील खोटे वाटूं लागले. ते उंच उंच वृक्ष आणि तीं गवतावरचीं चिमुकलीं फुलें, ते निळे डोंगर आणि ती दाटलेली शांतता एवढेंच काय तें खरें होतें. फक्त तेवढेंच खरें होतें.

असो. नीलगिरींच्या पायथ्याशीं असलेल्या जंगलांत हिंडावें आणि तेथील हिंस्त्र पशू पहावे अशी आमची फार इच्छा होती. म्हणून तेथें फिरण्याकरितां परवानगी मिळावी म्हणून आम्ही जंगल खात्याच्या कचेरींत गेलों. उटकमंड असलें म्हणून काय झालें ! तेथल्या सरकारी ऑफिसातलें वातावरण इतरत्र असतें तसेंच होतें. तेंच तें जुनेंपानें फर्निचर! त्याच त्या पिवळ्या फाइली ! पण तरी गुलाबी थंडी आंत भरून राहिली होती. खिडकींतून वेली आंत डोकावत होत्या आणि कचेरीच्या आवारांत ते उंच वृक्ष आणि तीं चिमुकलीं फुलें वाढलीं होतीं. त्या बाहेरच्या वातावरणानें आंतल्या माणसांच्या मनांवरदेखील परिणाम केला असावा. कारण ते लोक आमच्याशीं फार चांगले वागले. आम्हांला हवी ती परवानगी द्यायची त्यांनीं तयारी दाखवली. पण त्यांनीं सांगितलें कीं, सरकारी हत्ती कामांत गुंतले असल्यामुळें, आम्हांला जंगलांत फिरवण्याकरितां हत्ती मिळणें शक्य नव्हतें. म्हणजे आम्हांला जंगलांतून पायीं तरी हिंडावें लागणार होतें अगर मोटरनें शक्य तितकें फिरून परतावें लागणार होतें.

खट्टू होऊनच आम्ही बाहेर पडलों. ऐटींत हत्तीवर बसून एखाद्या संस्थानिकाच्या ऐटींत जंगलांत हिंडावें अशी आमची फार इच्छा होती. त्याकरितां खालसा झालेल्या एखाद्या संस्थानिकाचा पोषाख भाड्यानें मिळण्यासारखा असल्यास तो घेण्यासदेखील आम्हीं मागेंपुढें पाहिलें नसतें. चार भाडोत्री लोकांकडून मुजरे करून घेऊन, त्यांचे फोटो मित्राना दाखविण्याइतका निगरगट्टपणा प्रधानच्या अंगीं खात्रीनें होता. पण तो सगळाच बेत आतां फिसकटला होता. जंगलांत पायीं फिरणें धोक्याचें होतें आणि एखाद्या वाघ कुटुंबाच्या न्याहारीला आमचा उपयोग व्हावा अशी आमची सुतराम् इच्छा नव्हती.

श्री. वाघ व सौ. वाघ ह्यांचें आमच्यावरून काय संभाषण झालें असतें त्याची मला कल्पना होती.

श्री. वाघ म्हणाले असते, "लाडके! रोज रोज तूं हरणें खाऊन कंटाळली आहेस ना? म्हणून आज मीं मुद्दाम माणसाचें मटन आणलें आहे!"

सौ. वाघ वास घेत म्हणाल्या असत्या, "वा! वा! हीं मुंबईचीं माणसें दिसताहेत. मिसेस् सिंहांच्याकडे काल मेला एक मद्रासी आणला होता तर कोण मिजास ऐकत होतें. आतां घ्या म्हणावें!"

श्री. वाघ मला डासाळून म्हणाले असते, "तें जाऊं दे ग! हा मुंबईकर चांगला लुसलुशीत लागतोय्."

सौ. वाघ प्रधानला चघळीत म्हणाल्या असत्या, "नाहीं गडे! हा दुसराच जास्त चवदार आहे."

हें संभाषण रुचकर असलें तरी आम्हांला आवडण्यासारखें नव्हतें. त्यामुळें आम्हीं एका टॅक्सीवाल्याला "आम्हांला जंगलांतून फिरवून आणशील का?" असें विचारलें. पण तोहि बेटा नाखुष दिसला. तो म्हणाला, "जंगलांत फिरवून माझ्या गाडीची खराबी होईल. शिवाय समजा, एखाद्या गव्यानें धडक वगैरे मारली तर?"

आम्हांला आणि टॅक्सीवाल्याला वाटणाऱ्या भीतींत बराच अतिरिक्तपणा होता ह्याची मला कल्पना होती. जंगलांतील जनावरें अशीं उगीचच माणसाच्या अंगावर जात नाहींत हें पुष्कळ ठिकाणीं वाचलें व ऐकलें होतें. पण खर्चाच्या दृष्टीनेंदेखील तें जंगलांत फिरणें आम्हांला परवडण्यासारखें नसल्याकारणानें, तो बेत आम्हीं रद्दच केला.

एव्हांना कावळे पोटांत कावकावच नव्हे तर इतरहि अनेक आवाज करूं लागले होते. तेव्हां ह्या कावळ्यांना गप्प बसविण्याची कांहीं तरी सोय करणें अवश्य होतें. त्या वेळीं निदान प्रधानच्या पोटांतले कावळे तरी सांबार-भात खाऊन तृप्त व्हायला तयार नव्हते. मटनाचें मिलिटरी खाणेंच त्यांना हवें होतें. (इथें मांस-मच्छीचें खाणें देणाऱ्या हॉटेलला मिलिटरी हॉटेल म्हणतात आणि त्या खाण्याला मिलिटरी खाना म्हणतात!) तशा प्रकारचें खाणें मिळेल का, अशी आम्हीं बाजारांतल्या हॉटेलांत चौकशी केली. तेव्हां झुरळ झिडकारावें तशा थाटांत तेथला मॅनेजर म्हणाला, "No. Strictly Vegetarian."

दक्षिणेंत मांसाहार एकंदर कमी प्रमाणावर होत असावा, असा माझा तरी समज झाला आहे.

असो. अधिक चौकशी करण्याच्या भानगडींत न पडतां आम्हीं स्टेशनची वाट धरली. कारण आम्हांला हवें तें जेवण स्टेशनवर हमखास मिळतें असा आमचा अनुभव होता.

स्टेशनवर जाण्यांत आमचा दुसराहि एक हेतु होता. तो म्हणजे हॉटेलांतल्या लोकांच्याबरोबर जेवणें टाळण्याचा. सगळे हात बरबटून आणि तोंडांतून विचित्र आवाज काढीत जेवण्याची ह्या लोकांची पद्धत आम्हांला माहीत असली, तरी वासंती बरोबर असेपर्यंत आम्हांला तिचा संपर्क लागला नव्हता. कारण 'फॅमिली' म्हणून आमची जेवायची निराळी व्यवस्था होत असे. पण उटकमंडला आल्यावर मात्र सगळ्या लोकांत बसून जेवण्याचा प्रसंग आमच्यावर आला. आणि समोरच्या माणसांच्या बोटांच्या दुबेळक्यांतून जेव्हां पचकन् भात बाहेर आलेला आम्हीं पाहिला, तेव्हां आम्हांला मळमळल्यासारखें होऊं लागलें. आणि त्यांच्या तोंडांतून येणाऱ्या विचित्र आवाजानें तें मळमळणें कांहीं कमी झालें नाहीं. शिवाय ह्या लोकांचें जेवणहि चवदार असतें असें मला वाटत नाहीं. हां! त्यांच्या सांबाराला शंभरापैकीं दीडशें मार्क द्यायला मी तयार आहें. पण त्यांच्या भाज्या आणि त्यांचें तें रसम् हे पदार्थ मला बेचव वाटले. तसेंच पहिल्यानें भात, दुसऱ्यानें भात आणि तिसऱ्यांदाहि भातच ही गोष्ट प्रधानला मंजूर होणें अजिबात शक्य नव्हतें.

ह्या लोकांची वाढण्याची पद्धतहि विचित्र आहे. हे लोक केळीच्या पानावर अगर पत्रावळीवर वाढतात. आणि स्वच्छतेच्या दृष्टीनें तें योग्यहि वाटतें. पण वाट्या अजिबात न वापरतां, नुसत्या पानांतच जेवायचें हें आपल्या इकडच्या लोकांना त्रासदायक वाटतें. पानातून पळणाऱ्या सांबाराचा पाठलाग करीत आणि रसम्‌ला भाताच्या भिंती घालून अडवीत होणारें हातघाईचें जेवण आपल्या प्रकृतीला मानवत नाहीं.

त्यामुळें सांबारभाताशीं अशी हातघाई न करतां, मटन-पुलावाला चमच्या-काट्यानिशीं तोंड देणेंच आम्हीं पसंत केलें. माझ्या चेहेऱ्यावरून समाधानाचे ओघळ वाहूं लागले आणि प्रधानचा चेहेरा तर समाधानानें भिजून चिंब झाला.

जेवणाच्या आधीं आम्हीं येथील आगगाडी पाहिली होती. स्टीफनसनच्या रॉकेटनें जी गाडी पहिल्यानें ओढत नेली ती बहुधा हीच असावी. आगपेटी-सारखे ह्या आगगाडीचे लहान लहान डबे होते. ह्या डब्यांना खिडक्या वगैरे कांहीं नव्हत्याच. वर छप्पर होतें आणि माणसांनीं चढूं नये म्हणून खालीं चौफेर कठडा होता. तो कठडा आणि छप्पर ह्यांमधला भाग रिकामाच होता. गाडीला दोनच वर्ग होते. पहिला आणि तिसरा. आणि ह्या दोहोंच्या तिकिटांच्या दरांत फार फरक असल्यामुळें फॅशनेबल युरोपियन बायका थर्ड क्लासमध्यें

बसलेल्या दिसत होत्या व त्यामुळें गंमत वाटत होती. ह्या आगगाडीचें आणखी एक वैशिष्ट्य असें कीं, तिच्या दोन रुळांच्यामध्यें तिसरा दात्यादात्यांचा एक रूळ होता. त्या दात्यांत अडकून फिरण्याकरितां गाडीच्या मध्यभागीं तशींच दात्यादात्यांचीं चाकें लावलेलीं असावींत. गाडीनें उतारावरून घसरूं नये म्हणूनच ही विचित्र क्लृप्ति वापरलेली होती.

तें बेढब इंजिन, ते एवढेसे उघडे डबे आणि आंत बसलेल्या त्या गोऱ्या फॅशनेबल बायका! हें सगळेंच विचित्र होतें. आणि नीलगिरीच्या निसर्गवैभवाच्या कोंदणांत ती विचित्र गाडी अधिकच विचित्र वाटत होती. उटकमंडहून निघून ही गाडी कुठच्या तरी यक्षभूमींत जात असावी असें वाटत होतें. निसर्गाचें अद्भुत सौंदर्य जेथें नित्य परिचयाचें, तेथें कुरूप यंत्रच अद्भुत वाटत होतें.

नेहमींप्रमाणें स्टेशनमास्तरला चौकशा करून बेजार केल्यावर आम्ही हॉटेलवर परतलों आणि दुपारच्या थंडाव्यांत सुस्तावलों.

चहा घेऊन आम्ही डोडाबेट्टावर स्वारी करायला निघालों. डोडाबेट्टा हें नीलगिरीचें सर्वांत उंच शिखर. त्याची उंची सुमारें ८७५० फूट आहे. मला वाटतें कीं हिमालय सोडल्यास, हिंदुस्थानांत दुसऱ्या कुठच्याहि पर्वताची इतकी उंची नसावी. तीन चार मैल पक्क्या रस्त्यानें गेल्यावर मग पायवाटेनें ह्या शिखरावर चढावें लागतें. पायवाटेनें साधारण अर्धा तास चालावें लागतें. सगळेंच अंतर आम्ही सहज पायानें जाऊं शकलों असतों. पण डोडाबेट्टा किती लांब आहे व कुठें आहे ह्याचा कांहींच पत्ता नसल्याकारणानें आम्हीं टॅक्सी केली.

आमचा टॅक्सीवाला तामिळी होता. पण त्याला व्यवहारापुरतें इंग्रजी येत होतें. आणि त्याची वागण्याची पद्धत एखाद्या घरंदाज माणसासारखी रुबाबदार होती. माणूस मोठा बोलका होता. आणि त्यानें आम्हांला पुष्कळ गंमतीदार माहिती सांगितली. तो म्हणाला, "साहेब, इथले उटकमंडचे लोक फार चांगले आहेत. त्याचें कारण असें कीं इथें बहुतेक युरोपियन लोक रहात असत. त्यांनीं आम्हांला चांगली शिस्त लावली आहे, शिष्टाचार शिकवला आहे. ते लोक आमच्याशीं चोखपणें वागत आणि आम्हीहि त्यांच्याशीं चोखपणानें वागत असूं. म्हणून सांगतों साहेब, कीं उटकमंडला तुम्हांला कोणी फसवणार नाहीं. पण जर तुम्ही मद्रासला जाल ना साहेब, तर तेथें तुम्हांला अनेक बदमाष लोक भेटतील. तेथें तुम्ही फार संभाळून रहा, साहेब!"

इंग्लिश माणसाच्या चोखपणाची आणि शिष्टाचारांची त्यानें जी स्तुति केली

ती कोणालाहि पटण्यासारखी आहे आणि उटीच्या लोकांविषयीं जें त्यानें सांगि-तलें त्यांत बरेंच सत्य असल्याचें आम्हांला तरी आढळून आलें.

ड्रायव्हर म्हणाला, "इंग्लिश लोक होते तेव्हां उटकमंडची मिजास होती. आतां तें राहिलें नाहीं, साहेब."

उटकमंडला येऊन रहाण्याइतके श्रीमंत लोक आपल्याकडे पुष्कळ आहेत. पण श्रीमंती असली म्हणजे दानत असतेच असें नाहीं.

ड्रायव्हरनें आम्हांला आसपासच्या प्रदेशाचा भूगोल फार व्यवस्थितपणें सांगितला. पण आतां मी तो तितक्याच व्यवस्थितपणें विसरून गेलों आहें. त्याचप्रमाणें आपले बच्चे रस्ता ओलांडून जात असतां समोर उभें राहून मोटर अडवून धरणाऱ्या वाघिणीची रोमांचकारी हकीकतदेखील त्यानें सांगितली.

ड्रायव्हरनें मोटर थांबवली आणि एक गाइड बरोबर घेऊन आम्ही वर निघालों. अंगांत फाटके कपडे घालणाऱ्या त्या माणसालादेखील मोडकें-तोडकें इंग्रजी येत होतें. तेथील चढण कांहीं तशी फार कठीण नव्हती. पण तिथल्या विरळ हवेंत आम्हांला वर पोहोंचेपर्यंत बरेंच फांफू करावें लागलें. वाटेंत पिवळीं रानफुलें नुसतीं बहरलीं होतीं. झुडपांतून वाट काढीत आम्ही वर पोहोंचलों. वाटेंत इथें मला परवांच वाघ दिसला होता, असें आमच्या गाइडनें सांगितल्यामुळें भीतीचे थोडेसे रोमांच अंगावर उभे राहिले. पण ह्या नीलगिरींतल्या वाघांविषयीं आम्हीं इतकें ऐकलें होतें कीं, त्यांच्याविषयीं आम्हांला कांहींच वाटेनासें झालें होतें.

डोडाबेट्टाच्या अगदीं टोकावर ऑब्झर्वेटरीची एक जुनी पडकी इमारत आहे. तिच्या गच्चीवर चढून आम्हीं भोंवतालीं पाहिलें. आणि आमची निराशाच झाली. आजूबाजूला पाहून आम्हीं फार उंचावर आलों आहोंत असें आम्हांला वाटेना. कारण तो सगळाच भाग उंच शिखरांनीं भरलेला होता आणि मध्यें खोल दऱ्या नव्हत्याच. महाबळेश्वरला आर्थर्स सीटच्या कड्यावरून दोन तीन हजार फूट खालीं असलेली दरी पाहिली म्हणजे जसें कृतकृत्य झाल्यासारखें वाटतें, तसें ह्या नऊ हजार फूट उंचीच्या शिखरावर चढल्यावर वाटत नाहीं. असें असलें तरी भोंवतालचें दृश्य मनोवेधक आहे. भोंवतीं निळीं उंच शिखरें आहेत. त्यांच्यामधल्या खोलाटींत गर्द झाडी आहे. त्यांच्या उताराला बिलगलेलीं गांवें आणि शेतें मधून मधून दिसतात. आणि सूर्यप्रकाशांत बिलोरी आरशाप्रमाणें चमकणारीं तळीं तेथून दूरवर दिसतात.

इथल्या आसपासच्या भागांत बटाटे, भाज्या, चहा व गहूं यांची विशेष लागवड असल्याचें आमच्या गाइडनें सांगितलें.

आम्हीं उतरतांना सूर्य चांगलाच कलला होता. आणि त्याच्या तिरप्या किरणांनीं उजळलेली प्रत्येक वस्तू अधिक स्पष्टपणें आणि रेखीवपणें दिसत होती. प्रत्येक वस्तूचा वेगळेपणा आणि वैशिष्ट्य उजळण्याची ही मावळत्या सूर्याच्या तिरप्या किरणाची किमया मीं पुष्कळदां पाहिलेली आहे.

झाडांच्या रांगांतून सूर्यप्रकाश आमच्या रस्त्यावर पडला होता आणि त्यामुळें छायाप्रकाशांच्या पट्ट्यांचा एक गमतीदार जिना तेथें तयार झाला होता. त्या जिन्यावरून उतरत असतां आम्हांला वाटेंत एक चहाचा मळा लागला. आमच्या गाइडनें सांगितलें कीं त्या मळ्याचा विस्तार दोन हजार एकर होता. पूर्वी त्या मळ्याचा मालक म्हणे जेनिगन नांवाचा साहेब होता. हा साहेब मोठा हुषार आणि उपद्व्यापी होता. बिनशिंगाच्या इंग्रजी जातीच्या गायी त्यानेंच उटकमंडला आणल्या आणि अजून तसल्या गाई तेथें पुष्कळ दिसतात. शेती व जनावरांची जोपासना ह्यांत त्यानें पुष्कळ सुधारणा केल्या, प्रयोग केले. तो साहेब जसा हुषार होता तसा मोटा हौशीदेखील होता त्यामुळें उटकमंडमध्यें खूप पैसे खर्च करून, पार्ट्या आणि नृत्याचे कार्यक्रम ह्यांची खैरात उडवीत तो दिवस काढीत असे. मात्र हा साहेब फार तापट आणि कडक होता. त्यामुळें आजुबाजूच्या शेतकऱ्यांनीं त्याच्या बागांत गुरें घातलेलीं त्याला मुळींच आवडत नसत. ह्या बाबतींत त्यानें एका शेतकऱ्याला अनेकदां ताकीद दिली आणि तरी तो ऐकेना तेव्हां एक दिवस आपल्या बागेंत गुरें चारीत असतांना त्यानें त्याच्यावर गोळी झाडली. त्या शेतकऱ्याचा पाय जायबंदी झाला. नंतर साहेबावर फिर्याद झाली. आणि इंग्लिश न्यायाधीशाची न्यायबुद्धि अशी कीं त्यानें जेनिगन साहेबाला एक पै तरी दंड केलाच. साहेबानें तो दंड भरला. आणि घरीं जाऊन त्याच बंदुकीनें आत्महत्या केली.

जेनिगन साहेबाच्या नेकीची ही गोष्ट आमचा गाइड रंगून सांगत होता. आणि ती ऐकत असतां आम्ही मोटरजवळ केव्हां आलों तें कळलेंच नाहीं.

ड्रायव्हरनें आम्हांला बाजारांत सोडलें. त्याच्यावर खूष झाल्यामुळें आम्हीं त्याला भरपूर टिप् दिली आणि तो निघून गेला.

नंतर आम्हीं एका एकाकी रस्त्यानें उगीचच भटकत दूरवर गेलों. आतां काळ्या दिसणाऱ्या शिखरांमागें सूर्यास्ताची लाल झळाळी शिल्लक राहिली

होती. आणि त्या लालभडक पार्श्वभूमीवर त्या उंच उंच वृक्षांच्या काळ्या छायाकृती अधिकच उंच दिसत होत्या.

तें लालभडक आकाश, ते काळे डोंगर, त्या उंच झाडांच्या काळ्या छायाकृती ! ह्या साऱ्याच गोष्टींना त्या वेळीं प्रतीकांचें स्वरूप आलें होतें. तें लालभडक आकाश जगाला गति देणाऱ्या, विझत जळणाऱ्या, आदिशक्तीचें प्रतीक दिसत होतें. तसेंच त्या वेळीं अंधारांत डोंगर डोंगर राहिले नव्हते, वृक्ष वृक्ष राहिले नव्हते. विश्वांत जें चिरंतन आहे त्याचीं तीं प्रतीकें झालीं होतीं. आणि तीं प्रतीकें पाहून अपुरेपणाची मनांतली जाणीव जागृत होत होती, ओरबाडत होती, मन विद्ध करीत होती आणि मोठेंहि करीत होती.

दिव्यांच्या रांगेनें उजळलेल्या त्या रस्त्यानें, अंधारांतून, त्या उंच वृक्षांची भीतिदायक सळसळ ऐकत, ती निस्तब्ध शांतता आकंठ पीत आणि तिच्यांत गुदमरत, थंडीपासून अंग चोरीत आम्ही सावकाशपणें हॉटेलकडे परतलों.

त्या रात्रीं आम्ही खूप भावनावश होऊन बोलत होतों. खोल खोल आमच्या मनांत होतें तें आम्हीं बोलून टाकलें. आणि तरी आमचा एकाकीपणा शिल्लकच राहिला. एका गोड खिन्नतेंत आम्ही गुरफटलों होतों आणि तसेंच गुरफटून आम्ही झोपीं गेलों.

तीं उंच झाडें, तीं चिमुकलीं फुलें, ती निस्तब्ध शांतता आणि विरळ वातावरण ह्यांनीं आमच्या मनावर चमत्कारिक परिणाम केला होता. आमच्या आत्म्यांनाच त्यांनीं हात घातला होता आणि म्हणून आम्ही अस्वस्थ झालों होतों.

## :११: उटी ते कोइमतूर

थंडीची अंमळ संवय झाल्याकारणानें आदल्या रात्रीं जितके आम्ही कुड-कुडलों होतों, तितके ह्या दुसऱ्या रात्रीं कुडकुडलों नाहीं. पण थंडीची कांहींशी अस्वस्थ करणारी जाणीव मात्र आम्हांला सतत होत होती.

आम्ही सकाळीं जागे झालों तेव्हां आमचीं शरीरें अगदीं ताजींतवानीं झालीं होतीं. पण आमच्या मनावर खिन्नतेचें जें पटल आलें होतें तें मात्र कायम होतें. धावपळ करावी, हें पहावें, तें पहावें, हसावें, खिदळावें अशी जी आमची वृत्ति झाली होती, ती आतां पालटली होती. सकाळीं किती तरी वेळ मी व्हराड्यांत खांबाला टेकून उभा होतों. सिगारेट ओढीत फेऱ्या घालीत होतों. तीं उंच झाडें, ते हिरवे उतार, तें तल्म उन्ह आणि ती विरळ हवा ! त्यांनीं मन कसें बेचैन केलें होतें.

व्हरांड्याच्या जवळच कुंपणाच्या वेलीवर बसून एक पक्षी किती तरी वेळ गाणें म्हणत होता. त्याचें अंग करडें होतें, पोट पांढरें होतें आणि तोंड काळें होतें. त्याच्या शेपटीजवळ आणि डोळ्याजवळ एक एक नारिंगी ठिपका होता. ते ठिपके उन्हांत तळपत होते. त्याच्या मस्तकावर एक त्रिकोणी तुरा होता आणि त्याची चोंच टोकाजवळ रुंद झालेली होती. वारा आला कीं त्याच्या अंगावरची लव उमलत होती. आणि तो शेपटी किंचित् वांकवून तल्लीनतेनें गाणें म्हणत होता.

मीं त्याला विचारलें, "Little bird ! What is thy song ?"

पुनः पुनः त्यानें आपलें गाणें म्हणून दाखविलें; पण मला तें समजलें नाहीं. आणि मग तो भुर्रकन् उडून गेला.

नेहमींच्या उत्साहानें नव्हे तर रेंगाळतच आम्ही तेथल्या तलावाच्या दिशेनें फिरायला गेलों. तलाव दृष्टिपथांत आल्यावर मात्र माझ्या अंगांत उत्साह संचारला. तलावांत होडी वल्हवायला मिळाली तर मोठी बहार होईल अशी कल्पना डोक्यांत आली आणि त्याकरितां कुठें होडी दिसते का म्हणून इकडे तिकडे पाहूं लागलों.

तेथें जवळच दोन मजूर तळ्यांतल्या एका बाजूला माजलेल्या वेली ओढून काढीत होते. त्यांच्याजवळ एक जुनी, अवजड होडी होती. ती वल्हवणें कांहीं मोठेंसें सुखदायक झालें नसतें. पण 'तेवढेंच', अशा विचारानें आम्हीं त्या

मजूरांना " होडी देतां का ? " म्हणून विचारलें. त्यांनीं आम्हांला पलीकडल्या बाजूला वल्हवायला होड्या मिळतील म्हणून सांगितलें. म्हणून आम्ही तलावाच्या कडेकडेनें पुढें चालूं लागलों. थोड्या वेळानें आम्हांला तलावाच्या किनाऱ्याला असलेलें सरकारी रेस्ट हाऊस दिसलें. आम्ही त्याच्या आवारांत शिरलों तेव्हां तेथला खानसामा बाहेर आला आणि त्यानें आम्हांला मोठ्या अदबीनें सलाम केला. युरोपियन लोकांच्या तालमींत वाढल्यामुळें इथले सगळेच लोक मोठे आदबशीर झाले आहेत.

आम्हांला होडी हवी आहे असें कळतांच त्यानें मोटमोठ्यानें हाका मारून पलीकडच्या होडीवाल्याला बंगल्याजवळ होडी आणायला सांगितलें. तो लगबगीनें धांवत होडींत बसला आणि होडी वल्हवूं लागला. पण त्याला यायला थोडा वेळ लागेल असें दिसल्यामुळें आम्ही त्या खानसाम्याशीं गप्पा मारूं लागलों. तो इंग्लिश कामापुरतें बोलूं शकत होता. एस्. एस्. सी. चा छाप घेऊन बाहेर पडणाऱ्या बऱ्याच मुलांपेक्षां तो खात्रीनें चांगलें इंग्लिश बोलत होता. काटकुळा म्हातारा असा तो होता. त्याच्या हाताची चामडी लोंबूं लागली होती. मानेच्या शिरा दिसूं लागल्या होत्या आणि त्याच्या चेहेऱ्यावर सुरकुत्यांचें जाळें पसरलें होतें. त्याच्या शुभ्र गणवेशावर मात्र एकहि सुरकुती नव्हती.

तो म्हणे सिरियन ख्रिश्चन होता. येशू ख्रिस्ताचा शिष्य सेंट थॉमस हिंदुस्थानांत आला होता. त्यानें ख्रिस्ती धर्माची स्थापना केली. युरोपियन मिशनरी येण्यापूर्वी शेकडों वर्षें ही ख्रिस्ती जमात हिंदुस्थानांत अस्तित्वात आहे. ह्या लोकांच्या चर्चच्या आधिपत्याखालीं जे लोक येतात, ते सीरियन ख्रिश्चन म्हणून ओळखले जातात.

कुठें पॅलेस्टाइन, कुठें रोम आणि कुठें हिंदुस्थान ! पण आपण ईश्वराचे प्रेषित आहोंत, खरा धर्म आपल्यालाच सांपडला आहे, ह्या भावनेनें झपाटलेले ख्रिस्ताचे शिष्य आपला दैवी संदेश आणि आपला नवा धर्म पसरवीत हजारों मैल हिंडले. सेंट पॉल युरोपांत गेला. हा सेंट थॉमस हिंदुस्थानांत आला. बाकीचे आणखी कोठें गेले. त्यांच्या निष्ठेनें त्यांना सामर्थ्य दिलें, धैर्य दिलें.

मात्र एक महत्त्वाची गोष्ट येथें लक्षांत ठेवली पाहिजे. रोमन लोकांनीं शेकडों ख्रिश्चनांना सिंहांच्या तोंडीं दिलें. आम्हीं हिंदूंनीं मात्र तसलें कांहींच केलें नाहीं. शेकडों वर्षें हे ख्रिश्चन येथें सुखानें नांदत आहेत. हिंदूंची ही सहिष्णुता मला नेहमींच उदात्त वाटते.

हिंदुस्थानांतल्या बहुसंख्य लोकांप्रमाणें ह्या खानसाम्याची जीवितकथादेखील दारिद्र्याचीच होती. एक बायको मेल्यावर त्यानें दुसरें लग्न केलें होतें. आणि दोन्ही बायकांपासून त्याला अकरा मुलें झालीं होतीं. हा अकरा मुलांचा संसार चालवायला त्याला फक्त सद्तीस रुपये पगार मिळत होता. अकरा मुलें आणि सद्तीस रुपये! हें दारिद्र्य माझ्या समजशक्तीच्या पलीकडचें होतें. अर्थात् त्याला बक्षिशी मिळत असे. मुलेंहि कांहीं मिळवीत असत. पण त्यामुळें त्याचें दारिद्र्य कमी भीषण होत होतें असें मला वाटत नाहीं. त्याच्या चेहऱ्यावर त्या दारिद्र्याविषयीं राग नव्हता. सगळ्या हिंदी माणसांप्रमाणें त्यानें तें स्वीकारलें होतें. आपल्या दारिद्र्यावर चिडायला आपले लोक कधीं शिकतील बरें?

तेवढ्यांत होडी आली आणि आम्हीं पाण्यांत पाय न बुडवतां मोठ्या शिताफीनें आंत उड्या मारल्या. आणि मग तासभर आम्ही मनमुरादपणें होडी वल्हवत होतों. सुरुवातीला दोन्ही वल्हीं घेऊन वल्हवण्याचा मीं प्रयत्न केला. पण कुठचें तरी एक वल्हें नाठाळपणा करूं लागलें. कधीं तें हवेंतच उभारलेल्या हातासारखें थांबायचें, तर कधीं पाण्यावर थपकन् आपटून आम्हांला पाण्याची आंघोळ घालायचें. कधीं तें पाण्यांतच थबकायचें, तर कधीं होडीच्या कडेवर हापटायचें. आणि ह्या भानगडींत आमची होडी कधीं गरंकन् फिरत होती, कधीं तिरकी पुढें सरकत होती, कधीं तिचें तोंड एकदां एका दिशेला तर एकदां दुसऱ्या दिशेला होत होतें आणि किनाऱ्यापासून दूर जाण्याऐवजीं ती किनाऱ्या-जवळच्या लव्हाळ्यांत घुसत होती. नंतर प्रधाननेंदेखील हाच प्रयोग केला. मीं त्यांच्या अंगावर उडवलें होतें तितकें पाणी माझ्या अंगावर उडवल्यावर तोदेखील धांपा टाकीत बाजूला झाला. मग नावाड्यानें होडी तलावाच्या मध्यभागीं नेली आणि नंतर आम्हीं एकेक वल्हें घेऊन वल्हवण्याचा कार्यक्रम केला. एक वल्हें चालविणें अगदीं सोपें असतें.

हलत, डुलत वल्ह्यांच्या आघाताबरोबर हिसक्याहिसक्यानें पुढें सरकत आमची होडी चालत होती. वल्ह्यांच्या रुंद हातांनीं पाणी फेसाळत, ढवळत मागें ढकललें जात होतें आणि उलगडणारी नागमोडी रेषा मागें सोडीत होडी पुढें चालली होती. तलावाच्या मध्यभागीं सारें अधिकच शांत आणि स्तब्ध वाटत होतें. वल्हवण्यामुळें अंगांत आलेली ऊब मोठी सुखकारक वाटत होती आणि नीलगिरींतली थंड हवा, खोल श्वासाबरोबर छाती भरून टाकत होती.

आमचा जलविहार जितका आनंददायक होता तितकाच आमच्या नावाड्याचा

सहवासहि सुखकारक होता. खंगलेला, म्हातारा असा तो होता. त्यानें अंगांत जुना लोकरीचा कोट घातला होता आणि त्याच्या डोक्यावर फरची तसलीच टोपी होती. त्याच्या दाढींत आतां काळे केस थोडेच शिल्लक राहिले होते. त्याच्या खोल, निर्मल डोळयांत, त्याच्या साध्या, मोकळ्या हास्यांत, त्याच्या खोल, कांपऱ्या आवाजांत आणि त्याच्या सगळ्या खंगलेल्या शरीरांत कारुण्य ओतप्रोत भरून राहिलें होतें. जणुं तो सारखा म्हणत होता, "देवा! मीं यातना सहन करायच्याच असतील तर करतों बापडा! पण कां बरें? असें कां बरें?"

एखाद्या अजाण बालकाच्या साधेपणानें विचारल्या जाणाऱ्या ह्या मूक प्रश्नाला त्या परमेश्वराजवळ खात्रीनें उत्तर नसेल.

आम्हीं त्याला विचारलें, "तुझें नांव काय रे?"

"जोना, साहेब." त्यानें मोडक्यातोडक्या हिंदुस्थानींत उत्तर दिलें.

"म्हणजे ख्रिश्चन का रे तूं?"

"हां, साहेब. मीं सीरियन ख्रिश्चन आहें. पण एके काळीं मी हिंदु होतों, साहेब. तुमच्यासारखा हिंदु होतों. जगन्नाथ होतों तो जोना झालों, साहेब."

"मग? तुला बाटवलें कीं काय?"

"नाहीं, साहेब. मी खुषीनेंच झालों ख्रिश्चन. मोहब्बत आहे ना, साहेब, ती फार वाईट गोष्ट आहे. माणसाला वेडं करते ती. मोहोब्बतीखातर मी ख्रिश्चन झालों."

आम्ही कांहींच बोललों नाहीं.

तो आमच्या डोळयांत निरखून पहात म्हणाला, "चुकलें, साहेब. मोठी गलती झाली माझ्या हातून. आपला धर्म सोडणें बरें नव्हे. आणि देवानें पण मला प्रायश्चित्त दिलें त्याचें, साहेब. पाप्याला त्यानें शिक्षा केली."

"काय झालें रे?" आम्हीं विचारलें.

"मोठा मुलगा मेला माझा, साहेब. देव त्याला घेऊन गेला. तो आज असता तर माझ्या म्हाताऱ्याच्या हातांतली काठी झाला असता! म्हातारपणीं त्यानें बापाला सांभाळलें असतें. पण तकदीरात नव्हतें, साहेब. हें तकदीर म्हणजे मोठी वाईट गोष्ट आहे!"

"पण तुला दुसरीं मुलें नाहींत का?"

"आहेत ना, साहेब. मी गरीब आहें ना? गरिबांना देव भरपूर पोरें देतो! आपल्या तोंडांतलें काढून त्यांच्या तोंडांत घालायला लावतो. पण बंगलेवाल्या

लोकांना मात्र पोरें होत नाहींत. ते उपासतापास करतात, तीर्थयात्रा करतात, आणखी काय काय करतात, साहेब. पण त्यांना पोरें होत नाहींत. त्यांच्या इस्टेटी सरकारजमा होतात. आणि गरिबांना पोरांचीच इस्टेट देतो हा देव! आणि पुन्हा गरिबांना होतात त्या सगळ्या बेटया! मुलींचा काय उपयोग, साहेब? घरीं बसून खातात. लग्न झाल्यावर नवऱ्याकडे जातात. बापाला काय त्यांचा उपयोग? बापाला उपयोगी पडतो तो मुलगाच, साहेब."

भाबडेपणानें तो बोलत होता. आणि त्याच्या मोडक्या तोडक्या हिंदी भाषेमुळें त्याचें बोलणें अधिकच भाबडें आणि करुण वाटत होतें.

त्याच्या बोलण्यांत हिंदु देवांचा उल्लेख जास्त येत होता. त्याचा धर्म बदलला होता, पण त्याच्या मनांतला देव बदलला नव्हता. त्यामुळें मीं त्याला म्हटलें, "काय रे? तूं परत हिंदु कां नाहीं होत? आपले लोक तुला शुद्ध करून घेतील."

तो म्हणाला, "माझी तर केव्हांहि हिंदु व्हायची तयारी आहे, साहेब. देवानें मला शिक्षा केली तेव्हांपासूनच मला वाटलें कीं, माझें चुकलें. पण माझी बायको हिंदु व्हायला तयार नाहीं व्हायची, साहेब. ती पहिल्यापासून ख्रिश्चन आहे ना, साहेब! आतां सांगा बरें! इतकीं वर्षें संसार झाला, इतकीं मुलेंबाळें झालीं. आतां मी तिला कसा सोडूं? आणि आतां तसे माझे कुठें फारसे दिवस राहिले आहेत?"

मीं मुद्दाम म्हटलें, "तूं जर ख्रिश्चन झालास तर तुझ्या बायकोला हिंदु व्हायला काय हरकत आहे?"

ह्यावर त्याच्याजवळ उत्तर नव्हतें. म्हणून त्यानें एक गंमतीदार दृष्टान्त देऊन माझा प्रश्न निकालांत काढला. तो म्हणाला, "असें पहा, साहेब! काळी कुत्री कधीं पांढरी होईल का? आं! बोला साहेब, काळी कुत्री होईल का कधीं पांढरी?"

आणि तेंच पुन्हा पुन्हा बडबडत तो खदखदां हसूं लागला. आपल्या स्वतःच्या विनोदावर तो बेहद्द खूष झाला होता. खरोखरच तो एखाद्या लहान मुलासारखा होता.

तो विषय तेवढ्यावरच राहिला आणि मग जोना आपली परिचयाची कहाणी सांगूं लागला, "भुके मरताहेत, साहेब, भुके मरताहेत इकडचे लोक. लोक कांहीं घरीं बसून खायला मागत नाहींत, साहेब. ते काम करायला तयार आहेत. पण रोजगार मिळत नाहीं आणि महागाई तर कशी वाढते आहे,

तें तुम्हांला माहीत आहेच. गरिबाची दुनिया आतां राहिलेली नाहीं, साहेब. गरिबाची दुनिया नव्हे ही. दर वर्षी दहा पंधरा लोक ह्या तलावांत जीव देतात. ते काय, साहेब, उगीच मजेनें जीव देतात? मरायची का कोणाला हौस आहे, साहेब ?"

माना हलविण्यापलीकडे आम्ही काय म्हणणार !

"तुमच्या तिकडे मुंबईत काम आहे असें ऐकतों, साहेब. पण तिकडे तर रहायला जागाच नाहीं. आणि झाडाखालीं रहायचें म्हटलें, तर तुमच्या मुंबईत झाडेंदेखील नाहींत. अशी आहे ही तुमची मुंबई !" आणि आपल्या विनोदावर खूष होऊन तो निर्भरपणें हसला.

"तुझी पण फार गरिबी आहे का रे ?" आम्हीं विचारलें.

"गरिबी आम्हां लोकांना चुकत नाहीं, साहेब. माझी मुलगी शाळेंत जाते. तिला घालायला चांगले कपडे नाहींत माझ्याजवळ. सूर्यनारायणाची कसम खाऊन सांगतों कीं, सकाळीं फक्त लोटाभर कॉफी घेऊन निघालों मी घरून. ह्या पोटांत दुसरें काहीं नाहीं. आतां दुपारीं थोडें खायचें आणि जेवण काय तें एकदां रात्रींच ! माझी मुलगी मला एकदां म्हणाली कीं, असें जगण्यापेक्षां, बाबा, तूं मला तलावांत बुडवून कां टाकत नाहींस ? काय सांगूं मी तिला, साहेब ? मीं म्हटलें, 'असें बोलूं नको, बेटा. देवाला तें आवडणार नाहीं.' "

त्याचें दुःख इतकें मोठें होतें कीं, आम्हीं त्याला सहानुभूति दाखविणें वेडेपणाचें होतें. पण आपलें दुःख सोसायला तो शिकला होता—नव्हे, मधून मधून तो विनोद करीत होता आणि निर्भरपणें हसत होता.

त्याच्या साधेपणामुळें, त्याच्या खोल धार्मिक वृत्तीमुळें त्याला एक प्रकारचें शहाणपण प्राप्त झालें होतें आणि त्या शहाणपणानें त्यानें आम्हांला एकदां लाजवलें.

आम्ही वल्हवतांना मध्येंच एकमेकांना म्हणालों, "वल्हवतांना किती मजा येते नाहीं ?"

तेव्हां तो म्हणाला, "मजा म्हणूं नका, साहेब. आनंद म्हणा ! आनंद ! मजा ही तर छोटी चीज आहे. आनंद बडा आहे. वल्हवतांना आनंद होतो, साहेब."

त्याचें तें बोलणें ऐकून आम्ही शरमलों आणि तो स्वतांवर खूष होऊन खदखदां हसत होता. ज्याला मीं अजाण म्हटलें तो आमच्याहून सुजाण ठरला होता !

नंतर तो म्हणाला, "साहेब, सकाळीं ब्रेकफास्ट घेऊन बाहेर पडलेल्या लोकांना वल्हवण्यांत आनंद वाटत असेल. पण लोटाभर कॉफी पिऊन बाहेर

पडलें कीं त्यांत कांहींच आनंद वाटत नाहीं. नुसती मेहनत वाटते ती. रिकाम्या पोटीं मेहनत. ”

जोना किती तरी विषयांवर मोकळेपणानें बोलत होता. सिनेमावर त्याचा मोटा राग होता. सिनेमा पाहून पोरें कशीं बिघडतात तें त्यानें सांगितलें. थोरामोठ्यांच्या पोरी सिनेमा पाहून मग ड्रायव्हरशीं कसा संबंध ठेवतात त्याचीं उदाहरणें त्यानें दिलीं. हीं उदाहरणें देतांना तो बुड्ढा मनुष्य अश्लील बोलला आणि चेकाळून हसला. मोकळेपणानें हसला. कृत्रिम सभ्यतेचा स्पर्श त्याच्या मनाला झाला नव्हता आणि त्यामुळें त्याचें तें चावट बोलणें पुष्कळशा लोकांच्या सभ्य बोलण्या-पेक्षां मला अधिक निर्मल वाटलें.

तास केव्हां संपला तें आम्हांला कळलेंच नाहीं. आम्हीं होडी कडेला आणली आणि उतरलों. मला शंका येत होती कीं, आमच्याकडून भक्कम बक्षिसी उकळण्याच्या उद्देशानें हा जोना आपल्या दारिद्र्याचें अतिशयोक्तिपूर्ण वर्णन करीत आहे. पण खालीं उतरल्यावर त्या शंकेचें निरसन झालें.

पैशाचें पाकीट उघडून पैसे काढीत असतां आपल्या त्या निरागस, करुण नजरेनें जोना आमच्याकडे पहात होता. आणि आम्हीं त्याला पैसे दिले तेव्हां त्यानें ते मोठ्या काळजीपूर्वक आपल्या खिशात ठेवले. मीं हें पुष्कळदां पाहिलें आहे कीं, श्रीमंत लोक बेफिकिरीनें पैसे हाताळीत असतात. पण गरीब लोक एकेका नाण्याला आंजारून गोंजारून खिशांत ठेवतात. आपल्या हातांत पैसे आले ह्याचें त्यांना आश्चर्य वाटत असतें.

आम्हीं त्याला विचारलें, “ तुला बक्षीस किती द्यायचें रे ? अं ? ”

“ काय वाटेल तें द्या, साहेब ! खुषीनें द्या ! ” तो निर्लोभीपणें म्हणाला.

आम्हीं त्याला जरा जास्तच बक्षिसी दिली आणि आदबशीरपणें सलाम करून होडी वल्हवीत तो निघून गेला. पण त्याची ती निरागस करुण मूर्ति मात्र माझ्या मनांत कायमची कोरली गेली आहे.

आधींच त्या थंड हवेंत भूक चांगली कडकडून लागायची आणि त्यांत आम्हीं तासभर वल्हविण्याची मेहनत केली होती. त्यामुळें आम्हांला नुसती ‘ खा खा ’ सुटली. पुन्हा आम्हीं स्टेशनवरच्या हॉटेलकडे मोर्चा वळवला. वाटेंत आम्हीं हॉटेलांतून मोटार स्टॅंडवर सामान नेण्याकरितां टॅक्सी सांगून ठेवली. कारण दुपारच्या बसनें आम्ही कोइमतूरला जाणार होतों. आणि कोइम-तूरहून तडक कोचीन !

पोटांत भुकेचा कडाका झाला असल्याकारणानें कीं काय कोण जाणे, आम्हांला जेवण फार चविष्ट लागलें. हॉटेलवाल्यानें चिकार चबचबीत मटन दिलें होतें. त्यावर आम्हीं आडवा हात मारला. आणि तोंडाला फुरसत मिळाली, तेव्हां मोठ्या हाडाला चिकटलेलें थोडेंसें मटन पुढें ठेवणाऱ्या आणि मोठ्या बिलाबरोबर छोटीशी बक्षिशी द्यायला भाग पाडणाऱ्या मुंबईच्या हॉटेलवाल्यांना शिव्या देत होतों. मुख्य जेवणावर असा आडवा हात मारल्यावर आम्हीं मिष्ट पुडिंगवर हलका हात चालवला. पुडिंग तर तोंडांत नुसतें विरघळत होतेंच, पण त्यांत असलेले ओले जरदाळूसुद्धां जेव्हां जिभेवर मधाच्या पेंव्यासारखे विरले, तेव्हां टिपची रक्कम खाडदिशीं वर गेली.

भरभक्कम जेवणावर पुडिंगचा जो नाजुक गिलावा झाला होता, त्याची उगीच चाळवाचाळव होऊं नये म्हणून आम्ही टॅक्सी करून हॉटेलवर गेलों. टॅक्सीवाल्याला पैसे देण्याची वेळ आली तेव्हां तो म्हणाला, " साहेब ! इथें येण्याचे आणि परत जाण्याचेदेखील पैसे द्या ! "

" आं ? "

" उटकमंडला असाच कायदा आहे, साहेब. रिकाम्या फेरीचेदेखील पैसे द्यावे लागतात. "

" वा रे तुझें उटकमंड !" असें म्हणून आम्हीं तावातावानें हॉटेलवाल्याकडे जाऊन या बाबतींत शहानिशा केली. आणि हॉटेलवाल्यानें जेव्हां टॅक्सीवाल्याच्या भूमिकेला दुजोरा दिला, तेव्हां मग मुकाट्यानें आम्हीं त्याला पैसे दिले.

मग दोन तास तेथल्या शांततेंत व थंडींत लोळल्यावर आणि संवयीमुळें अवघ्या पंधरा मिनिटांत सामानाची आवराआवर केल्यावर आम्हीं ठरविलेला टॅक्सीवाला आला आणि पुन्हा दुप्पट पैसे घेऊन आम्हांला बस स्टॅंडवर घेऊन गेला.

झक हजामत झाली ! आणि दहा आण्यांत आमचें सामान बस स्टॅंडवर आणायला कबूल झालेल्या हमालानें जेव्हां आम्हांला सलाम केला आणि बसवर सामान चढवून चार आणे घेतले, तेव्हां जखमेवर तुरटी चोळल्यासारखें वाटलें.

फर्स्ट क्लास एक्सप्रेस बसनें आम्हीं कोइमतूरला जाणार होतों खरे, पण ती बस येईपर्यंत आम्हांला एका भिकार स्टॅंडवर बराच वेळ ताटकळत उभें रहावें लागलें. मात्र अखेर जेव्हां ती बस आली तेव्हां त्या ताटकळण्याचें सार्थक

झाल्यासारखें वाटलें. प्रवासांत आम्ही बसमधून बऱ्याच ठिकाणीं गेलों, पण इतक्या सुंदर बसमध्यें आम्ही कधींच बसलों नाहीं. बस चांगली भारदस्त व प्रशस्त होती. बाहेरून तिला छान रंग काढलेला होता आणि आंत चकचकीत पॉलिश होतें. ती चालत असतांना इंजिनाचा धडधडाट होत नव्हता अगर ढिल्या झालेल्या बॉडीचा खडखडाट होत नव्हता. बसमध्यें बसल्यावर गदगदां हलायला होत नव्हतें. उलट तेथल्या चामड्याच्या सीट्स् प्रवाशाचें शरीर अलगद स्वतःच्या पाठीवर तरंगत ठेवीत होत्या. ब्रेक लावला कीं उतारूला पुढें फेकणाऱ्या आणि ॲक्सिलरेटर दाबला म्हणजे मागें झांपविणाऱ्या अनेक गाड्यांत मीं बसलेला आहें. पण तसलें ह्या गाडींत कांहींच होत नव्हतें. 'No Smoking' अशी दुष्ट पाटी त्या बसमध्यें मुळींच नव्हती. उलट हाताशेजारींच चमकणारे छोटे ॲश ट्रे असें सुचवीत होते कीं, सिगारेट काढा, धूर हवेंत सोडा आणि राख नाजुकपणें आमच्या तोंडांत झाडा. आणखी एक विशेष म्हणजे मोटारचें कर्कश शिंग नव्हतें. हातानें दाबायचा रबरी फुगाच तेथें होता. त्यामुळें रस्त्यावरच्याच नव्हे तर बसमधल्या लोकांनादेखील आपल्या जीवावर संकट आलेंय् असें वाटत नव्हतें. मोटारींतल्या सुखसोयींची परमावधि म्हणजे तिच्यांत रेडिओ होता. तो रेडिओ लावायची नको तेव्हां ड्रायव्हरला इच्छा झाल्यामुळें, त्याच्यावर ऐकूं येणाऱ्या संगीताचें आम्हांला शांतपणें रसग्रहण करतां आलें नाहीं. तरी पण आंतील रेडिओमुळें त्या एक्सप्रेस गाडीविषयीं आमचें मत अधिकच चांगलें झालें.

गाडीचा ड्रायव्हर चांगला तरणाताठा, उंचापुरा होता. माझ्या प्रवासांत दक्षिणेंत जीं थोडीं रुबाबदार माणसें मीं पाहिलीं त्यांत ह्याचा समावेश करावा लागेल. त्यानें खाकी कपडे घातले होते. पण त्याची ऐट अशी होती कीं, तो जणुं विमान दलांतला गणवेश चढवलेला वैमानिक होता. आपल्या मोटरविषयीं त्याला विलक्षण प्रेम वाटत होतें आणि तिची तो फारच काळजी घेत होता.

त्या मोटारचा ड्रायव्हर नुसताच ऐटबाज नव्हता तर अतिशय कुशलदेखील होता. नीलगिरीच्या पलीकडच्या बाजूचा उतार तितका सोपा नाहीं. वेडीं-वांकडीं अंगें वाकविणाऱ्या रस्त्यानें एकदम सरळ खालीं उतरावें लागतें. आणि जसें जसें खालीं जावें तसतसें डोंगराचे निमुळते कडे आपल्या छातीवर उभे आहेत असें वाटूं लागतें. त्या कड्यावरून आपली मोटार खालीं कशी उतरली ह्याचें सभय आश्चर्य वाटतें. वळणें तर त्या रस्त्यावर अनेक आहेत. कांहीं

घोड्याच्या नालाच्या आकाराचीं, तर कांहीं इंग्रजी S च्या आकाराचीं आहेत. कांहीं गिरमिटाच्या आट्यासारखीं मुरडलेलीं आहेत, तर कांहींना 'Hair pin bends' असें मुळीं पास्यांवरून नांवच दिलेलें आहे. एकामागून एक उलटीं-सुलटीं अशीं हीं वळणें येत असतात. मध्येंच वळणाआडून येणाऱ्या मोटारी खुद्द वळणावर अपघाताच्या तयारीनें आमच्या मोटारीला भेटत होत्या आणि एकदम कर्कशपणें ब्रेक लावून थबकत होत्या. त्या मोटारी तशा येऊन उभ्या राहिल्या म्हणजे उतारूंच्या तोंडांतून भीतीचे उद्गार निघत होते. पण ह्या सगळ्या भानगडींत आमच्या ड्रायव्हरची जरासुद्धां धांदल उडत नव्हती. मोटारीवर ताबा ठेवायला त्याला कष्ट पडत आहेत असें एकदांसुद्धां वाटत नव्हतें. अगदीं शांतपणें आणि कमींत कमी हालचाली करून तो आपलें काम करीत होता. अतिशय सफाईनें वळणें घेत होता. 'As cool as a cucumber' असें जें इंग्रजींत वर्णन करतात तें त्याला बरोबर लागू पडण्यासारखें होतें.

स्वतःचें मामुली स्वरूपाचें कामच व्यवस्थितपणें करण्यांत तो आनंद मानीत होता. स्वतःची अशी एक खाजगी शिस्त तो काटेकोरपणें पाळत होता. आणि म्हणून त्याच्या जीवनाला आपल्या परीनें पूर्णता आली असावी. समाधान त्याला गवसलें असावें.

नीलगिरी उतरेपर्यंत, तेथल्या निसर्गशोभेनें आम्हांला सोबत केली. वाटेंत दगडांच्या राशींतून एखादा झरा झुळझुळत होता. एखादा कडा कोसळत होता. एखादी दरी वनश्रीनें नटली होती. वाटेंत आम्हांला वेलिंग्टन मिलिटरी बॅरॅक्स दिसल्या. हें लष्करी शिक्षणाचें मोठें केंद्र आहे म्हणे! वनश्रीनें वेढलेलें तें ठिकाण इतकें छान व टुमदार होतें कीं, ताबडतोब सैन्यांत दाखल व्हावेंसें वाटलें. जन्मभर थंड हवेच्या ठिकाणीं रहायचें असेल तर हिंदी सैन्यांत जावें. कारण बहुतेक थंड हवेच्या ठिकाणीं त्यांच्या छावण्या आहेत. बॅरॅक्स पाहून मला व प्रधानला आम्हीं यू. टी. सीं.त काढलेल्या दिवसांची आठवण झाली. मीं यू. टी. सीं.त दोनच वर्षें काढलीं. प्रधाननें सहा वर्षें काढलीं होतीं आणि तो सी. एस्. एम्. झाला होता. मीं त्याला म्हटलें, "कँपांत असतांना मुलें खूप आरडाओरड, दंगल आणि मजा करतात खरीं, पण त्यांना खरोखरच एकाकी वाटत असतें. निदान माझा तरी तसा अनुभव आहे."

तो म्हणाला, "माझाहि तसाच अनुभव आहे. फर्स्ट इयरचीं कांहीं कोंवळीं मुलें तर कँपांत रडायचीं. आणि तुला माहीत आहे का? Soldiers' songs

are always sad. त्यांतल्या frivolity च्या खालीं कसली तरी ओढ दडलेली असते."

तो गुणगुणूं लागला, "Sergeant be a mother to me..." अशीं किती तरी गाणीं त्यानें मला सांगितलीं. आणि सैनिकाच्या हृदयाच्या बऱ्याच व्यथा मला त्यांतून समजल्या.

वेलिंग्टन् बॅरॅक्सनंतर आम्हांला कुन्नूर लागलें. तेंहि मोठें छान गांव आहे. कांहीं लोक म्हणतात कीं, उटीपेक्षां तेथली हवा अधिक चांगली आहे. कारण तेथें कडक थंडी पडत नाहीं. तेथें चहाच्या बागा बऱ्याच दिसल्या.

जसजसे आम्ही खालीं उतरत होतों, तसतसा नीलगिरींतला गारवा मागें रहात होता. आणि नीलगिरीचीं दूर जाणारीं शिखरें आपल्या नीलिम्यांत गुरफटून परकेपणानें आमच्याकडे बघत होतीं. अखेर आम्ही खालीं मैदानांत आलों. आणि पोफळींची एक मोठी बाग एकदम नजरेस पडली. दुरून पोफळींचीं खोडें छोट्या उंच काड्यांसारखीं दिसत होतीं. आणि चालत्या मोटारींतून पाहिल्यावर असें वाटत होतें कीं, अनेक काड्या एका तबकडीवर उभ्या करून कोणी तरी ती फिरवीत आहे. त्या फिरत्या बागेंत अडकलेले सूर्यकिरणांचे कवडसेदेखील एकदम डोळ्यांपुढें चमकून दिसेनासे होत होते आणि छोट्या विजा लुकलुकल्यासारखें वाटत होतें.

घामाच्या चिकचिकीनें अस्वस्थ व्हायला होत होतें आणि कोइमतूरला गाडीच्या वेळेवर पोहोंचायला उशीर होत आहे ह्या कल्पनेनें चिडायला होत होतें. उटकमंडच्या स्टेशनमास्तरनें पंधरा मिनिटें टाइमटेबलाचीं पानें उलटून आमची मोटार कोइमतूरला पोहोंचण्याच्या वेळेलाच तेथून कोचीनला जाणारी गाडी सुटते असें आम्हांला सांगितलें होतें आणि ती गाडी पकडायला आम्ही उत्सुक होतों.

कोइमतूरच्या आधीं आमची मोटार मेट्टुपालयमूला थांबली. हें गांव मोठें आहे. त्याचें नांव अर्थात् अधिकच मोठें आहे आणि तेथले लोक त्याचा 'मेटयापॉलयम्' असा उच्चार करतात. मला पहिल्यांदां तें बट्ट्याबोळम् असें ऐकूं आलें आणि बट्ट्याबोळ हा शब्द द्राविड आहे असा मीं निष्कर्ष काढला ! त्या गांवांतले लोक आणि तेथलीं एकंदर झाडेंझुडपें पाहून विषुववृत्ताजवळच्या उष्ण प्रदेशांत आपण आलों आहोंत असें वाटत होतें. लोकांच्या अंगावर कमींत कमी कपडे होते. चोळ्या न घालणाऱ्या बायका आम्हीं ह्या प्रवासांत

येथेंच प्रथम पाहिल्या. मागें त्रावणकोरमधल्या बायकांनीं चोळया घालण्याची सुधारणा केल्याबद्दल त्यांचा तेथील सनातन्यांनीं निषेध केल्याचा वृत्तांत मीं वृत्तपत्रांत वाचला होता. चोळया वापरायची जेथें पद्धत नसेल तेथें चोळया घालणें हें छचोरपणाचें आहे असें वाटणें अगदीं शक्य आहे.

मोटारींतली कुठची तरी डायल काम करीत नव्हती म्हणा अगर रेडिओ बिघडला होता म्हणा, पण त्याकरितां ड्रायव्हरनें मेट्टुपालयमला बराच वेळ काढला. त्याचें आपल्या मोटारवरचें प्रेम आम्हांला त्रासदायक ठरत होतें. माझें लक्ष अर्थात् माझ्या घड्याळाच्या डायलकडे होतें. उशीर झाल्याबद्दल मी जळफळत होतों आणि तें जळफळणें ड्रायव्हरलादेखील मीं ऐकवलेंच. ड्रायव्हरनें मोटार सुरू केली, पण तेवढ्यांत रस्त्यावरचें रेल्वेचें फाटक बंद झालें आणि तें चांगलें पंधरावीस मिनिटें उघडलें नाहीं. ड्रायव्हर शांतपणें खालीं उतरला व त्यानें रेडिओ लावला. मीं मनांतल्याँ मनांत त्याच्या नांवानें ठणाणा करीत होतोंच.

फाटक उघडलें, पण पुढें रस्तादुरुस्ती चालली होती. अखेर गाडी सुटायला एकदोन मिनिटें असतांना आम्ही कोइमतूर स्टेशनवर पोहोंचलों.

कोइमतूर म्हणजे कापडाच्या गिरण्या, गिरण्या आणि गिरण्या ! तें कोइमतूर बघण्याची आम्हां मुंबईकरांना आवश्यकता नव्हती. शहरांतून स्टेशनकडे मोटार जात असतां त्याच्याविषयीं माझ्या मनांत एकच परिणाम झाला—तें एक अगदीं कोरें करकरीत शहर होतें. माझी ती कल्पना बरोबर होती असें तेथल्या एका माणसानें सांगितलें. गेल्या तीसएक वर्षांतच त्या शहराची वाढ झालेली आहे. नवीन आणि वेगानें वाढणाऱ्या शहरांचे जे प्रश्न असतात ते तेथेंहि होते. तेथें पाण्याचा फारच तुटवडा होता. गटारांची सोय नव्हती आणि मला वाटतें कीं, विजेचा पुरवठादेखील तेथें पुरेसा नव्हता.

कोइमतूरविषयीं मला औत्सुक्य नव्हतें. मला गाडी पकडायची होती. मोटार स्टेशनवर थांबतांच मी उडी मारून स्टेशनांत पळालों आणि कोचीनला जाणाऱ्या गाडीची चौकशी केली.

तेथला कारकून शांतपणें म्हणाला, "आतां कोचीनला जाणारी गाडीच नाहीं. ती गाडी सकाळीं ४–२० ला आहे."

मी चीतच झालों. म्हणजे पंधरा मिनिटें टाइमटेबल चाळून आणि बोटें मोडून हिशोब करून उटकमंडच्या स्टेशनमास्तरनें जी माहिती आम्हांला दिली

होती ती चुकीचीच होती म्हणायची ! आतां कोइमतूरला आम्हांला रात्र काढावी लागणार होती आणि पहाटे साडेतीनला उठून स्टेशनवर यावें लागणार होतें.

मीं बावळटपणानें बराच वेळ त्या कारकुनाच्या तोंडाकडे पाहिलें आणि मग सामानाजवळ उभें राहून जागच्या जागीं लगबग करणाऱ्या प्रधानच्या डोक्यावर ह्या बातमीचें बादलीभर पाणी ओतून त्याला थंड केलें. त्यानंतर पुन्हा आम्ही बावळटपणें एकमेकांकडे पहात उभे राहिलों. पण तेवढ्यांत कलकलाट करणारे हमाल आमच्या सामानाची कुतरओढ करूं लागले. त्यामुळें आम्ही शुद्धीवर येऊन त्यांना हिंदींत, न समजणाऱ्या शिव्या देऊं लागलों. पण शिव्या देऊन कांहीं भागण्यासारखें नव्हतें. रात्र कुठें तरी काढायला हवी होती. तेव्हां एका हमालाला आमची गरज खाणाखुणांनीं सांगून आम्हीं त्याच्या डोक्यावर सामान दिलें आणि त्याच्या मागोमाग एका हॉटेलांत गेलों. हॉटेल कसलें तें, तो तुरुंगच होता. पण तें स्टेशनच्या जवळ असल्यामुळें आणि एकाच रात्रीचा प्रश्न असल्याकारणानें आम्हीं तेथें एक खोली घेतली आणि सकाळीं येऊन उठव असें हमालाला सांगून त्याला वाटेला लावलें.

हॉटेलच्या खोलींत आम्ही आणि आमचें सामान शिरल्यावर हालचाल करायला जागाच उरली नाहीं. आणि प्रधान जेव्हां शर्ट काढण्याकरितां हात वांकडेतिकडे करूं लागला तेव्हां सुरक्षिततेच्या दृष्टीनें खोलीबाहेरच जावें कीं काय असें मला वाटूं लागलें !

पाणी, संडास वगैरेची सोय काय, तें हॉटेलवाल्याला विचारायला गेलों तर त्या बेट्याला इंग्रजीच येत नव्हतें.

"मॅनेजर इंग्लिश—" (म्हणजे मॅनेजरला इंग्लिश येतें) असें तो म्हणाला. म्हणून मॅनेजर येईपर्यंत आम्हीं वाट पाहिली. पण तो आल्यावर असें आढळून आलें कीं, आपण खोलीचे किती रुपये घेतों तें सांगण्याइतकेंच त्याचें इंग्लिशचें सोयिस्कर ज्ञान होतें.

अखेर आम्हीं पाणी मिळवलें. 'उघडा संडास' ही काय चीज असते तें पाहून डोळे मिटले. आणि अखेर शिव्या हांसडीत स्टेशनवर गेलों. तेथल्या वेटिंग रूममध्यें आरामशीरपणें बसायचें आणि तेथेंच जेवून बाहेर पडायचें असा आमचा विचार होता. कोइमतूरचें स्टेशन, त्या शहरासारखेंच कोरें करकरीत व सुसज्ज आहे. त्यामुळें तेथें आरामशीरपणें बसण्याचा बेत झक-पैकीं पार पडला. बूट काढून, बुशशर्टचीं बटनें काढून आणि 'तो पूर्णपणें

काढून टाकण्यास काय हरकत आहे ?' असा प्रश्न स्वतःला विचारीत आम्ही तेथें बराच वेळ बसलों. तंगड्या ताणून, पायांचे अंगठे हलवत. आम्ही एकमेकांशीं बोलत नव्हतों. कारण बोलून बरेंचसें संपलें होतें.

आपल्याच विचाराच्या तारेंत मी तेथें बसलों होतों. मी तसा तेथें कोइमतूरच्या वेटिंग रूममध्यें बुशशर्टचीं बटनें सोडून बसलों होतों ह्याचें मला आश्चर्य वाटत होतें. माझें नेहमींचें मुंबईचें जीवन मला परकें वाटत होतें. कोइमतूरला मीं असावें हें खरें वाटत नव्हतें. सगळाच परकेपणा झाला होता. 'आपलें' म्हणून कुठच्याहि गोष्टींना मीं चिकटतों का तें मला समजत नव्हतें. रोज नव्या हॉटेलमधली नवी खोली माझी होत होती. माझ्या मनांत असा चमत्कारिक विचार आला कीं, आपलें मुंबईचें सगळें जीवन विसरून जावें आणि येथें निराळ्याच नांवाखालीं निराळें जीवन कटावें. असेंच हरवून जावें आणि मग काय सांपडतें तें पहावें.

डोक्यांत असे विचित्र विचार घोळत होते, पण आपण प्रवासाला निघालों आहोंत, अमकीं कामें आपल्याला उरकायचीं आहेत, अमक्या अमक्या ठिकाणीं आपल्याला जायचें आहे, ह्या कल्पनेनें माझ्या सगळ्या हालचाली चालल्या होत्या.

स्टेशनवर पाण्याची सोय नाहीं म्हणून मीं तक्रार ( प्रधानजवळच ) केली. मग फारशी भूक नसल्यामुळें स्टेशनवरच्या खाणावळींत जेवलों. जेवायला सुरुवात करण्यापूर्वीच भात संपला. Wheat rice चा लगदा पानांत तसाच राहिला. पापड जरासा कुरतडला, आणि सांबार घेण्याचा आग्रह सहन केला.

मग पानपट्टीच्या शोधार्थ हिंडलों. आपण महाराष्ट्रांत खातों अगर वर उत्तरेंत खातात तशी पानपट्टी दक्षिणेंत मिळत नाहीं. पान मागितलें म्हणजे तेथें चुना फासटून पानें देतात आणि ती पुडींतली मसालेदार सुपारी देतात. ह्यामुळें दक्षिणेंत पान कधींच जमलें नाहीं. आम्हांला कशा प्रकारचें पान हवें तें समजावून सांगतांना असंख्य घोटाळे झाले. आम्ही हिंदींत बोललों. तो मल्याळींत बोलला. आम्हीं त्याला पैसे दिले. त्यानें आम्हांला पानें दिलीं. आम्हीं पानें परत केलीं. त्यानें पैसे परत केले. आम्हीं पैसे पुन्हा त्याच्यापुढें ठेवले. त्यानें आश्चर्यानें आमच्याकडे पाहिलें. आम्हीं त्याला खुणा केल्या. त्यानें आम्हांला खुणा केल्या. आम्हीं पुनः हिंदींत बोललों. तो पुन्हा आपल्या भाषेंत बोलला. अखेर कंटाळून ती मसालेदार सुपारी घेऊन आम्ही बेचवपणें चालायला लागलों.

दक्षिणेंत पुष्कळ लोकांना इंग्लिश येतें व त्यामुळें भाषेची अडचण पडत नाहीं असें आम्हांला लोकांनीं सांगितलें होतें. मद्रास-बंगलोरसारखीं शहरें सोडल्यास तें एक थादांत असत्य आहे असें मला दिसून आलें. त्यांतल्या त्यांत ह्या मल्याळी लोकांना तर परभाषेचें अगदींच वावडें आहे.

आम्ही हॉटेलांत परतलों. आपण खोलींत मावतों ह्याबद्दल आश्चर्य व्यक्त केलें आणि आतां झोप कशी येणार त्याबद्दल आश्चर्य करीत झोपीं गेलों.

## :१२: परशुरामाची भूमि

पहाटे साडेतीनलाच येऊन हमालानें उठवलें. सगळें अंग कसें आंबून गेलें होतें आणि कणीक तिंबतात तसें आपलें अंग कोणी तरी तिंबावें अशी फार इच्छा होत होती.

झोपेनें झिंगतच आम्ही स्टेशनवर गेलों आणि पाळीपाळीनें वेटिंगरूममध्यें जाऊन प्रातर्विधी आटपले. मीं तेथें आरशांत पाहिलें तेव्हां पिंजारलेले केस, वाढलेली दाढी व घामानें आलेला तेलकटपणा ह्यांमुळें आधींच सुस्वरूप असलेला मी मद्राशासारखा दिसलों. साबण व फणी ह्यांचा उपयोग करून पुन्हा माणसासारखें दिसण्याचा प्रयत्न केला. परत आलों तेव्हां कळलें कीं, मी गेल्यावर प्रधाननें एक सुंदर आपटी खाल्ली होती. एका बॅगवर अर्धवट आधारून ठेवलेल्या वरच्या बॅगेवर त्यानें बसण्याचा प्रयत्न केला. तत्क्षणींच प्रधानचा पृष्ठभाग स्टेशनच्या गुळगुळीत फरशीवर आदळला. त्याचे पाय हवेंत गेले. बॅग डोक्यावर आदळली. त्याची ती अमेरिकन सिनेमांतल्या चोरांच्या हॅटसारखी फेल्ट हॅट बहुधा त्याच्या डोळ्यांवर घसरली असावी आणि कांहीं वेळ तरी त्याला आपले पाय कुठचे व डोकें कुठचें हें समजेनासें झालें असावें. आपल्या शरीराची गुंतागुंत सोडवणें अवघड गेलें असावें. पण प्रधाननें अधिक माहिती सांगण्याचें नाकारल्यामुळें ह्याबाबत अधिकृतपणें असें कांहींच म्हणतां येत नाहीं.

दोन तरुण मुलींनीं म्हणे तें दृश्य पाहिलें. मी तें पहायला तेथें नव्हतों ह्याची फार चुटपुट लागून राहिली.

आमची गाडी ४–२० ला सुटायची होती खरी, पण ती सुटली साडेपांचच्या पुढें ! झोंपेपरी झोंप बुडाली आणि शिवाय स्टेशनवर ताटकळत थांबावें लागलें. प्रधानप्रमाणें पडण्याचा स्टेशनवरच्या सगळ्या लोकांनीं सुज्ञपणा दाखविला असता तर सगळ्यांचाच वेळ मजेंत गेला असता. पण आम्ही सगळेच आंबट तोंडानें गाडीची वाट पहात होतों.

सगळें कसें धीमेपणानें चाललें होतें. ज्या प्लॅटफॉर्मवर आमची गाडी यायची होती, तेथें येऊन एक ऐसपैस मालगाडी ऐसपैसपणें उभी होती. पोर्टर पेंगुळले होते आणि रेल्वेचे पांढऱ्या पोशाखांतले अधिकारी क्वचित् इकडून तिकडे जात

होते. लगबग होत होती ती आमच्याच जिवाची.

ह्या गाडींतून आम्ही पोदेनूरला जाणार होतों. मग आमचे डबे मद्रासहून येणाऱ्या कोचीन एक्स्प्रेसला जोडले जाणार होते आणि नंतर आमचा कोचीनचा प्रवास सुरू होणार होता.

मीं न राहवल्यामुळें एका सहप्रवाशाजवळ अशी चिंता व्यक्त केली कीं, असा उशीर झाल्यास आमची ती कोचीनकडे जाणारी गाडी चुकेल.

तो म्हणाला, "Don't worry. ती नेहमींच दोन तीन तास लेट असते."

हें सगळेंच मला सोयिस्कर व आरामशीर वाटलें. घाई करणें अगर काळजी करणें हें किती मूर्खपणाचें आहे तें पटलें. आपला देश फार मोठा आहे व काळ तर अनंत आहे ह्या तात्त्विक जाणिवेनेंच येथील रेल्वे कंपन्यांचा कारभार चाललेला होता. आम्हीं पहिल्यानें जी. आय्. पी. नें, मग एम्. एस्. एम्. नें व नंतर म्हैसूर स्टेट रेल्वेनें प्रवास केला होता. आतां साउथ इंडियन रेल्वेनें तो करीत होतों. आणि जसजसे आम्ही दक्षिणेकडे येत होतों तसतसा सुस्तपणा वाढत होता. पण सुखाची गोष्ट अशी कीं, इंटरचे डबे आरामशीर होते व त्यांत गर्दी मुळींच नव्हती.

यथावकाश आमची गाडी आली. सुस्कारा सोडून आम्ही आंत बसलों. नंतर अर्धा पाऊण तास स्टेशनवर वामकुक्षी करून, आमच्या गाडीनें मोठा आव आणून हालचाल केली. आम्हीं पुन्हां एकदां समाधानाचा सुस्कारा सोडला आणि तेवढ्यांत गाडीदेखील सुस्कारा सोडून थांबली.

"अँ ?" आम्हीं म्हटलें.

आमचे सहप्रवासी म्हणाले, "पोदेनूर आलें."

"अँ ?" आम्ही डोळे विस्फारून ओरडलों.

"अवघा दहा मिनिटांचा रस्ता आहे." असें स्पष्टीकरण करण्यांत आलें.

आणि मग साडेसात वाजेपर्यंत साइडिंगला पडलेली आमची गाडी झोपीं गेली व कांहीं सहप्रवाशांनींदेखील तोच मार्ग अनुसरला.

मग आम्हांला कळलें कीं, कोईमतूरहून पोदेनूरला इतर वाहनेंदेखील जातात व सकाळीं आरामशीरपणें उठूनदेखील आम्हांला पोदेनूरला येतां आलें असतें. पण असें कळल्यामुळें माझा राग वाढला नाहीं. छे! छे! माझा राग केव्हांच नाहींसा झाला होता. दहा मिनिटांच्या प्रवासाकरितां तीन तास खर्च झाले म्हणजे राग वगैरे शिल्लक राहूंच शकत नाहीं !

शेवटीं यथावकाश आमचे डबे पोदेनूरच्या प्लॅटफॉर्मवर आणण्यांत आले आणि मग आम्हीं सावकाशपणें न्याहारी केल्यावरच आमची गाडी सुटली. तेवढ्यांत स्टेशनवरच्या पाट्या वाचून आम्हांला कळलें कीं, पोदेनूर हें मोठें जंक्शन आहे व तेथून दक्षिणेंतल्या अनेक ठिकाणीं जातां येतें.

न्याहारी केल्यावर आमच्या अंगांत थोडासा तकवा आला. सपाट मैदानांतूनच आमची गाडी चालली होती. आणि इतका प्रवास केल्यानंतर गाडीच्या खिडकीबाहेर बघण्याची आमची हौस जरा मावळली होती. त्यामुळें गाडींतल्या एका सहप्रवाशाबरोबर आम्हीं गप्पा मारल्या.

आमच्याबरोबर गप्पा मारणाऱ्या ह्या गृहस्थाचें नांव वर्मा. वर्मा हें आडनांव मात्र नव्हे. मेनन हेंदेखील आडनांव नव्हे. इथल्या लोकांना आडनावच नसतें. श्री. वर्मा हे चांगले उंचेपुरे व भरल्या अंगाचे गृहस्थ होते. त्यांचा चेहरा मला बंगाली वळणाचा, चांगला गुलगुलीत वाटला. तो पाहून सैगलची आठवण येत होती. आणि त्यांचे केस तर हुबेहूब सैगलसारखेच होते. त्यांची रीतभात चांगली खानदानी व पाश्चात्य संस्कार झालेली होती. त्यांचा पोषाख मलबारी पद्धतीचा होता. शुभ्र धोतर त्यांनीं लुंगीसारखें गुंडाळलेलें होतें. वर शुभ्र शर्ट होता आणि खांद्यावर, मला वाटतें, उपरण्यासारखें वस्त्र होतें. मलबारांत हिंदु, मुसलमान व ख्रिश्चन हे सगळेच असला पोषाख करतात. त्यामुळें पोषाखावरून तेथें माणसाचा धर्म ओळखतां येत नाहीं. त्या बाजूचें हें वैशिष्ट्य मला फारच आवडलें. तिकडच्या त्या पोषाखांतदेखील वर्मा मोठे रुबाबदार दिसत होते. आपण चार्टर्ड अकाउंटंट असल्याचें त्यांनीं सांगितलें. तेथल्या एका कॉमर्स कॉलेजांत ते कांहीं लेक्चर्स देतात असें कळल्यावर आम्हांला समानधर्मा भेटल्याचा आनंद झाला. पण डब्यांतल्या आणखी तीन माणसांनीं आपणहि प्रोफेसर असल्याचें जेव्हां सांगितलें तेव्हां आम्ही चकितच झालों. मलबारांत प्रोफेसरच पिकतात कीं काय अशी आम्हांला शंका येऊं लागली, पण त्या इतर प्रोफेसरांची विद्वत्ता पाहून ते पिकलेले नसून अर्धकच्चेच आहेत असें आमच्या ध्यानांत आलें.

श्री. वर्माच्या बाबतींत मात्र अशी गोष्ट नव्हती. अकाउंटंट असूनदेखील त्यांना चौफेर माहिती होती आणि आंकडेमोड करूनदेखील त्यांच्या रसिकतेचा खुर्दा झालेला नव्हता. त्यांच्याकडून आम्हीं बरीच माहिती गोळा केली. ते म्हणाले कीं, मलबार परशुरामानें समुद्रांतून वर काढला व ब्राह्मणांना दिला. बॅक

वॉटर्सच्या रूपानें समुद्र मलबारांत आहे आणि मलबार समुद्रांत आहे. ह्या भूमींत पहिल्यानें प्रवेश करून परशुरामानें येथें ब्राह्मणांची वसाहत वसवली असावी. अरुंद खडकाळ कोकणपट्टीचाच हा पुढचा भाग. पण ही किनारपट्टी चांगली रुंद, सपाट आणि सुपीक आहे. मलबारांत आठ महिने पाऊस पडतो. त्यामुळें हिंदुस्थानांत इतरत्र जसा मैल न् मैल पसरलेला रुक्षपणा दिसतो तसा येथें दिसत नाहीं. येथें हिरवळ डोळ्यांना तोषवते. नारळीपोफळींच्या बागांची येथें दाटी आहे. शिवाय तांदूळ पिकतो. शेतांतून येथें दोन पिकें काढतात. इथले लोक चांगले मेहनती आहेत. ते आपलीं शेतें पुन्हा पुन्हा नांगरतात, पिकांची जपणूक करतात.

आम्हीं म्हटलें, " मग इथले लोक चांगले सधन असतील तर ? " वर्मा म्हणाले, " इथल्या लोकांनीं तुम्ही म्हणतां तसें सधन असायला पाहिजे होतें. पण खरोखर मात्र ते फार दरिद्री आहेत. कष्ट करूनदेखील ते दरिद्रीच आहेत. "

आम्हीं विचारलें, " कां बरें ? "

ते म्हणाले, " लोकसंख्या ! ह्या मलबारांत फार लोक आहेत. लोकसंख्येची बेसुमार वाढ झालेली आहे. दर चौरस मैलाला येथें दोन हजार माणसें रहातात ! "

" दोन हजार ? शक्य नाहीं. " मीं अविश्वासानें म्हटलें.

" पहाल तुम्ही आतां. हिंदुस्थानांत इतरत्र मैल न् मैल गेलें तरी लोकवस्ती लागत नाहीं. पण येथें मात्र घराला लागून घरें आहेत. गांवाला लागून गांवें आहेत—नव्हे, एक गांव कुठें संपलें आणि दुसरें कुठें सुरू होतें तेंच समजत नाहीं. इतकीं माणसें असल्यामुळें प्रत्येकाच्या वांटणीला फार थोडी जमीन येते आणि अर्थातच फार मोठें दारिद्र्य येतें ! "

जेथें सह्याद्रीच्या अंगांत एक मोठी फट पडली आहे त्या पालघाटाजवळ आमची गाडी आली होती आणि त्या पालघाटाच्या फटींतूनच ती मलबारांत प्रवेश करणार होती. आम्हीं भूगोलांत ज्या फटीविषयीं वाचलें होतें, त्या ह्या फटीकडे श्री. वर्मा ह्यांनीं आमचें लक्ष वेधलें. ह्या फटींतून पाऊस घुसतो आणि पलीकडचा भाग सुपीक करतो; असेंहि आम्हीं भूगोलांत वाचलें होतें. त्या वेळीं खरोखर मेघ तरंगत त्या फटींतून आमच्या दिशेनें येतांना आम्हीं पाहिलें. श्री. वर्मा यांनीं सांगितलें कीं, ऐन पावसाळ्यांत पालघाटांतून घुसणाऱ्या मेघांची शोभा मोठी मनोवेधक दिसते.

पालघाटांतून आमची गाडी पलीकडे गेली आणि मग खुद्द मलबारांत आम्हीं प्रवेश केला. तेथें श्री. वर्मांनीं जें सांगितलें होतें त्याचें प्रत्यंतर आलें. सर्वत्र आम्हांला हिरवळ दिसत होती. शेतांची नांगरणी चालली होती. डोंगरांच्या उतारांवरदेखील लोकांनीं शेतें केलीं होतीं आणि तेथें ते खपत होते. रेल्वे लाइनीच्या दुतर्फा घरांच्या रांगा होत्या. त्यांत कुठेंहि खंड पडत नव्हता. एक गांव संपला आणि दुसरा सुरू झाला असें कुठेंच वाटत नव्हतें. खरोखरच तेथें लोकवस्ती अतिशय दाट होती.

श्री. वर्मा ह्यांनीं आम्हांला मलबारांतील लोकांविषयीं आणखी पुष्कळ माहिती सांगितली. ह्या मलबारांतले लोक मल्याळी भाषा बोलतात. दक्षिणेंत तामिळ, तेलगु, कानडी व मल्याळी असे जे लोकांचे चार भाषिक विभाग आहेत, त्यांपैकीं तामिळ हा सर्वांत मोठा विभाग आणि मल्याळी हा सर्वांत लहान विभाग. मलबारांतच हे लोक मुख्यतः रहातात. ह्या मल्याळी लोकांतले बहुसंख्य लोक मुसलमान व खिश्चन झालेले आहेत आणि आतां तेथें हिंदु अल्पसंख्य आहेत. त्यांतल्या त्यांत उत्तर मलबारांत मुसलमान बहुसंख्य आहेत. दक्षिणेंत ख्रिश्चन लोकांची बहुसंख्या आहे. तीन धर्मांचे लोक ह्या मलबारांत नांदत असले तरी तेथें धार्मिक भेदभाव व द्वेषभाव नाहीं असें वर्मांचें म्हणणें पडलें. तेथल्या सर्व धर्मांच्या लोकांचा पोषाख व भाषा एकच असल्याचें आम्हीं प्रवासांत पाहिलेंच. पण खिलाफत चळवळींत मोपल्यांनीं हिंदूंवर अत्याचार केल्याचें मला आठवलें आणि हिंदू व ख्रिश्चन ह्यांच्यांत त्रावणकोर-मध्यें कुरबुर चालत असल्याचें मीं अलीकडेच वाचलें होतें.

मलबारांत मातृसत्ताक कुटुंबपद्धति अजून अस्तित्वांत आहे. ह्या मातृसत्ताक पद्धतींत स्त्री ही कुटुंबांतली मुख्य व्यक्ति असते. कुटुंबाच्या पिढीजाद इस्टेटीची मालकी तिच्याकडे असते. लग्न झालें म्हणजे नवरा तिच्याकडे रहायला येतो. प्रसंग पडल्यास ती नवऱ्याला हाकलून देऊं शकते. आणि तिच्या पश्चात् इस्टे-टीचा वारसा व कुटुंबाचें आधिपत्य तिच्या मुलग्यांकडे न जातां मुलींकडे जातें.

ह्या पद्धतीची आम्हांला गंमत वाटली. आम्हीं वर्मांना विचारलें, “ लग्न झाल्यावर तुम्ही बायकोकडे रहायला गेलांत म्हणतां ? ”

“ हो. ” ते म्हणाले.

“ मग तुमच्या सासूनें तुम्हांला छळलें वगैरे कीं नाहीं ? ” आम्हीं हसत हसत विचारलें. तेदेखील हसले.

नंतर मीं म्हटलें, "पण ही पद्धत इकडे मलबारांत कशी अस्तित्वांत आली ? इथें स्त्रीराज्यें वगैरे होतीं कीं काय ? अमेझॉन बायकांची हिंदी आवृत्ति येथें अस्तित्वांत होती कीं काय ?"

ते म्हणाले, "नाहीं. तसा कांहीं पुरावा असल्याचें मला माहीत नाहीं. पण मला वाटतें कीं, आईभोंवतीं कुटुंब वाढावें हें अगदीं नैसर्गिक आहे. निसर्गांत पाहिलें तर बाप हा पुष्कळदां उपरा असतो. समागमापुरता तो मादीजवळ येतो आणि मग चालता होतो. आपल्या लहानग्यांची काळजी घेणें व संगोपन घेणें ही जबाबदारी मादीवरच पडते. मनुष्याच्या बाबतींत असें झालें असेल कीं, मुलें मोठीं झाल्यावर आईपासून दूर न जातां आईलाच चिकटून राहिलीं असतील व त्यामुळें कुटुंब-संस्था निर्माण झाली असेल."

मीं म्हटलें, "ही उपपत्ति आतां पुष्कळ मानववंशशास्त्रज्ञ मान्य करीत नाहींत. शिवाय जनावरांतदेखील असें दिसून येतें कीं, नर व मादी हीं दोन्ही आपल्या लहानग्यांची काळजी घेतात. आणि मला तर असें वाटतें कीं, आधीं कळप आणि मग कुटुंब अशी मानवी समाजाची वाढ झाली असावी. आतां जनावरांचे कळप पाहिले तर त्यांत नरच प्रमुख असतो, तेव्हां माणसांच्या कळपांतदेखील असेंच असावें आणि ह्या कळपांतून मग कुटुंबें अस्तित्वांत आलीं असावीं. तेव्हां पितृसत्ताक पद्धति हीच अधिक नैसर्गिक आहे."

वर्मा म्हणाले, "हा मुद्दा मतभेदाचा आहे हें मला मान्य आहे. पण दुसरी एक गोष्ट तुम्ही ध्यानांत घ्या. राजकीय अस्वास्थ्याच्या काळांत एखाद्या मुलाचा बाप कोण हें निश्चितपणें सांगणें कठीण असतें. अनेक सैन्यें इकडून तिकडे जात असतात. लोकांची पळापळ चालू असते. अशा वेळीं एकाद्या स्त्रीशीं कोणाचा संबंध झाल्यामुळें तिला मूल झालें तें सांगतां येत नाहीं. पण मुलाची आई कोण ह्या बाबतींत मात्र शंका राहूंच शकत नाहीं. अशा स्थितींत पित्या-कडून वारसा ठरण्याऐवजीं तो मातेकडून ठरणें अधिकच सोयिस्कर नाहीं काय ?"

त्यांचा हा मुद्दा मला नवीन वाटला. पण तो तितका समाधानकारक नव्हता. कारण राजकीय अस्वास्थ्य हें कांहीं फक्त मलबारांतच होतें अशांतला भाग नाहीं. सर्व हिंदुस्थानभर तें होतें आणि आजहि जगाच्या पाठीवरील अनेक देशांत तें आहे. पण असें असूनहि सर्वत्र पितृसत्ताक पद्धतीच अस्तित्वांत आहे.

अखेर वर्मा म्हणाले, "आणि तसें पाहिलें तर स्त्री हीच कुटुंबांतली मध्यवर्ती व्यक्ति असते. संसार हा विशेष अर्थानें तिचा असतो."

श्री. वर्मा ह्यांनीं आम्हांला इतरहि गंमतीदार माहिती सांगितली. धार्मिक चालीरीतींविषयीं त्यांनीं बरेंच सांगितलें. त्यांतली एक गोष्ट गंमतीदार आहे. आपण कार्तिकेयाला ब्रह्मचारी समजतों. स्त्रिया त्याच्या दर्शनाला जात नाहींत. ह्याउलट गणपति हा आपल्या दृष्टीनें संसारी देव आहे. मलबारांत बरोबर ह्याच्या उलट समजूत आहे. तेथें कार्तिकेयाला सुब्रह्मण्यम् म्हणतात. तो ब्रह्मचारी आहे असें तेथें समजत नाहींत आणि बायका त्याचें दर्शन घेतात. उलट बिचाऱ्या गणेशावर मात्र येथें मलबारांत ब्रह्मचर्य लादण्यांत आलेलें आहे. आपल्या पुराणांतील कथांत निरनिराळ्या प्रदेशांत जर असा फरक पडत असेल तर त्याचा अभ्यास करून कांहीं महत्त्वाचे निष्कर्ष काढतां येतील असें मला वाटतें.

पुराणांतल्या अगस्त्याच्या कथेविषयीं श्री. वर्मा ह्यांनीं स्वतःचे विचार सांगितले. ते म्हणाले, "अगस्त्य अंगुष्ठमात्र होता असें वर्णन पुराणांत आहे. आर्य चांगले उंच व धिप्पाड होते; तेव्हां अगस्त्य हा द्राविड असावा. त्यानें उत्तरेंत जाऊन आर्यांच्या विद्येचा अभ्यास केला असावा आणि मग सह्याद्रीजवळ अडलेल्या आर्यांना त्यानें दक्षिणेचा रस्ता मोकळा करून दिला असावा."

अगस्त्य हा द्रविड होता ही कल्पना मात्र मला नवीन वाटली. आणि आपलीं पुराणें आपण एकदां पुन्हा संपूर्णपणें वाचलीं पाहिजेत असें तात्पुरतें तरी वाटूं लागलें !

आम्ही धरून अर्धा डझन प्रोफेसर सोडल्यास आमच्या डब्यांत आणखी दोन गुजराती होते. गुजराती म्हटल्यावर ते व्यापारी होते असें निराळें सांगायला नकोच ! हे गुजराती बेटे सगळीकडे असतात. सबंध प्रवासांत आम्हांला गुजराती मनुष्य कुठें ना कुठें दिसत होताच. ह्या गुजरात्यांच्याकडे वळून श्री. वर्मा हसून म्हणाले, " मलबार आम्हां मल्याळी लोकांचा असला, तरी येथला व्यापार जेथून होतो तें कोचीन गुजराती लोकांचें आहे."

गुजराती व्यापाऱ्यांनीं मान हलवली आणि ते आम्हांला म्हणाले, " तुम्हांला आपल्या प्रकारचें जेवण हवें असल्यास कोचीनला गुजराती लॉज आहे."

'आपल्या' ह्या शब्दानें मला गंमत वाटली. पण खालीं त्या दक्षिणेंत गुजराती आम्हांला आणि आम्ही गुजरात्यांना जवळचे वाटत होतों. कारण मुख्य म्हणजे आमच्या भाषा परस्परांना समजूं शकत होत्या. 'इल्ला'पेक्षां 'नथी' एकंदरींत बरें वाटत होतें.

वाटेंत त्रिचूरला वर्मा उतरून गेले. त्यांचें रुबाबदार व्यक्तिमत्त्व, चौरस ज्ञान आणि समतोल बुद्धि ह्यांमुळें त्यांची आमच्यावर चांगलीच छाप पडली होती. ते गेल्यावर गाडींतल्या एका गृहस्थानें सांगितलें कीं, वर्मा ह्यांचें कोचीनच्या राजघराण्याशीं नातें आहे. राजघराण्यांतील माणसें इतकीं शहाणीं असूं शकतात ह्याची मला कल्पना नव्हती.

अखेर एर्नाकुलम् आलें. एर्नाकुलम् ही कोचीन संस्थानची राजधानी. खुद्द कोचीन बंदर एर्नाकुलम्च्या जवळच आहे. भूमीच्या समुद्रांत गेलेल्या बाहूवर कोचीन आहे आणि अलीकडे एर्नाकुलम् आहे. रहाण्यास एर्नाकुलम् सोयीचें आहे. दुपार झाली होती. आम्ही विपुववृत्ताच्या बरेच जवळ आलों होतों. त्यामुळें चांगलेंच उकडत होतें आणि समुद्राच्या सान्निध्यामुळें सगळ्या अंगभर चिकचिक झाली होती. गाडींत वाऱ्यामुळें आम्हांला उष्णता विशेष जाणवत नव्हती. पण स्टेशनवर भर दुपारीं उतरल्यावर आम्ही शिजले जाऊं लागलों.

समुद्रकिनाऱ्यावर असलेल्या 'सी व्ह्यू' हॉटेलमध्यें उतरण्याची आम्हांला गाडींतल्या माणसांनीं शिफारस केली होती. तेथें म्हणे समुद्रावरचा वारा येतो आणि बंदराचें दृश्यहि तेथून फार सुरेख दिसतें. हें हॉटेल स्टेशनपासून चांगलें दोन अडीच मैल दूर आहे. तेथें जायला वाहन म्हणजे फक्त रिक्शा! रिक्शेवाल्यांची रांगच्या रांग तेथें उभी होती. त्यांचीं काळीं किडकिडीत शरीरें उन्हांत चकाकत होतीं. ओढलेल्या चेहेऱ्यांनीं ते आम्हांला बोलावीत होते. त्यांच्या सगळ्या वागण्यांत विलक्षण अजीजी होती. रिक्षावाले मीं इतरत्रहि पाहिले आहेत. पण ते इतके लाचार व गरजू दिसले नाहींत. त्यांच्या त्या रांगा पाहून मला वाटलें कीं, ह्या मलबारांत माणसाला मोल नाहीं.

त्यांच्या रिक्शांत न बसण्यांत कांहीं खास माणुसकी आहे असें मला तरी वाटलें नाहीं. उलट त्यामुळें ते उपाशी रहातील असें मला दिसत होतें. पण प्रधान मात्र माणसांनीं ओढलेल्या वाहनांत बसायला तयार होईना. टॅक्सी तेथें नव्हत्याच. तेव्हां आम्हीं एका रिक्षांत सामान टाकलें व त्याच्याबरोबर चालत निघालों. आमचें तें वागणें पाहून रिक्षावाल्यांनीं मात्र निष्कर्ष काढला कीं, हे साहेब लोक चिकट आहेत!

त्या कडक उन्हांतून दोन अडीच मैल दूर असलेल्या त्या सी व्ह्यू हॉटेलमध्यें पोहोंचेपर्यंत आमची हबेलंडी उडाली. आणि सी व्ह्यू हॉटेलमध्यें पाऊल टाकल्यावर आतां आपल्याला एक पाऊलहि टाकणें शक्य नाहीं असें आम्हांला

वाटत होतें. हॉटेल पाहून आम्ही खूष झालों. आतां आराम करायचा असे बेत रचूं लागलों. पण तेवढ्यांत आम्हांला मॅनेजरनें सांगितलें कीं, हॉटेलांत जागा नाहीं. आम्हांला धक्काच बसला. आणि मग उन्हांत शिजून निघत, भाषेच्या बाबतींत अडखळत व रिक्षाबरोबर रखडत दुसरें हॉटेल शोधण्यांत आम्हीं जो अर्धा तास घालवला तेवढा भयंकर अर्धा तास प्रवासांत केव्हांहि आमच्या वांट्यास आला नव्हता व पुढेंहि आला नाहीं. हॉटेलमध्यें जाऊन आम्ही कसेबसे अंघोळ करून जेवलों आणि अंथरुणांत पडलों. पण पंखा नीट चालत नसल्यामुळें आम्ही तेथेंहि पडल्या पडल्या तळमळत होतों. आमचे चेहरे काळवंडले होते. नाकें लाल झालीं होतीं. ऐट सगळी खलास झाली होती आणि वृत्ती अगदीं चुरगळून गेल्या होत्या.

संध्याकाळीं उन्ह उतरल्यानंतर आणि अंगांत कांहींसा तकवा आल्यावर आम्ही बाहेर पडलों. एर्नाकुलम् शहर छोटेंसें आणि मोठें टुमदार आहे. माडां-पोफळींच्या बागांतच हें नीटनेटकें शहर वसलेलें आहे. तेथें भोंवतालच्या बागांत विसांवलेलीं कौलारू घरें कशीं प्रसन्न वाटतात. हें मुख्यतः ख्रिश्चन लोकांचें शहर आहे. आणि त्या लोकांचा व्यवस्थितपणा, मार्दव व साधी सौंदर्यदृष्टि ह्यांचा प्रसन्न शिडकाव सर्वत्र आढळून येतो. हे लोक मोठ्यानें बोलत नाहींत. उगीच आवाज करीत नाहींत. ह्यांचे कपडे स्वच्छ असतात ह्यांच्या घरांचीं आवारें झाडलेलीं असतात. बाहेरूनदेखील त्यांच्या घरांतली सजावट व्यवस्थित असल्याचें दिसतें आणि खिडक्यांना लावलेले साधेच पडदे एक प्रकारच्या शालीनतेनें वाऱ्याबरोबर हलत असतात. येथले रस्ते बहुतेक तांबड्या मातीचेच आहेत. पण तेदेखील स्वच्छ आहेत आणि माड आपल्या परीनें त्यांच्यावर कातरलेल्या छायेची पखरण घालीत असतात. बॅक वॉटरचा एक पाट मध्येंच शहरांत घुसलेला आम्हांला दिसला, आणि त्यांत होड्या किनाऱ्याला बिलगून डुलत डुलत विसांवा घेत होत्या. मध्येंच एखादी किनाऱ्या पासून दूर होत होती आणि सुळकन् कुठें तरी जात होती. एकंदरींत हें गांव झोंपाळू. गडबड नाहीं, धांदल नाहीं. वाहनांचा खडखडाट येथें नाहीं. संथपणें वाऱ्याबरोबर डुलणाऱ्या माडांसारखें येथलें जीवन आहे. ह्या शहराला रेक्लमेशन-प्रमाणें बांधून काढलेला केवढा तरी विस्तीर्ण किनारा आहे. संध्याकाळचे लोक तेथें फिरायला येतात. तेथल्या कटड्याला रेलून पश्चिमेकडे पाहिलें कीं, कोचीन बंदराचें सुंदर दृश्य दिसतें. मलबारच्या भूमीनें तेथें दोन विस्तीर्ण

बाहूंत समुद्राला पकडण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळें वाऱ्यापासून व लाटांपासून संरक्षित असें केवढें तरी विस्तीर्ण बंदर निर्माण झालें आहे. मला वाटतें कीं, त्याचा विस्तार जवळ जवळ मुंबई बंदराएवढा असावा. मात्र मुंबई बंदरांत जेवढ्या मोठ्या भागांत खोल पाणी आहे तेवढ्या मोठ्या भागात तें कोचीनला नसावें. त्यामुळें तेथें कमी बोटी नांगरून ठेवतां येत असाव्यात. अर्थात् हा आपला माझा अंदाज. समुद्राला कवळणारे भूमीचे दोन्ही बाहू तेथें जवळ जवळ जुळलेले आहेत. त्यांच्यामध्यें जी लहानशी फट आहे तिच्यांतून बोटी येतात व जातात. बंदरांचीं हीं जीं तोंडें असतात तेथें पुष्कळदां भरती-ओहोटीच्या उलटसुलट प्रवाहांनीं वाळूचा मोठा बांध निर्माण होतो व त्यामुळें बोटी येण्याजाण्यास अडचण पडूं लागते. कोंकणांतल्या बंदरांत असे बांध निर्माण होतात हें मला माहीत आहे. कोचीनला तसें होतें कीं काय तें जाणून घेण्याची मला उत्सुकता वाटत होती. पण ती पुरी करणारा तेथें कोणी भेटला नाहीं.

मुख्य किनाऱ्यावर एर्नाकुलम् वसलेलें आहे व समोर समुद्रांत गेलेल्या भूमीच्या उजवीकडच्या बाहूवर कोचीन हें जुनें चित्रासारखें शहर वसलेलें आहे. कोचीन व एर्नाकुलम् ह्यांच्यामध्यें भूमीचें एक टोंक पाण्यांत घुसलेलें आहे. बोटी लागायचे धक्के ह्या टोंकावर आहेत व मालाची चढउतार तेथेंच होते. मुंबईच्या वाडीबंदर वगैरे भागांसारखा तो भाग दिसतो. गुदामें, मालाच्या पेट्या, अजस्र क्रेन्स, बोटींच्या उंच डोलकाठ्या व लठ्ठ बुटके बंब ! दोन चार मोठाल्या बोटी तेव्हां बंदरांत होत्या. छोटीं कुरूप टग्ज् फरफटल्यासारखीं इकडून तिकडे जात होतीं. लॉंचेस् आपल्या निमुळत्या नाळांनीं पाणी कापीत इकडून तिकडे सुरसुरत होत्या आणि असंख्य होडकीं आपल्या चौकोनी शिडांत वारा धरण्याचा प्रयत्न करीत पाण्यांत डुबकत होतीं.

कोचीन बंदराच्या उजवीकडे व डावीकडे कित्येक मैल दूर बॅक वॉटर्सचे रुंद पट्टे गेलेले आहेत आणि पुढें त्यांना अनेक फाटे फुटलेले आहेत. परशुरामानें समुद्रांतून वर आणलेली मलबारची भूमि अशी अजून पाण्यानें निथळते आहे.

बंदरें मला फार आवडतात. अफाट दर्यांत लाटांवर हेलावत, वाऱ्यावर झुलत फिरणाऱ्या बोटींचीं बंदरें हीं छोटीं छोटीं घरटींच असतात. तेथें त्यांना निवारा मिळतो. बोटी तेथें जरा विसांवतात आणि मग पुन्हा बंदराच्या अरुंद तोंडांतून नवीं धाडसें करायला बाहेर पडतात. बंदरांत नांगरलेल्या बोटी पाहिल्या कीं, माझ्या मनांत कसलें तरी खोल समाधान वाटतें आणि बंदरांतून

बाहेर पडणारी बोट पाहिली म्हणजे कसलासा आनंद वाटतो आणि कसलेंसें दुःख होतें. कोकणच्या बंदरांतून मी मनमुरादपणें हिंडलों आहें. तेथल्या बंदरांची बारीकसारीक माहिती मला आहे.

समुद्रावरच मुळीं माझें प्रेम आहे. लहानपणीं मीं मुळीं बोटीचा कप्तान होण्याचेंच ठरवलें होतें. अनेक स्वप्नांप्रमाणें तें स्वप्नहि आतां विरलें आहे. पण अजून सारें कामधाम सोडून एखाद्या भटक्या बोटीवरून (Tramp Steamer) मनमुराद भटकून यावें असें मला फार फार वाटतें.

समुद्रकिनाऱ्यावरच्या एका छोट्या हॉटेलमध्यें आम्हीं चहा घेतला. हें हॉटेल आगगाडीच्या 'रेस्टॉरंट कार'सारखें होतें. आणि मग आम्ही लॉंचमध्यें बसून कोचीनला गेलों. कोचीन जुनें आहे. भोंवतीं भिंतींचे तट असलेलीं तेथलीं घरें जुनाट वाटतात. त्यांच्या जुन्या पद्धतीच्या माड्या व खिडक्या त्यांचा जुनेपणा विशेष लक्षांत आणून देतात. तेथले रस्ते कांहींसे अरुंद व वेडेवांकडे आहेत. तेथल्या दुकानांच्या मांडणींतदेखील नवेपणा अगर माल विकण्याची उत्सुकता दिसत नव्हती. तेथल्या लोकांच्या चेहऱ्यांवरदेखील एक प्रकारचा निरुत्साह मला दिसला—निदान तसा भास झाला. भूतकाळांतच तें शहर रेंगाळत होतें !

माझ्या दृष्टीसमोर एकदम निराळें दृश्य दिसूं लागलें. अरब आणि पोर्तुगीज व्यापाऱ्यांचीं गलबतें आपलीं अजस्र शिडें आवरून त्या बंदरांत नांगरलेलीं मला दिसूं लागलीं. मसाले, मलमलीचें कापड, वगैरे उंची माल आरडाओरडा करीत अर्धनग्न गुलाम त्या गलबतांत भरत होते. विचित्र पोषाख केलेले अरब आणि फिरंगी व्यापारी पालख्यांतून इकडे तिकडे जात होते. त्यांच्या नजरा धूर्त होत्या आणि ओठ घट्ट मिटलेले होते. त्यांच्या कमरेला सुवर्णमुद्रांनीं भरलेल्या मखमलीच्या पिशव्या होत्या. कुठच्या तरी मोठ्या वाड्याच्या दिंडींतून ते आंत जात होते. चोरट्या आवाजांत बोलणीं होत होतीं. हातावर हात ठेवून वचनें दिलीं जात होतीं. मखमली पिशव्या रित्या होत होत्या. मुनीम लोक लिहीत होते. न ऐकतां, न बोलतां सर्व जाणून ते लिहीतच होते.

रिक्षावाल्यांना चुकवत आम्ही कोचीनच्या अरुंद वांकड्या तिकड्या रस्त्यांवरून हिंडलों. तेथें ज्यू लोकांचें एक सिनेगॉग आहे. चारशें वर्षांपूर्वी तें बांधलेलें आहे. पण तें बांधणारे ज्यू लोक तेथें किती तरी वर्षें रहात होते. पॅलेस्टाइनमध्यें ज्यू लोकांचा छळ होऊं लागला तेव्हां ते दशदिशांना पळाले. त्यापैकीं एक तुकडी

इकडे हिंदुस्थानांत आसऱ्याला आली. आज शेकडों वर्षें हे लोक येथें सुखासमाधानानें नांदत आहेत. हिंदूंनीं त्यांना त्रास दिला नाहीं. त्यांना त्रास दिला तो पोर्तुगीजांनीं. त्यांच्याच देशांत जन्मलेल्या ख्रिस्ताच्या अनुयायांनीं!

त्या सिनेगॉगमधलें वातावरण मला अधिकच जुनाट वाटलें. इतिहासाचीं वटवाघळें तेथें उलटीं लोंबत आहेत असें मला वाटलें. खूप दिवस पेटींत ठेवलेल्या कपड्यांना जशी घाण येते तशी घाण तेथें येत आहे असेंहि मला वाटलें आणि त्या सिनेगॉगमधून बाहेर पडेपर्यंत मला तो भास सारखा होत होता.

सिनेगॉगच्या दाराशींच दोन चार थेरडे बसलेले होते—ज्यांचें जीवन संपलें होतें, पण आयुष्य शिल्लक होतें असे. न बोलतां ते आळशीपणानें बसलेले होते. त्यांचा वर्ण गोरा होता. पण त्यावर एक चमत्कारिक प्रकारचा फिकटपणा आलेला होता. मूटभर लोकांनीं पुन्हा पुन्हा आपापसांत लग्न केल्यामुळें असें झालें असावें असें मला वाटलें. पण ही नुसती एक कल्पना! त्यांचीं नाकें ज्यू पद्धतीचीं चांगलीं भलीं मोठीं होतीं. तीं टोंकदार नव्हतीं. जेथें नाकाचें टोंक असायचें तेथें चपटा त्रिकोणी भाग होता. त्यांचे चेहरे, त्यांच्या दाढ्या व त्यांच्या त्या टोप्या पाहून मला वाटलें कीं, 'Old Testament' मधले मेंढरें राखीत हिंडणारे लोकच पुन्हा माझ्या दृष्टीसमोर आले आहेत.

आम्हांला पाहून त्यांतला एक म्हातारा उठला, आपले घाणेरडे हात दाखवून बचकभर थुंकला आणि इंग्रजींत आमच्याशीं बोलूं लागला. चमत्कारिक कण्हल्यासारखें तो बोलत होता आणि तेच शब्द पुन्हा पुन्हा उच्चारीत होता.

तो म्हणाला, "आम्ही शेकडों वर्षें ह्या कोचीनमध्यें रहात आहोंत. आम्ही थोडे आहोंत आणि इथेंच एकमेकांना चिकटून रहातों. आम्हांला येथल्या लोकांनीं त्रास दिला नाहीं. गुण्यागोविंदानें आम्ही येथें रहातों. आमच्याजवळ खूप पैसा आहे. आमच्या पुष्कळ जमिनी आहेत, घरें आहेत. आमचीं मुलें शिकतात आणि आळशीपणानें दिवस काढतात. त्यांना काम करायची गरज नाहीं, आणि तीं काम करीत नाहींत."

आम्हीं आश्चर्यानें म्हटलें, "तुम्ही सगळे लोक असेच आळशीपणानें दिवस काढतां?"

तो म्हणाला, "हो. मग काय करायचें? आमच्याजवळ भरपूर पैसा आहे."

नंतर तो थांबून म्हणाला, "आमच्याजवळ पैसा आहे. But we are sinking fast! We are sinking fast!"

कण्हल्यासारखा आवाज काढून त्या थेरड्यानें पुन्हा पुन्हा म्हटलेले ते शब्द माझ्या कानांत खोल घुमले. आर्थिक सुस्थिति असूनदेखील हे लोक खचत होते, नष्ट होत होते. उघड्या डोळ्यांनीं ते हें बघत होते आणि तरी त्याबाबत त्यांना कांहीं करावेंसें वाटत नव्हतें—करतां येत नव्हतें.

असें कां बरें होत होतें ? त्यांची संपत्तीच तर त्यांच्या नाशाचें कारण झाली नव्हती ? कीं हिंदी जीवनाच्या प्रवाहापासून अलग राहिल्यामुळें ह्यांची अशी अवस्था झाली होती ? जे इतरांपासून दूर रहातात ते असेच अखेर नष्ट होतात, कीं ह्यांच्या नाशाचीं आणखी कांहीं गूढ कारणें आहेत ? मूठभर लोकांनीं आपापसांत लग्न केल्यामुळें तर असें झालें नाहीं ? समाजाच्या जीवनांतील स्थित्यंतरांचीं कारणें अनेक व गूढ असतात. आपल्याला तीं अजून समजलेलीं नाहींत.

कोचीनमध्यें काळे ज्यू पण आहेत. पण हे गोरे ज्यू त्यांच्याशीं लग्नें वगैरे करीत नाहींत. तो म्हणाला, " आमच्या धर्माची अशा लग्नांना कांहीं आड-काठी नाहीं हं. ते काळे म्हणून आम्ही त्यांना दूर ठेवीत नाहीं. पण ते शिकलेले नसतात. श्रीमंत नसतात. . ."

आम्हीं हसून म्हटलें, "समजलें, समजलें ! "

त्यांचा नाश होत होता, पण आपला निराळेपणा कायम ठेवायचा त्यांचा हट्ट संपत नव्हता !

आम्हीं विचारलें, " इसराएलमध्यें (ज्यू लोकांच्या नव्या राष्ट्रांत) तुम्ही कां जात नाहीं ? "

तो म्हणाला, " आमच्यापैकीं दोनचार तरुण तिकडे गेले आहेत. पण आम्हीं कशाला तिकडे जायचें ? आमचें इथें काय वाईट आहे ? "

हें बरोबरच होतें आणि शिवाय नाश पावणाऱ्या या लोकांना एक नवें राष्ट्र निर्माण करण्याची ईर्ष्या कशी वाटणार ?

त्या म्हाताऱ्याबरोबर आम्ही सिनेगॉगमध्यें हिंडलों. तेथें कोणीहि जाऊं शकतो, आणि आंत जातांना पायतणें काढावीं लागत नाहींत. आंत मध्यभागीं पितळी कठडे असलेली छोटीशी जागा आहे. तेथून त्यांचा धर्मगुरु उपदेश करतो. 'Old Testament' ची हिब्रू भाषेंत लिहिलेली प्रत तेथें आहे. वर मोठालीं झुंबरें आहेत आणि वर चौफेर एक गॅलरी आहे. पूर्वी बायका जेव्हां पडदा पाळीत तेव्हां त्यांची तेथें बसायची सोय करण्यांत येत असे.

त्या सिनेगॉगमध्यें कलात्मक सौंदर्य असें कांहींच नाहीं. तें पाहून झाल्यावर आम्ही बंदरावर आलों. तेथें होडीवाल्यांनीं आम्हांला घेरलें. त्यांपैकीं एकाला चार आणे देऊन आम्ही त्यामध्यें पुढें आलेल्या जमिनीच्या टोंकावर गेलों. आमच्याकडून त्यानें दुप्पट पैसे घेतले होते. तरी पण तें आम्हांला फार स्वस्त वाटलें. कोचीनमध्यें माणसांच्या श्रमांना किंमत नाहीं हेंच खरें. त्या निर्मनुष्य भागातून आम्ही पलीकडे गेलों आणि तेथून लॉंचनें एर्नाकुलम् गांठलें.

रात्रीं माडांची सळसळ ऐकत बिछान्यात पडलों असतांना माझ्या मस्तकांत त्या ज्यू म्हाताऱ्याचें वाक्य घुमत होतें :

'We are sinking fast ! We are sinking fast !'

## : १३ : बॅक वॉटर्स

दुसऱ्या दिवशीं म्हणजे आठ एप्रिलला आम्हीं विशेष असें कांहीं केलेंच नाहीं. किनाऱ्यावर गेलों आणि लॉंचेसमध्यें बसून बॅक वॉटर्समधून मनमुराद हिंडलों. मलबारच्या सृष्टिसौंदर्याचें आकंठ पान केलें आणि एका खिन्न करणाऱ्या तृप्तीनें मन भरून गेलें.

एर्नाकुलमच्या किनाऱ्याला ठिकठिकाणीं लॉंचेस उभ्या रहातात आणि लोकांना निरनिराळ्या ठिकाणीं घेऊन जातात. आपण जसे बसकरितां स्टॅंडवर उभे राहतों तसे ते लॉंचकरितां धक्क्यावर उभे रहातात आणि आपण बसला देतों त्यापेक्षां किती तरी कमी पैशांत त्यांचा प्रवास होतो. अडीच तीन तास भटकायला आम्हांला फक्त बारा आणे खर्च आले. एर्नाकुलमहून ॲलेप्पीला जायचें म्हणजे नऊ ते दहा तास बॅक वॉटरमधून प्रवास करावा लागतो. पण त्याकरितां माणशीं कांहीं रुपया द्यावा लागत नाहीं. पण तोच प्रवास मोटारनें करायचा म्हणजे रुपयांच्या नोटा मोजाव्या लागतात.

एर्नाकुलमच्या आसपास पाहिलें तर चोहों बाजूंस माडच माड दिसतात. आणि बॅक वॉटर्समधून प्रवास करतांना हेंच दृश्य दिसतें. मलबारची सपाट किनारपट्टी म्हणजे माडांची एक गर्द राई आहे. उंच गेलेलीं खोडें आणि वरचे झुपकेदार शेंडे! वांवभरदेखील जागा मोकळी न सोडतां ते सर्वत्र वाढत असतात. रांगा धरून त्यांच्या पलटणीच्या पलटणी सर्वत्र उभ्या असतात. घरांच्या भोंवतीं ते वाढतात. बॅक वॉटर्सच्या कडेला वाढतात. बॅक वॉटर्सच्या विस्तारांत जमिनीनें जरा कुठें डोकें वर काढलें कीं त्यावरदेखील ते एकटे दुकटे वाढतात. शेकडों माड! हजारों माड! नजरेचा टप्पा संपतो पण माड संपत नाहींत. दुसऱ्या वनस्पती वा झाडें नजरेंत भरत नाहींत. जवळून पाहिलें म्हणजे अलग दिसणारे त्यांचे शेंडे दूर पहावें तसतसे परस्परांत मिसळून जातात. आणि त्या शेंड्यांचा समुद्र क्षितिजापर्यंत पसरलेला दिसतो. चोहों बाजूंनीं उसळतो. आपल्याला गिळूं पहातो.

एखाद्या माडाला अंमळ कमरेंत पोंक असतें. एखादा तर साफ झोंपून एकदम कुठें तरी आपलें डोकें वर काढतो. पण सगळ्यांचीं किडकिडीत काळीं

खोडें सरळसोटपणें वर गेलेलीं असतात. सूर्यकिरणांचा शोध करीत आणखी वर जात असतात. ह्या माडांच्या नव्या हिरव्या झांवळ्यांची ओंजळ नेहमीं आकाशाकडे वळलेली असते. सूर्यकिरणांचा वर्षाव आपल्या संपुटींत झेलीत असते. त्याखालच्या झांवळ्या खोडाला घट्ट पकडून आपलीं बांकदार अंगें पेलीत असतात. एक डौलदार झुपका गुंफतात. दुसऱ्या माडांच्या झांवळ्यांवर आपलीं पिवळसर अंगें घासतात. त्यांच्या पात्यांच्या फटींतून उन्हाचे कवडसे खालीं ठिपकतात. कातरलेल्या सावल्यांची पखरण जमिनीवर पसरते आणि फटींतून जाणाऱ्या किरणांचें रंगीत विणकाम त्या झांवळ्यांच्या पात्यांभोंवतीं होतें. ह्या झांवळ्या जेथें खोडांना चिकटलेल्या असतात तेथेंच नारळांच्या पेंद्या लोंबत असतात. पिवळसर शेंदरी, हिरवे आणि पिवळे नारळ तेथें लगडलेले असतात. आणि अगदीं खालीं सुकलेल्या फांद्या, खोडाचा सुटणारा आधार कसाबसा धरून ठेवत, विगलितपणें खालीं लोंबत असतात. वारा आला कीं त्या कुरकुरतात, धाडकन् जमिनीवर पडतात. त्यांचीं कलेवरें माणसें फरफरां ओढून टाकतात आणि आपलीं असंख्य मुळें रेताड भुसभुशीत जमिनींत रोंवून आपला तोल सांवरीत, उंच माड वाऱ्यावर डुलत असतात. आपल्या रुक्ष खोडांतून जीवनरस वर शोषून घेऊन, नव्या झांवळ्यांच्या ओंजळी उघडत असतात.

उंच काळसर खोडें आणि हिरवे झुपकेबाज शेंडे! वाऱ्याबरोबर डौलांत डुलणें आणि अकस्मात् धारण केलेली गूढ निश्चलता! कातरलेल्या सांवल्या आणि कातरलेले कवडसे! झांवळ्यांची मंद सळसळ आणि गूढ स्तब्धता! आपल्या मनांतल्या कुठल्या तरी अज्ञात बेटावर माड असेच डुलत असतात.

हें सौंदर्य अखंडितपणें मलबारच्या किनारपट्टीवर पसरलेलें आहे. हें वैभव तेथें सर्वत्र डुलतें आहे. नजरेला तें तृप्त करतें आणि शिणवतें. मनाला भारून टाकतें. संदिग्ध भावनांनीं तें कांठोकांठ भरतें.

ह्या वैभवशाली वनश्रींतून बॅक वॉटर्सच्या पाण्याचे रुंद, मोठाले पट्टे राजरस्त्यासारखे गेलेले आहेत. मध्येंच त्यांना उभे आडवे अनेक फाटे फुटतात आणि त्यांतून छोट्या होड्या येजा करीत असतात. बॅक वॉटर्सच्या ह्या रुंद, संथ पट्ट्यांनीं ह्या वनश्रीची शोभा वाढली आहे. पाण्याच्या त्या पट्ट्यांवरून दुतर्फा दाटलेल्या वनश्रीच्या मधून प्रवास करतांना वाटतें कीं, त्या पुढच्या वांकणानंतर एका अद्‌भुत सोनेरी नगरींत आपण प्रवेश करूं. अशा कुठच्या तरी अद्‌भुत

सोनेरी नगरींत प्रवेश करण्याचें स्वप्न सगळ्यांच्याच हृदयांत असतें. आणि अशा ठिकाणीं तें स्वप्न सत्यसृष्टींत अवतरेल कीं काय, असें वाटूं लागतें.

बॅक वॉटर्सच्या रुंद पट्टयावरून आमची लॉंच पुढें सरकत होती. दोन्ही बाजूंचा किनारा दगडांनीं बांधून काढलेला होता. किनाऱ्यावर माडांच्या दाटींतून छोट्या झोंपड्या आणि क्वचित् पांढरीं पिवळीं कौलारू घरें डोकावत होतीं. एखाद्या चर्चचा शुभ्र मिनार डौलानें आकाशांत चढला होता. अंतराअंतरावर लाकडें पाण्यांत पुरून छोटे छोटे धक्के तयार केलेले होते. आसपासच्या लोकांनीं आपल्या चिमुकल्या होड्या त्या धक्क्यांना बांधून ठेवल्या होत्या आणि तेथून त्यांत उतरून ते मच्छीमारीला निघत होते.

ह्या धक्क्यांच्यावर छत्रीच्या सांगाड्यासारखे भले मोठे लाकडी सांगाडे उभारलेले होते. छत्रीवर जसें कापड असतें तशीं ह्या सांगाड्यांवर जाळीं टाकलेलीं असतात. हे सांगाडे वांकवून तीं जाळीं पाण्यांत बुडवतात. मग कांहीं वेळानें तीं जाळीं वर काढलीं कीं त्यांत मासे अडकलेले असतात.

लहानमोठ्या असंख्य होड्या ह्या बॅक वॉटर्सच्या पट्टयांत फिरत होत्या. त्या सगळ्या लांबड्या आणि चिंचोळ्या होत्या. कुठें गोणपाटाचीं अगर दुसऱ्या कसल्याहि जाडशा कापडाचीं फाटकीं चौकोनी शिडें त्या होड्यांना लावलेलीं होतीं आणि त्यांत वारा पकडून त्या इतस्ततः पळत होत्या. तीं काळींबेंद्रीं अर्धनग्न माणसें त्या डुचमळत्या, लडबडत्या होड्यांतून आपण जमिनीवर वावरतों तशीं पाण्यांत वावरत होतीं. एवढीं एवढीं पोरेंदेखील भसाभस वल्हीं मारत त्या होड्या इकडून तिकडे नेत होतीं. त्या होड्यांतल्या कांहीं माणसांनीं माडाच्या पात्यांच्या बशीसारख्या रुंद टोप्या डोक्यावर घातल्या होत्या. त्या हलक्या टोप्या उन्हापासून चांगलें संरक्षण करीत होत्या.

ह्या चिमुकल्या होड्यांहून मोठ्या असलेल्या होड्या प्रौढपणें मालाची नेआण करीत होत्या. त्या अधिक मजबूत आणि आकारदार होत्या. त्यांचीं पोटें फुगीर होतीं आणि नाळी धारदार होत्या. कवाईत करणाऱ्या माणसांनीं एकदम हात लांब करावे, तशीं उचललेलीं वल्हीं क्षणभर हवेंत स्थिर रहात होतीं, मग शिस्तींत पुढें सरकून पाण्यांत बुडत होतीं, फेसांचे तीन तीन पुंजके मागें ढकलले जात होते आणि पुन्हा उचललेल्या हातासारखीं तीं वल्हीं हवेंत स्थिर होत होतीं. लयबद्धपणें पुन्हा पुन्हा त्यांचे पाण्यावर नाजुक आघात होत होते. होड्या सुरसुरत पुढें सरकत होत्या.

मोठालीं गलबतें अधिक प्रौढपणें, अधिक संथपणें, मोठालीं ओझीं वहात दूरवर चालली होतीं. त्यांच्यावर माल इतका लादलेला होता कीं, तीं बहुतेक पाण्यांत बुडलेलीं होतीं आणि त्यांच्या कडाच काय त्या पाण्यावर दिसत होत्या. एकामागून एक अशीं तीं रांगेनें चाललीं होतीं. कधीं जोडीजोडीनें तीं जात होतीं आणि कधीं त्यांची अडाणी माळ एखादी बळकट लॉंच ओढून नेत होती. कांहींच्यावर तट्टयांचीं अर्धवर्तुळाकार छपरें होतीं आणि स्वयंपाकाचा धूर कांहींच्या पोटांतून निघत होता.

आणि यंत्रांचा उंच गुणगुणाट करीत, धूर सोडीत आणि फ़ेस उधळीत लॉंचेस्, गर्कपणें इकडून तिकडे घाईनें जात होत्या.

पाण्याच्या ह्या राजरस्त्यावर रहदारीची वर्दळ अखंडपणें चालली होती. पण तरी तो रस्ता इतका मोठा होता कीं, कोणाचीच कोणाला अडचण होत नव्हती. आणि परिणाम होत होता तो वर्दळीचा आणि गडबडीचा नव्हे, तर एका सुखकारक शांततेचा !

बॅक वॉटर्सच्या पात्रांत मासे मारण्यांत अनेक लोक गुंतले होते. बदकें किनाऱ्याजवळ पाण्यांत डुबकत होतीं. कोंबडींदेखील अगदीं पाण्याच्याजवळ जाऊन ओल्या रेतींत माडाचीं फुलें, समुद्रकांटचे कृमिकीटक वेंचत होतीं. आणि एखाद्या लाटेच्या पाण्यानें जरी पाय भिजले तरी त्यांना भीति वाटत नव्हती. कुठें पोरांनीं गळ टाकले होते, तर कुठें आपण अंगणांत पोरें ठेवतां, तशीं पाण्याच्या कडेला पोरें ठेवून बायका छातीभर पाण्यांत जाऊन छोट्या जाळ्यांत मच्छी पकडत होत्या आणि तें उन्हांत तळपणारें आणि तडफडणारें रुपेरी पीक टोपल्यांत भरत होत्या. टोपल्यांभोंवतीं घोंगावणाऱ्या कावळ्यांना कर्कशपणें हाकलत होत्या. त्या चिमुकल्या, लडबडत्या होड्यांतून जाळीं फेकलीं जात होतीं आणि एखाद दुसरा शेपटी उडवणारा मासा होडीच्या तळात फेकला जात होता. पात्राच्यामध्यें ठिकठिकाणीं मोठालीं जाळीं पसरलेलीं होतीं आणि त्यांच्या खांबांचीं डोकीं पाण्यावर दिसत होतीं. कावळे,. घारी, बगळे वगैरे पक्षी, वेगानें तिरप्या झेपा घेऊन आपलें भक्ष्य टिपीत होते. समुद्रांतलें तें बाराहि महिने येणारें रुपेरी पीक सगळीं जणें गोळा करीत होतीं. बॅक वॉटर्सचें विस्तीर्ण पात्र माडांच्या गर्द दाटींतून दूरवर पसरलें होतें.

किनाऱ्याच्या अगदीं जवळून आमची लॉंच चालली होती. कडेला झोंपड्या आणि घरें दिसत होतीं. झोंपड्यांच्या भिंती आणि छपरें माडाच्या झावळ्यांचींच

होतीं. घरांची बांधणी निराळी, इंग्लिश कंट्री हाउसेसच्या धर्तीची वाटली. पुन्हा खांब पाण्यांत पुरून केलेले धक्के लागत होते आणि त्यांवरचे ते मासे पकडायचे छत्रीच्या सांगाड्यांसारखे लाकडी सांगाडे उभे होते. छोटीं छोटीं अनेक बेटें त्या बॅक वॉटर्सच्या पात्रांत होतीं. कुठें कुठें तर नुसती हात दोन हात जमीन वर आलेली होती, पण तेथेंहि एक दोन माड वाढण्याचा प्रयत्न करीत होते. कांहीं कांहीं बेटें मात्र फारच मोटीं होतीं. एकदां बराच वेळ आमची लॉंच एका बेटाच्या बाजूनें चालली होती. आम्हांला वाटत होतें कीं तो मुख्य किनाराच आहे. पण बोट पुढें गेली तसें त्या बेटाच्या दुसऱ्या बाजूनें पसरलेलें बॅक वॉटर्सचें रुंद पात्र दिसलें. आणि केवढ्या तरी मोठ्या बेटाच्या बाजूनें आम्ही चाललों होतों असें ध्यानांत आलें. बाकी सर्वत्र पाणी पसरलें आहे अशा या प्रदेशांत बेटें आणि मुख्य भूमि असा फरक करणेंच वेडेपणाचें आहे.

मध्यें मध्यें आमची लॉंच लाकडी धक्क्याजवळ थांबत होती. माणसांची चढउतर होत होती. पुनः लॉंच पुढें जात होती. गल्याबोळांप्रमाणें बॅक वॉटर्सचे फाटे दुतर्फा दूरवर आंत गेलेले होते. कांहीं कांहीं फाटे तर इतके अरुंद होते कीं दोन्ही बाजूंच्या माडांच्या झांवळ्यांनीं ते आच्छादले गेले होते. आणि एखाद्या गर्द छायेंतून जाणाऱ्या पाऊलवाटेवरून आपण चालत जावें तशा चिमुकल्या होड्या त्या पाण्याच्या पाऊलवाटेवरून सरकत जात येत होत्या. ह्या निरनिराळ्या फाट्यांतून माणसें भरून होड्या येत होत्या. त्या आल्या कीं आमच्या लॉंचचा वेग कमी होत होता. मग त्या होड्या लॉंचच्या कडेला बिलगल्या कीं माणसांची चढउतर होत होती. वेगळ्या होऊन होड्या आपल्या मार्गानें जात होत्या. लॉंच वेग वाढवून फरफराट करीत पुढें चालत होती.

लॉंचमधलीं माणसें आपल्या भारतांत सर्वत्र दिसतात तशींच होतीं—गरीब, अडाणी. टोपल्या आणि बोचकीं घेऊन तीं कुठें कुठें चाललीं होतीं. प्रधान फोटो काढूं लागला तसें सगळ्यांना कुतूहल वाटलें. आपल्या नजरांनीं ते त्याच्या कॅमेऱ्यावर हात फिरवूं लागले. कोणी जाग्यावरचे उटून त्याच्याजवळ गेले आणि तो काय करतोय् तें गंभीरपणें पाहूं लागले. इस्तरीचे शुभ्र कपडे घातलेले पांढरपेशे वर्तमानपत्रांत डोकीं खुपसून आपला अलगपणा दर्शवीत होते. एक भिकारी आमच्या पायांजवळ बसून याचना करीत होता.

ह्या मल्याळी लोकांतले कांहीं दक्षिणेंतल्या लोकांहून अधिक उंच, उजळ

वर्णाचे आणि तरतरीत चेहरेपट्टीचे दिसतात. दक्षिणेंत ज्या अनेक मानव-समूहांच्या रक्ताचें मिश्रण झालें त्यांत ह्यांनीं आपला निराळेपणा कांहीं अंशीं शिल्लक ठेवला असावा. काळेबेंद्रे आणि पुढें उतरता चेहरा असलेले लोकहि त्यांत होतेच. त्यांचीं तोंडें विशेषच पुढें आलेलीं असल्यामुळें ते माकडांसारखे दिसत होते.

लॉंचमध्यें दोन फुगीर गालांच्या ख्रिश्चन बायका होत्या. त्यांच्या चेहऱ्यावरचा शांत, सात्त्विक भाव मला आवडला. त्या बहुधा रोमन कॅथॉलिक असाव्या. रोमन कॅथॉलिक लोकांचा देव एक असला तरी संत पुष्कळ आहेत. त्यांचे उत्सव अनेक असतात. धर्मकांडहि ( ritual ) बरेंच असतें. पोपची सत्ता धर्मगुरूंच्या द्वारें त्यांच्यावर नेहमीं चालत असते आणि confessions च्या द्वारें त्यांचें व धर्मगुरूचें आणि धर्माचें एक नाजुक नातें निर्माण होतें. धर्मगुरूंच्या अधिकारा-मुळें आणि निकटपणामुळें त्यांचें स्वातंत्र्य कमी होत असलें तरी त्यांना एक प्रकारची खोल मनःशांति लाभते. कोणी म्हणेल कीं ही मेंढरांची शांति व संतोष आहे. पण तींतहि एक सौंदर्य आहे.

जुन्या वळणाच्या हिंदु स्त्रियांच्या चेहऱ्यावरदेखील असाच शांत व सात्त्विक भाव दिसत असे—अजून दिसतो. पण त्यांच्या ठिकाणीं जो एक बावळटपणा असतो तो ह्या ख्रिश्चन स्त्रियांच्या ठिकाणीं नसतो. त्या अधिक तरतरीत वाटतात.

कुठच्या तरी एका लाकडी धक्क्यावर आम्ही उतरलों. जरा इकडे तिकडे केलें. तेथल्या प्राथमिक शाळेंतल्या एका मास्तरशीं इंग्रजींत थोड्याशा गप्पा मारल्या. त्यानें सांगितलें कीं, कोचीनमध्यें प्राथमिक शिक्षण फुकट दिलें जातें. मग कुतूहलानें आमच्या भोंवतीं जमा झालेल्या पोराटोरांच्या घोळक्यांतून वाट काढीत आम्ही दुसऱ्या एका लॉंचमध्यें बसलों आणि एर्नाकुलमला परतलों.

दुपारीं विश्रांति घेतली. प्रधानची तब्येत बिघडली होती. त्यामुळें आम्ही फारशी धावपळ करीत नव्हतों. ह्या प्रधानची तब्येत बेटी विचित्रपणा करीत होती. तो एकदम आजारी पडायचा, अंथरूण धरायचा आणि घाबरवून सोडायचा. वाटायचें कीं, आतां ह्याची मुंबईला रवानगी करावी लागणार. त्याचें पोट बिघडायचें अगर जबरदस्त खोकला व्हायचा. पण चोवीस तासांत तो पुन्हा टुणटुणीत व्हायचा !

संध्याकाळीं आम्ही पुन्हा समुद्रकिनाऱ्यावर फिरायला गेलों. संधिप्रकाशांत तें शांत, विस्तीर्ण बंदर मोठें छान दिसत होतें. पश्चिमेला तांबडा भडक सूर्यास्त

होत होता. त्या सूर्यास्ताची लाली पाण्यांतून परावर्तित झाल्यामुळें, पाण्यावर लालट छटा आली होती आणि साऱ्या वातावरणांतदेखील लालट धूळ उडत आहे असा भास होत होता. सूर्यास्ताच्या त्या भव्य, तांबड्याभडक पार्श्वभूमीवर माडांच्या काळ्या छायाकृतींची रांग पिशाच्चांच्या सैन्याप्रमाणें उभी होती. एखाद्या मचव्याच्या शिडाचा काळा त्रिकोण सावकाश सरकत जातांना अंधुकपणें दिसत होता. आणि एखाद्या लॉंचच्या डोलकाठीवरचा चिमुकला दिवा अधांतरीं तरंगत कुठं तरी भटकत जात आहे असें वाटत होतें. एका बाजूला कोचीनच्या द्वीपांची रांग अंधुक संधिप्रकाशांत पिवळ्या फिकटपणें चमकत होती.

चर्चच्या घंटेच्या शांत गंभीर आवाजानें दिवस संपल्याचें सांगितलें आणि कशी कोण जाणे, मनाला एक प्रकारची शांति दिली. जणुं त्या चर्चनें सांगितलें, "भांबावूं नको, माझ्या आश्रयाला ये. शेकडों वर्षें मीं वाट चुकलेल्या, भांबावलेल्या माणसांना प्रकाश दाखविला आहे. आणि मी अनंतकालपर्यंत असेंच करीत रहावें अशी त्या आकाशांतल्या बापाची योजना आहे."

देवाधर्मावर माझा विश्वास नाहीं. पण परमेश्वरावरच्या अगर धर्मावरच्या श्रद्धेमुळें जी गाढ शांति मनाला लाभते ती मला पुन्हा पुन्हा जाणवते. तिचें गूढ उकलावें असें वाटतें. ती आपल्याला मिळावी अशी तळमळ मनाला लागते.

पण देवाधर्मावर माझा कधींच विश्वास बसणार नाहीं आणि माझ्या मनाची ही तळमळदेखील कधींच थांबणार नाहीं.

चर्चच्या घंटेचा मनांत घुमणारा तो नाद समुद्राच्या खळबळीनें पुसून टाकला आणि मग नुसती ती समुद्रांतली खळबळ शिल्लक राहिली—नुसती ती खळबळ शिल्लक राहिली.

दुसऱ्या दिवशीं सकाळच्या बसनें आम्हीं एर्नाकुलम् सोडलें. बसस्टँडवर आम्हीं एका तरुण पाद्र्याशीं ओळख करून घेतली. त्यानें अंगांत जाड चॉकोलेट रंगाचा लोकरीचा पायघोळ झगा घातला होता. पण मला तरी तो त्यांत अडकल्यासारखा वाटत होता. इतक्या कडक उन्हाळ्यांत लोकरीच्या झग्यांत त्याला गुरफटून घ्यावें लागलें होतें, ह्याबद्दल मला त्याची दया येत होती आणि चेहऱ्यावर सात्त्विक भाव आणण्याच्या प्रयत्नांत त्याच्या तोंडावर जो बावळटपणा पसरला होता, त्याचें मला हसूं येत होतें.

पाद्री बापडा स्वभावतःच साधा होता आणि आपण स्वीकारलेल्या वृत्तीनुसार तो चांगुलपणानें वागण्याचा अतिशय प्रामाणिकपणें प्रयत्न करीत होता.

त्याच्याजवळ बुद्धि बेताचीच होती आणि त्याच्या मनावर बिंबवल्या गेलेल्या कांहीं ठराविक कल्पनांत त्याचें मन अडकून राहिलेलें होतें.

आम्ही परप्रांतांतले आहोंत असें कळल्यावर आमची तो विशेष काळजी घेऊं लागला. आम्हांला त्रिवेंद्रमला पोहोंचविण्याची जबाबदारी जणुं त्याच्यावरच पडली आहे असें समजूं लागला. तो पुन्हा पुन्हा आम्हांला सांगत होता, "तुम्ही काळजी घ्या. इथले लोक लुच्चे आहेत. तुमच्याकडून दुप्पट तिप्पट पैसे घेतील. तुमचें सामानसुद्धां पळवतील. हमालावर लक्ष ठेवा."

आतां पुन्हा पुन्हा तो आम्हांला मदत करण्याचें आश्वासन देत होता.

एका धर्मोपदेशकानें लोकांच्याविषयीं सारखा इतका संशय व्यक्त करावा ह्याचें मला हसूं आलें.

आमचें सामान मोटारीच्या टपावर चढेपर्यंत देखरेख करीत उभें रहायला त्यानें आम्हांला भाग पाडलें. आणि मग मोटारींत बसल्यावर "Are you comfortable ?" अशी पुन्हा पुन्हा चौकशी केली.

त्याच्याबरोबर बडबडत रहाण्याचा ताण मला सहन होण्यासारखा नव्हता. पण प्रधान बेटा चिकाटीनें त्याच्याबरोबर बोलत होता. मुंबईतल्या मिशनरी लोकांच्या शाळा व कॉलेजें कशीं चांगलीं आहेत तें सांगून त्याला खूष करीत होता. लेडी ऑफ फातिमाच्या पुतळ्याचें मुंबईत केवढें स्वागत झालें तें खुलवून सांगत होता.

माड, माड, आणखी माड! मन उदासीन करणारी ही कधीं न संपणारी दाटी सारखी माझ्या नजरेला पडत होती. आणि त्या वैपुल्याच्या पार्श्वभूमीवर मलबारच्या प्रजेचें दारिद्र्य रस्त्याच्या कडेकडेनें दिसत होतें. उघडींवाघडीं, हडकुळीं माणसें सर्वत्र दिसत होतीं. ओझें वहायचें काम येथें ढोरांच्याऐवजीं माणसेंच करीत होतीं. ढोरांना लागणारें गवत ह्या जमिनींत पिकत नसल्यामुळें असें झालें होतें कीं माणसांच्या विपुलतेचा तो परिपाक होता तें मला सांगतां येणार नाहीं. पण मालानें खच्चून भरलेले मोटाले गाडे घामानें निथळणारीं माणसें रस्त्यांतून लोटीत नेत असलेलीं पाहून वाईट वाटलें. त्यांतल्या एका माणसाचा हात तुटला होता आणि तरी तो तसाच एका हातानें नेट लावून ती गाडी ढकलीत होता.

तेथें अंगावर पदर घेण्याची पद्धत बायकांत फारशी दिसली नाहीं आणि वयस्क बायकांच्या अंगांत तर पोलकें अगर चोळयाहि नव्हत्या. पुरुषांसारखेंच

फक्त कमरेला गुंडाळून त्या हिंडत होत्या. स्तन हें स्त्रियांचें वैभव ! त्यांच्या स्त्रीत्वाचा दिमाख सगळा त्यांत असतो. दारिद्र्यामुळें ते असे उघडे टाकण्याचा प्रसंग आमच्या स्त्रियांवर यावा ही गोष्ट आपल्याला किती शरमेची आहे ! त्या वयस्क स्त्रियांचे ते सुकलेले, लोंबणारे दीनवाणे स्तन पाहून स्त्रीच्या वक्षःस्थलाविषयींच्या डोक्यांतल्या सगळ्या काव्यात्मक कल्पना रोग झालेल्या कोंबड्याप्रमाणें पटापट मरून पडल्या आणि नागड्या दारिद्र्याचें हें चित्र तेवढें मनात खिळून राहिलें !

हत्तीरोग येथें फार मोठ्या प्रमाणावर आम्हांला आढळून आला. बॅक वॉटर्सच्या आणि समुद्राच्या परिसरांत तो विशेष प्रमाणावर दिसत होता. त्या भागांत हत्तीरोगानें पाय सुजून विद्रूप झालेलीं अनेक माणसें आमच्या नजरेस पडलीं. हा घाणेरडा रोग मला सुरतेंत असाच मोठ्या प्रमाणावर आढळून आला होता. तो रोग झालेलीं अनेक माणसें पाहिल्यावर आम्हांलाहि त्याची बाधा झाली नाहीं ना अशा शंकेनें मी व प्रधान एकमेकांकडे पाहूं लागलों. माझा पाय बधिर झालाय् असेंदेखील मला थोडा वेळ वाटत होतें ! आणि आम्ही एका रस्त्याच्या कडेच्या स्टॉलवरचें अस्वच्छ पेय प्यालों, त्याची चुटपूट प्रधानला लागून राहिली !

मध्येंच आमची मोटार बॅक वॉटर्सच्या कडेला जाऊन थांबली. आम्ही उतरलों तेव्हां एक भलें मोठें नाकतुटकें वाफार तेथें आलें. त्याच्या तुटक्या बाजूचा दरवाजा उघडून किनाऱ्यावर पडला आणि त्याच्या फुगीर पोटांत आमची मोटर शिरली. एक हिसका देऊन तें वाफार चालू झालें आणि पुन्हा एक हिसका देऊन पलीकडच्या किनाऱ्याला लागलें. प्रवासाची ही तऱ्हा पाहून मला मौज वाटली.

"हिसका बसेल कुठें तरी. नीट धरा, आधार घ्या," असें मोठ्या काळजीनें तो पाद्री आम्हांला सांगत होता. आणि स्वतःदेखील त्यानें हातानं कुठं तरी घट्ट धरून ठेवलें होतें.

त्या बोटींत एक छोटा अपंग मुलगा भीक मागत होता. आमच्या पाद्री मित्राकडे त्यानें साहजिकच आपला रोख वळवला. आमचा पाद्री मित्र आश्चर्यानें म्हणाला, "अरे ! परवांच तूं एर्नाकुलमला माझ्याजवळ भिक्षा मागितलीस ना ? आणि आतां तूं इथें कसा ? अपंग असून बराच प्रवास करतोस कीं !"

मग त्यानें बराच विचार केला आणि काळजीपूर्वक खिशांतून आणेली काढीत तो म्हणाला, “The poor boy deserves one anna !”

मोठ्या उदारपणें त्यानें ती आणेली त्या अपंग पोराला दिली. दररोज गरिबांवर मोजकी दया करायची अशी त्याची रीत असावी !

आम्ही बोटींतून उतरलों तेव्हां तो पोरगादेखील खुरडत खुरडत खालीं उतरला आणि मग कुठें तो अदृश्य झाला.

आम्ही ॲलेप्पीला पोहोंचलों तेव्हां तो पाद्री व प्रधान ह्यांच्यामध्यें कम्युनिस्टांच्यावर संभाषण चाललें होतें. प्रधाननें त्याला विचारलें, “येथें कम्युनिस्ट आहेत का ?”

‘कम्युनिस्ट’ हा शब्द उच्चारल्याबरोर त्या पाद्याचा चेहरा कावराबावरा झाला. जणुं एखाद्या हिंस्र, दगलबाज आणि घाणेरड्या प्राण्याविषयीं आपण बोलत आहोंत असा भाव त्याच्या आवाजांत आला. तो हलक्या आवाजांत म्हणाला, “कम्युनिस्ट ? येथें खूप कम्युनिस्ट आहेत. नुक्तीच त्यांनीं ॲलेप्पींत मोठी दंगल केली ना ! कांहीं नाहीं. आपलें चांगल्या लोकांना मारायचें आणि कुठें तरी सांदीकोंपऱ्यांत, नाहीं तर जंगलांत टाकून द्यायचें.”

पुनः पुन्हा तो हें सांगत होता. चांगल्या लोकांना मारून सांदीकोंपऱ्यांत टाकून द्यायचें एवढाच कम्युनिस्टांचा उद्योग असतो अशी त्याची कल्पना दिसली !

मीं म्हटलें, “पण तुमची कॅथॉलिक चर्च म्हणजे कम्युनिझमला अडवणारा मोठा बांध आहे असें आम्ही ऐकतों.”

तो संकोचानें म्हणाला, “हो. आम्ही लोकांनीं योग्य मार्गावरून ढळूं नये असा प्रयत्न करीत असतों. पण इकडे दारिद्य फार आहे. लोकांना काम मिळत नाहीं आणि मग ते कम्युनिस्टांच्या भूलथापांना बळी पडतात.”

प्रधाननें विचारलें, “इथलें सरकार ह्याबाबत कांहीं करीत नाहीं का ?”

ह्यावर तो गुळमुळीतपणें म्हणाला, “सरकार आपल्या परीनें प्रयत्न करतें आहे, पण परिस्थितीच फार बिकट आहे !”

आम्हांला भेटलेले बहुतेक लोक सरकारवर फार कडक टीका करीत होते. यामुळें त्याच्या गुळमुळीतपणाचें आम्हांला नवल वाटलें. बहुधा कॅथॉलिक चर्चचा पाद्री लोकांना असा आदेश असावा कीं राजकारणांत पडूं नका !

कम्युनिस्ट गुंडानें तो पाद्री एकंदरींत बराच पछाडलेला दिसला. रस्त्यांत एक दोन ठिकाणीं आम्हांला माणसांचे जमाव अगर मिरवणुकी दिसल्या तेव्हां ते

कम्युनिस्टांनीं उठवलेले लोक असावेत असा त्यानें ताबडतोब निष्कर्ष काढला !

ॲलेप्पीला आम्ही उतरलों. कारण दुसऱ्या मोटारींत बसून आम्हांला पुढें जायचें होतें. आम्हांला हमाल फसवतील म्हणून तो हमाल ठरवूं लागला. जवळ जवळ पंधरा मिनिटें त्यानें हलक्या चोरट्या आवाजांत हमालाशीं विचार-विनिमय केला आणि मग आम्हांला त्याला सहा आणे द्यायला सांगितलें. तो विजयाच्या समाधानानें म्हणाला, "तो हमाल आठ आणे मागत होता, पण मीं त्याला दोन आणे कमी घ्यायला सांगितलें."

मला वाटलें कीं, आम्हीं नुसता आरडाओरडा केला असता तरी एका मिनिटांत हमालानें दोन आणे कमी केले असते.

पुढें क्विलॉनला आमची जेवणाची सोय करण्याचें त्यानें तोंड भरून आश्वासन दिलें आणि मग मोटर स्टँडच्या समोरच्याच हॉटेलांत तो आम्हांला घेऊन गेला. आम्हीं त्याहून कांहीं निराळें केलें असतें असें मला वाटत नाहीं. त्याच्या मध्यस्थीमुळें आमचीं तेथें पंधरा मिनिटें जास्तच मोडलीं. कारण लहानसहान गोष्टीदेखील जणुं आपण एखादें गुह्य सांगतों आहों अशा थाटांत अगदीं हलक्या आवाजांत तो सांगत होता. त्यामुळें त्याचें बोलणें लोकांना ऐकूं जात नव्हतें आणि खूप विस्तारानें आणि गुळगुळीतपणें बोलण्याच्या त्याच्या पद्धती-मुळें तें त्यांना समजत नव्हतें. त्याची आम्हांला मदत होण्याऐवजीं तो उगीच घोळ मात्र वाढवीत होता. पण त्या बापड्याला दुखवूं नये म्हणून आम्ही त्याची ती मदत (!) घेत होतों.

उकड्या तांदुळाचा भात भुरकून बाहेर पडल्यावर, आम्हींच जेव्हा त्याचेहि पैसे दिले तेव्हां तो अगदीं अस्वस्थ झाला. त्या पैशांची परतफेड करण्याची तो फारच धडपड करूं लागला. अखेर त्याच्या समाधानाकरितां आम्हीं पुढें कुठें तरी थंड पेय घेतलें आणि त्याला पैसे देण्याची संधि दिली. तें साधें पेय घेतांनादेखील त्यानें इतका घोळ घातला कीं आम्हांला स्टँडवर परतायला उशीर झाला.

शेवटीं त्रिवेंद्रम्‌मध्यें आम्हीं कुठें उतरावें ह्याबद्दल तो आम्हांला सूचना देऊं लागला. त्रिवेंद्रम् दाखविण्याचीं आश्वासनें देऊं लागला. पण त्रिवेंद्रम्‌ला पोहोंचल्यावर आम्हीं त्याला कौशल्यानें टाळलें.

त्याचें तें चोरटें, हलक्या आवाजांतलें बोलणें व ती घोळ घालण्याची पद्धत ह्यांची मला गंमत वाटली. हलक्या आवाजांत बोलणें म्हणजे लीनपणा आणि

गुळमुळीतपणें बोलणें म्हणजे चांगुलपणा असा त्याचा समज झाला असावा. त्याच्या ठिकाणचा आत्मविश्वासाचा अभाव कदाचित् त्याच्या अविवाहितपणामुळें निर्माण झाला असावा.

लहान व्यक्तीनें संतासारखें वागण्याचा प्रयत्न केला म्हणजे हें असें होतें !

वाटेंत आम्हांला अनेक लहानमोठीं गांवें लागलीं. ज्यांचीं नांवेंदेखील आपल्याला माहीत नाहींत अशा ठिकाणीं एवढ्या मोठ्या प्रमाणावर जीवन जगलें जावें याचें आश्चर्य खरोखरच वाटूं नये, पण वाटतें खरें.

बॅक वॉटर्सशीं आणि समुद्राशीं आमची वारंवार भेट झाली. त्रिवेंद्रमूच्या जवळ आम्ही आलों तसें मात्र समुद्राचें दर्शन चुकलें. नुसत्या माडांच्याऐवजीं इतर झाडेंझुडपें दिसूं लागलीं. त्यामुळें जरा बरें वाटलें आणि अखेर विस्तीर्ण राजरस्त्यावरून आम्हीं त्रिवेंद्रम्‌मध्यें प्रवेश केला. तो मोठा डांबरी रस्ता, दुतर्फा असलेल्या आधुनिक पद्धतीच्या इमारती, रस्त्यांतून धावणाऱ्या मोटारी आणि विशेष म्हणजे दोनमजली बसगाड्या ह्यांमुळें माझें त्रिवेंद्रम्‌विषयींचें मत सुरुवातीला तरी चांगलें झालें.

रेल्वे स्टेशनजवळ आमची बस थांबली. सामान उतरणाऱ्या हमालांशीं ठराविक हुज्जत घालावी लागली. आम्ही परके असें पाहून त्यांनीं आम्हाला घेरलें आणि दादागिरी सुरू केली. भाषेच्या अडचणीमुळें आणि मुख्यतः मनाला आलेल्या थकव्यामुळें आम्हांला दमांत घेणें जमेना आणि आमची पीछेहाटच झाली. अखेर एका अतिशय किडकिडीत हमालानें आमचें सगळें सामान डोक्यावर घेतलें आणि तो आतां कोसळतो कीं मग कोसळतो अशी चिंता करीत आम्ही हॉटेलांत जाऊन पोहोंचलों.

चहा घेऊन आम्ही बाहेर पडलों. अनेक तास मोटारींत बसल्यामुळें अंग कसें चेंचून आणि आखडून गेलें होतें. शेवटीं शेवटीं तर कुठचाहि कोन साधून बसलें तरी अंग हुळहुळत होतें. त्यामुळें हातपाय जरा मोकळे करावेसें वाटत होतें. पहिल्यानें अर्थातच आम्ही स्टेशनांत गेलों. चौकशी करून तेथल्या कारकुनाला भंडावून सोडलें आणि मग स्टेशन हें केंद्र ठरवून आमच्या हालचालींना सुरुवात केली.

कुठेंहि गेल्यावर तेथल्या रेल्वे स्टेशनवर आमचा सगळा भरंवसा असायचा. तें म्हणजे आम्हांला आमच्या बालेकिल्ल्यासारखें वाटायचें. तेथून आम्ही कुठेंहि जायचों आणि तेथें परतायचें असा आमचा विचार असायचा. आम्हीं हॉटेलें-

देखील रेल्वे स्टेशनच्या जवळचींच निवडायचों. ह्याचें कारण असें कीं, रेल्वे स्टेशन सगळ्याना माहीत असतें. तेथें जायला यायला वाहनांची चांगली सोय असते. इंग्लिश जाणणारीं माणसें तेथें हटकून असतात. वर्तमानपत्रें, पुस्तकें वगैरे मिळूं शकतात. त्यांतल्या त्यांत स्वच्छ व विशिष्ट दर्जाचें जेवण मिळायची खात्री असते!

आणि मुख्य म्हणजे दूर आलों असलों तरी आपण त्या दोन चकाकत्या रुळांनीं आपल्या घराशीं जोडलेलों आहोंत ही सुखकारक जाणीव तेथें होत असते!

त्रिवेंद्रम् हें हिंदुस्थानांतलें सर्वांत दक्षिणेंतलें स्टेशन. त्याच्यापुढें दक्षिणेकडे रेल्वे जात नाहीं. ह्या बहुमानाला साजेशी त्या स्टेशनची इमारत आहे व तेथली व्यवस्थादेखील आहे.

आम्हीं दुसऱ्या दिवशींच्या केप कॉमोरीनच्या बसचीं तिकिटें काढलीं आणि मग पोस्टात एक तार करायला गेलों. माझ्याजवळ पेन्सिल नव्हती म्हणून तेथल्या कारकुनाजवळ मागितली.

त्या बेट्यानें सरळ उद्धटपणानें देत नाहीं म्हणून सांगितलें.

तेव्हां मीं जरा आवाज चढवून म्हटलें, "मला वाटतें कीं, पोस्ट ऑफिसांत लोकाकरतां स्टेशनरी ठेवली पाहिजे असा नियम आहे आणि सरकारी नोकरांनीं लोकांशीं अदबीनें वागावें असाहि नियम आहे."

माझें तें बोलणें ऐकून तो चमकला. त्यानें आपल्या शेजाऱ्याकडे एकवार पाहिलें आणि मग मुकाट्यानें त्यानें मला पेन्सिल दिली.

हे मल्याळी लोक कानडी लोकांसारखे सालस दिसले नाहींत. जरा मग्रूर व फटकून वागणारेच आढळले. तेव्हां त्यांच्याशीं चढेलपणानें वागणें आम्हांलाहि भाग पडलें.

एकंदरींत हा अनुभव आपल्या देशांत सर्वत्रच येतो. सभ्यपणानें व आर्जवीपणानें वागूं लागलें म्हणजे लोक तें दुर्बळपणाचें लक्षण समजतात. मागें मागें राहिलें तर तो बावळटपणा ठरतो. पण मग्रुरी केली कीं सगळे तुमच्याशीं आदरानें वागूं लागतात. हें कांहीं सुसंस्कृतपणाचें खात्रीनें लक्षण नव्हे.

मला वाटतें कीं, परकी अंमलामुळें आपली अशी वृत्ति झाली असावी. जो आपल्याला ठोकरतो तो राज्यकर्ता, त्याला मान द्यायचा, असे संस्कार आपल्या मनावर झाले असावे. जो आपला अपमान करतो त्याचे बूट चाटायची संवय लागली असावी आणि मग जो मऊपणानें वागतो तो आपल्यासारखाच दुबळा

असावा असा निष्कर्ष नकळत निघाला असावा.

तें कांहींहि असो. पण आतां हा प्रकार बदलला पाहिजे. ही रीत स्वतंत्र देशाच्या इभ्रतीला शोभण्यासारखी नाहीं.

पोस्टांत जातांना व येतांना आम्ही पावसांत भिजतच होतों. पण आम्हांला त्याचें कांहीं विशेष वाटलें नाहीं. प्रवासांत आम्हांला असल्या गोष्टींची संवय झाली होती. सतत दगदग होणें, झोंप न मिळणें, घाईनें सामान आवरून स्टेशनवर पळणें, वाटेल तें खायला लागणें, किती तरी वेळ पाणीच न मिळणें, स्नान व दाढी न करतां घामानें चिकचिकलेले कपडे बराच वेळ अंगावर राहूं देणें, उन्हांत तापणें, थंडींत कुडकुडणें, अंधारांत वाट चुकणें, हें सगळें आमच्या अंगवळणीं पडलें होतें. प्रवासांत मिळणारें हें शिक्षण फार महत्त्वाचें असतें.

थकून भागून आम्ही हॉटेलवर परतलों आणि जेवून झांपलों.

## : १४ : कन्याकुमारी

सकाळीं आम्हीं एका उडुपी हॉटेलांत न्याहारी केली. आम्ही नेहमींप्रमाणें हट्टीपणानें चहा मागवला आणि नेहमींप्रमाणेंच तो चहा कॉफीसारखा लागला. त्यामुळें आमची वृत्ति देवालयांत जायला अनुकूल अशी झाली आणि आम्ही पद्मनाभस्वामीचें देवालय पहायला निघालों.

वाटेंत ठिकठिकाणीं R. S. P. असें मोठाल्या लाल अक्षरांत लिहिलेलें आम्हांला आढळलें. तेव्हां आम्हीं एका माणसाला विचारलें, "हीं कसलीं आद्याक्षरें आहेत?"

"रॅडिकल सोशॅलिस्ट पार्टी ह्या नांवाचीं." तो म्हणाला.

"हा पक्ष येथें बराच लोकप्रिय आहे का?" आम्हीं विचारलें.

तो गंभीरपणें म्हणाला, "तो पक्ष लोकप्रिय असता तर त्याचें नांव असें सगळीकडे चिताडण्याची आवश्यकता भासली नसती!"

आम्हीं हसलों. पण तो मात्र हसला नाहीं. तसाच गंभीरपणें चालत पुढें गेला.

पद्मनाभस्वामीच्या देवालयाच्या पुढचें भव्य प्रवेशद्वार नवथर बांधल्यासारखें आम्हाला वाटलें आणि चर्चच्या बांधणीचा त्यावर परिणाम झाल्यासारखा दिसला. प्रवेशद्वारांतून आंत गेल्यावर भव्य गोपूर दिसलें. पण भोंवतीं बांधलेल्या लाकडी परातींवर गोणपाटें बांधून तें झांकून टाकण्यांत आलें होतें. त्यामुळें आम्ही जरा खट्टूच झालों.

देवालयाकडे जाणाऱ्या रस्त्याच्या बाजूला दोन मोठाले बांधून काढलेले तलाव आहेत. त्यांच्याभोंवतीं असलेल्या अरुंद छपरांवर छोटे छोटे अनेक नंदी कोरलेले आहेत.

देवळाच्या समोरच मोठाल्या राक्षसांच्या आकृती तयार करण्याचें काम चाललें होतें. माणसाच्या दुप्पट आकाराच्या त्या असाव्या. त्यांतल्या कांहींवर कपडे, मुखवटे वगैरे चढवून झाले होते. त्यांचे उग्र, विकट चेहरे व त्यांचे क्रूर, मोठाले लोंबते डोळे पाहून ते राक्षस आहेत अशी आमची खात्री पटली. एक दोन राक्षस तयार व्हायचे होते. त्यामुळें त्यांचीं लाकडाचीं हाडें व बांबूच्या बरगड्या आम्हांला पहातां आल्या. त्यांचीं मुंडकीं तयार झालेलीं नसल्यामुळें त्यांचा

शिरच्छेद झाल्यासारखा वाटत होता. तेथल्या एकंदर प्रकारावरून यात्रेची तयारी चालली असल्याचा कयास आम्हीं बांधला. चौकशी करतां तो बरोबर ठरला !

ह्या दक्षिणेकडच्या लोकांच्या जीवनांत देवालयें व यात्रा यांना एकंदरींत फार महत्त्व दिसतें. ह्या गोष्टींची त्यांच्या जीवनांत गुंफणच होऊन गेली आहे. दर वर्षी हे लोक असे मोठाले राक्षस मेहनत घेऊन तयार करतात आणि मग आपल्या देवतांच्या हस्तें मोठ्या उत्सवानें त्यांचें निर्दाळण करतात. कोण असतील हे राक्षस ? त्यांच्या विनाशाचें आमच्या पूर्वजांना एवढें महत्त्व कां वाटलें ? आणि त्यांच्या विनाशाची स्मृति अशी शतकानुशतकें आमच्या मनांत कोरलेली कां रहावी ? आजच्या आमच्या जीवनाचा अर्थ लावतांना-देखील आम्हीं त्या राक्षसांचा प्रतीकात्मक उपयोग कां करावा ? हे प्रश्न मी पुन्हा पुन्हा स्वतःला विचारतों. ते लोक मात्र स्वतःला हा प्रश्न विचारीत नव्हते. लहान मुलांना भातुकली जितकी खरी वाटते, तितकेंच त्यांना त्या राक्षसांचें अस्तित्व खरें वाटत होतें. फार फार पूर्वी असे अगडबंब राक्षस होतेच आणि गरुडावर अगर नंदीवर बसून त्यांच्या देवांनीं त्यांचें निर्दाळणहि केलें होतेंच. आणि नाटकाच्या रूपानें ते ती गोष्ट पुन्हा पुन्हा स्वतःला पटवून देत होते, स्वतःच्या मनावर बिंबवीत होते. कशाकरितां ? नुसत्या उत्सवाच्या हौसेनें ? कीं मानवी मनांतल्या आणखी कांहीं खोल प्रेरणांमुळें ?

देवळाच्या आम्ही अधिक जवळ गेलों, तेव्हां तेथें आम्हांला शिपायांची एक चौकी दिसली. ती पाहून मीं ओळखलें कीं, संस्थानांतल्या राजघराण्याचें हें देवस्थान असावें. देवाला महत्त्व चढायलासुद्धां धनिकांनीं आणि बलिष्ठांनीं त्याची पूजा करावी लागते ! ज्याच्या त्याच्या घरांतल्या ताटलींतल्या देवांत एखादा विष्णूचा अवतार असतोच. पण पद्मनाभस्वामी होण्याचें कांहीं त्याच्या नशिबांत नसतें !

देवाच्या दारांत शिपाई पाहिले कीं, मला चीड येते. आणि मीं देवालयांत प्रवेश करण्याचा प्रयत्न केला तेव्हां बंदुकवाल्या शिपायानें मला अडवल्यावर ती चीड कांहीं कमी झाली नाहीं. "साहेब आतां भेटायचे नाहींत," असें एखाद्या पट्टेवाल्यानें सांगावें, तसें त्या बंदुकवाल्या शिपायानें सांगितलें "सकाळीं देवाचें दर्शन होणार नाहीं. संध्याकाळीं या."

इतक्या उर्मट देवाच्या दर्शनाला जाऊंच नये असा विचार एकदम मनांत आला. पण मीं तो दाबला.

तेवढ्यांत त्या शिपायानें आणखीहि एक अट सांगितली, "नुसत्या धोतरा-निशीं आलांत तरच देवळांत प्रवेश मिळेल."

मला धोतर नीटसें नेसतां येत नसलें तरी धोतर नेसायला माझी आडकाठी नव्हती. ती अट मला अनावश्यक वाटली इतकेंच. पण देवाच्या दारांतले ते शिपाई पाहून मला आलेली चीड आज कमी होईना. त्यांत ज्यांना स्वतःचें राज्य रक्षितां आलें नाहीं अशांनीं शिपायांकरवीं देवाचें रक्षण करण्याचा आव आणावा हें अधिकच चीड आणणारें होतें!

आम्ही परत फिरलों आणि देऊळ पहातां येत नाहीं तेव्हां प्राणिसंग्रहालय पहायचें असें ठरविलें. बस स्टँडवर आम्ही गेलों. पण बसच्या पाट्या मल्याळी भाषेंत लिहिलेल्या असल्याकारणानें आम्हांला कांहींच अर्थबोध होईना. त्यामुळें चौकशी करावी लागली.

बसकरितां लोकांनीं रांगेंत उभें रहायचें ही पद्धत, मला वाटतें, मुंबईशिवाय इतरत्र कुठेंच नाहीं. बस आली कीं सगळ्यांनीं आंत घुसायचें. माणसें कोंबणें अशक्य झालें कीं बस चालू करायची अशी सर्वत्र रीत दिसली. त्रिवेंद्रम् ह्या गोष्टीला अपवादभूत नव्हतें. शिवाय बाहेरून जरी त्रिवेंद्रम्च्या बसगाड्या ऐटबाज दिसल्या, तरी आंत बसायची सोय कांहीं चांगली नव्हती. मात्र ह्या बसगाड्यांचें एक वैशिष्ट्य असें कीं त्यांत बायकांकरितां निराळें कंपार्टमेंट होतें.

मुंबईत फुकटदेखील आम्ही राणीच्या बागेंत प्रवेश करायला तयार नसतो. पण त्रिवेंद्रम्ला मात्र चौकशा करून व बसमध्यें स्वतःचे हाल करून घेऊन आम्ही प्राणिसंग्रहालय पहायला गेलों. तेंच कशाला, वेरूळ व अजंटाला जाऊन मीं तेथील लेणीं पाहिलीं आहेत. पण मुंबईजवळच्या घारापुरीला मात्र मीं गेलेलों नाहीं.

माणसाच्या ह्या वृत्तीबद्दल परवांच मी कुठेंसा एक चुटका वाचला. पॅरिस-मधल्या एका फ्रेंच माणसाला एका अमेरिकन प्रवाशानें विचारलें, "इथल्या पार्लमेंटची इमारत तुम्हीं पाहिली आहे का?"

तेव्हां तो मनुष्य रागानें म्हणाला, "No. Why should I? I am a Parisian; not a damned tourist."

प्राणिसंग्रहालयांत अनेक पक्षी होते. त्यांतल्या कांहींचें सौंदर्य तर मनाला भुरळ पाडणारें होतें. मोठाल्या अनेकरंगी पोपटांची एक जोडी तर मला फारच आवडली. एकमेकांच्या चोंचींत चोंची खुपसून, मानेला चावून आणि पंख

फडफडावून जोडीचा शृंगार चालला होता. त्यांच्या जबरदस्त धारदार चोंची पाहून तो शृंगार त्यांना कितपत सुखदायक होत असावा ह्याची मला शंका वाटूं लागली !

लांब मानांचे करकोचे तेथें विचारपूर्वक एकेक पाऊल टाकीत हिंडत होते आणि पंखांचा खूप फडफडाट करून थोडेंसें उडत होते. बदकें फताकडीं पावलें टाकीत होतीं आणि मोर आपल्या रूपाला विसदृश असा मांजरासारखा आवाज काढीत होते. त्यांच्यांतले पांढरे शुभ्र मोर मला फार मोहक वाटले.

एका रिकाम्या पिंजऱ्यांत, बहुधा आपल्याकडे कोणीं पहावें अशा अपेक्षेनें, कावळे जाऊन बसले होते. त्यांना पाहून कांहीं साहित्यिक स्मृती जागृत झाल्या.

सोनेरी ठिपक्यांच्या कांचनमृगानें मान बांकदारपणें वळवून आमच्याकडे पाहिलं आणि कुंपणावरून उडी मारून त्याला पकडून आणा असें सांगायला आमची सीता बरोबर नव्हती ह्याचें समाधान वाटलें.

सांबराचीं शिंगें ऐटबाज होतीं. पण त्याच्या जनान्यांतल्या स्त्रिया सुंदर होत्या असें म्हणायला मी तयार नव्हतों.

माकडाला नाक खाजवून दाखविणारे लोक नेहमींप्रमाणें तेथें होतेच, आणि माकडांच्यापेक्षां साहजिकच ते अधिक प्रेक्षणीय वाटत होते !

एका लहानशा इमारतींत कांचेच्या घरांत कांहीं ससे होते. ससे पाहिले म्हणजे खेळणीं जिवंत झाल्यासारखें मला वाटतें. पांढऱ्या उंदरांचें एक कुटुंब दुसऱ्या एका घरांत, कांचेला नाकें लावीत होतें. इतर कांचांच्या घरांत अनेक प्रकारचे साप होते. त्यांतला चोंचीसारखें तोंड असलेला एक हिरवा बारीक साप विशेष दुष्ट दिसत होता. सगळेच साप सुस्तपणें झोंपा काढीत होते. त्यांनीं हालचाल करावी म्हणून आम्हीं कांचेच्या घरावर टिचक्या मारल्या. 'आला देख नकुल' अशी मीं कुसुमाग्रजांच्या भाषेंत त्याला धमकी दिली ! पण तिचा त्यांच्यावर कांहींच परिणाम झाला नाहीं. त्यांची भाषा बहुधा मल्याळी असावी ! तेथल्या एका शिपायानें त्यांना काडीनें डिंवचलें, तेव्हां मात्र ते जागे होऊन फुत्कारूं लागले.

त्या सापांना लांबलचक लॅटिन नांवें दिलेलीं होतीं. तीं वाचून 'प्राणिशास्त्र म्हणजे प्राण्यांना लॅटिनमध्यें दिलेल्या शिव्या' ही व्याख्या मला पटली.

तेथल्या त्या शिपायाला बक्षिशी न देतां आम्ही बाहेर पडलों, तेव्हां तो त्या डिंवचलेल्या सापासारखाच फुत्कारला असावा !

दुसऱ्या एका छोट्या इमारतींत सुंदर चित्रें होतीं. जावा आणि बाली ह्या प्रदेशांतील चित्रें मला विशेष आवडलीं. त्या प्रदेशांतील हिंदु संस्कृति त्या चित्रांतूनहि व्यक्त होत होती.

आणखी एका इमारतींत वस्तुसंग्रहालय आहे. 'Best museum in the South' असें त्याचें एकानें आमच्याजवळ वर्णन केलें होतें. पण तें कांहीं आम्हांला यथातथ्य वाटलें नाहीं. तेथें प्राण्यांचे सांगाडे, निरनिराळ्या प्रकारचे दगड वगैरे ठराविक वस्तू होत्याच; पण मुख्यतः तेथल्या धातूच्या व पाषाणाच्या मूर्तींच प्रेक्षणीय होत्या.

मला आवडणाऱ्या नटराजाच्या अनेक मूर्ती तेथें होत्या. ह्या नटराजानें मला भुरळच घातली आहे! त्याच्या बांधेसूद मूर्तींतून व्यक्त होणारें पौरुष, स्थिरतेंतूनहि व्यक्त होणारें त्याचें चापल्य, एका पायावर लीलेनें तोल सावरून शत्रूच्या छातीवर नाचण्याकरितां उचललेला तो त्याचा दुसरा पाय, त्याचे लांबसडक, वळवळत्या सर्पांची आठवण करून देणारे चार बाहू, त्याचा छिनलेला रेखीव चेहरा आणि त्यावर व्यक्त होणारा पाशवी उन्माद आणि पराक्रमाच्या ह्या कांहींशा अमानुष प्रतीकाला वेढणारें तें दैवी वलय!—बुद्धाच्या थुलथुलीत ध्यानस्थ मूर्तीपेक्षां मला ही नटराजाची मूर्तीच अधिक आवडते. ब्रह्मा, विष्णु व महेश ह्यांची तेथें असलेली त्रिमूर्तिदेखील मला आवडली. परमेश्वराच्या रूपाच्या चेहऱ्यावर दाखविलेले वेगवेगळे भाव प्रेक्षणीय होते. अर्धनारीनटेश्वराची मूर्ति मात्र हिडीस वाटली. पण तरी मानवी अनुभवांचा एक भाग तिच्यांतून व्यक्त होत आहे हें कबूल करावें लागलें.

जुन्या काळचे सोन्याचे भले मोठे दागिनेदेखील तेथें ठेवलेले होते. त्यावरचें कांहीं नक्षीकाम मोठें सुंदर होतें. पण दागिने घालणें ह्या गोष्टीला weight-lifting च्या व्यायामाचें स्वरूप यावें हें कांहीं मला मान्य होऊं शकलें नाहीं. जड कर्णभूषणें घालून फाटलेले इथल्या बायकांचे कान मीं पाहिले होते. तेव्हां त्या वस्तुसंग्रहालयांतले दागिने घालणाऱ्या बायकांच्या मानांना घट्टे पडत असतील आणि हातांचीं हाडें वांकत असतील ह्याची मला खात्री पटली.

'Ours to protect, Ours to enjoy' हें त्या वस्तुसंग्रहालयांतलें ब्रीदवाक्य मला पसंत पडलें. पण येणाऱ्या लोकांचें वजन करायची सोयहि तेथें दारांतच असावी हें कांहीं मला पसंत पडलें नाहीं. ही विसंगति मला वस्तुसंग्रहालयांतल्या वातावरणाला उणेपणा आणणारी वाटली. आमच्या वजनांत कांहीं अधिकउणें

झालें आहे कीं काय तें आम्हीं तेथें पाहिलें. पण वजनांत कांहींच फेरफार झाला नव्हता. प्रवासाच्या दगदगीनें आपण बारीक झालों आहोंत हा आमचा गोड गैरसमज त्यामुळें विरघळून गेला आणि आम्ही जरा हिरमुसले झालों.

वस्तुसंग्रहालयांतून बाहेर पडून आम्ही राजवाड्याच्या दिशेनें चालत गेलों. राजवाडा एका छोट्या टेकडीवर आहे. त्याची बांधणी पाश्चात्य पद्धतीची दिसत होती. राजवाड्यांत जाण्यास परवानगी मिळत नसल्याकारणानें आम्हांला रस्त्यावरूनच त्याचें दर्शन घेऊन परतावें लागलें.

राजवाड्याच्या समोरच दुसऱ्या एका टेकडीवर ऑब्झर्वेटरी आहे.

हॉटेलकडे परततांना आम्हीं टांगा केला. येथें झटका हा प्रकार नाहीं. बडोद्याला असतात तसले टांगे येथें मिळतात. मात्र हे टांगे अधिक चांगले असतात. टांगेवाल्यानें आम्हांला आडरस्त्यानें नेलें. आणि मग ध्यानांत आलें कीं, त्रिवेंद्रम्‌चा आधुनिकपणा राजरस्त्यापुरताच मर्यादित आहे. ह्या मुखवट्याच्या मागें कच्च्या सडकांचें, गल्लीबोळांचें, न बांधलेल्या गटारांचें आणि जुन्या अंधाऱ्या घरांचें खरेंखुरें त्रिवेंद्रम् आहे!

दुपारीं आम्ही बसनें कन्याकुमारीला निघालों. ही 'एक्स्प्रेस बस' देखील चांगली होती. पण आम्हांला उटीहून कोईमतुरला नेणाऱ्या बसची सर ह्या बसला नव्हती.

माझी आपली अशी कल्पना होती कीं, हिंदुस्थानच्या या दक्षिण टोकाला लोकवस्ती फारशी नसेल. तो भाग एकंदर मागासलेलाच असेल. तेथें बराच दलदलीचा प्रदेश असेल आणि एकंदर भाग बराच चिंचोळा असेल. पण ह्यांतलें कांहींच खरें ठरलें नाहीं. आमच्या तीन चार तासांच्या प्रवासांत आम्हांला शेवटपर्यंत चांगली दाट वस्ती दिसत होती. मधून मधून मोठमोठीं गावें लागत होतीं. तेथें विजेचा पुरवठा होता. आणि आम्हीं नागरकॉईलच्या ज्या एका साध्याशा हॉटेलांत चहा घेतला तेथें तर रेफ्रिजरेटर होता. तेथें दलदल कोठेंच नव्हती. आणि सर्वत्र लागवड चाललेली दिसत होती. भूगोल शिकतांना हिंदुस्थानच्या नकाशांत मीं तो भाग अगदीं चिंचोळा काढीत असें! त्यामुळें माझी अशी कल्पना झाली होती कीं, एका अरुंद पट्टीवरून दोन्ही बाजूंचा समुद्र पहात आम्ही कांहीं मैल तरी प्रवास करूं! पण ती अपेक्षा पुरी झाली नाहीं. कारण तो भाग चिंचोळा असला तरी तो हिंदुस्थानच्या अवाढव्य विस्ताराच्या मानानें! यामुळें अगदीं कन्याकुमारीला पोहोंचेपर्यंत आम्हांला समुद्राचें दर्शन झालें नाहीं.

वाटेंत विक्रीच्या कौशल्याचा एक नवा प्रकार दिसला. मोटार थांबली कीं लहान पोरें हातांतलीं शहाळीं फोडण्याच्या अगदीं तयारीनें सुरी उगारून उभीं रहात आणि एखाद्या उतारूची मान नुसती हलली तरी ताबडतोब शहाळें फोडून पुढें करीत. त्यामुळें उतारूला शहाळें खाण्याची जबाबदारी आपल्यावर पडल्यासारखें वाटे व तो बापडा तें घेई. आमच्या मानादेखील हलल्या आणि ताबडतोब एका पोरानें दोन शहाळीं फोडून पुढें केलीं. त्याची लबाडी आमच्या ध्यानांत आली. पण आम्हांला शहाळीं खावींशीं वाटत असल्याकारणानें आम्हीं तीं घेतलीं. शहाळीं खाऊन झाल्यावर आम्हीं त्याला चार आणे दिले. ते ना त्यानें आपल्यावर विलक्षण अन्याय झाला आहे असा चेहरा केला आणि तो आमच्याशीं भांडूं लागला. त्याची कटकट मिटविण्याकरितां आम्हीं त्याला आणखी दोन आणे दिले आणि तेवढ्यांत मोटार सुरू झाली. त्याबरोबर जणू आपलें सर्वस्व लुबाडलें गेलें अशा आवाजांत तो पोरटा किंचाळूं लागला. सगळे लोक आमच्याकडे पाहूं लागले. ड्रायव्हरनें मोटर थांबवली. आम्हांलादेखील कांहीं तरी अपराध केल्यासारखें वाटून आम्हीं त्याला दोन आणे जास्त दिले. तरी तो धाय मोकलून ओरडतच होता. ड्रायव्हरनें त्याला आम्हीं किती पैसे दिले तें विचारलें. आणि त्यानें जेव्हां आठ आणे मिळाले असें सांगितलें तेव्हां ड्रायव्हर हसला आणि त्यानें सरळ मोटार चालू केली. मग आम्हांला कळलें कीं, ह्या शहाळ्यांची किंमत फक्त एक एक आणाच होती !

कन्याकुमारीपर्यंतचा रस्ता चांगला आहे. आणि करवतीनें कापल्यासारखे डोंगर सर्व रस्ताभर सोबत करतात. मोटार अशी बराच वेळ चालली आणि मग एकदम थांबली. आम्हीं प्रश्नार्थक मुद्रेनें एका सहप्रवाशाकडे पाहिलें तेव्हां तो म्हणाला, "प्रवास संपला."

आम्हीं समोर पाहिलें तों अवचितपणें रस्ता संपला होता. पुढें छोटासा वाळूचा किनारा होता आणि त्याच्याहि पुढें समुद्र पसरला होता. क्षितिजापर्यंत पसरला होता. त्याच्या पलीकडे ओसंडला होता. हिंदुस्थान देश संपला होता, आशिया खंड संपलें होतें. सागराचें साम्राज्य सुरू झालें होतें.

अनपेक्षितपणें दिसलेल्या त्या दृश्यानें मी बावरून गेलों. त्या दृश्याचें स्वागत कसें करावें तें माझ्या मनाला समजेना.

तेवढ्यांत मोटार हलली आणि किनाऱ्याकिनाऱ्यानें पुढें जाऊन 'केप हॉटेल'च्या विस्तीर्ण आवारांत जाऊन थांबली. केप हॉटेलमध्यें जाऊन आम्हीं

एक खोली घेतली. तोंड वगैरे धुतलें. चहा घेतला आणि मग पळत पळतच बाहेर पडलों. संध्याकाळ झाली होती आणि सूर्य मावळायला जो कांहीं तास-भर शिल्लक होता तेवढ्या वेळांत तें सगळें दृश्य आम्हांला पोट भरून पाहून घ्यायचें होतें. माझें मन भावनाकुल झालें होतें. किती तरी कल्पना मला सुचत होत्या. किती तरी आठवणी येत होत्या. मी हरवलों आहें असें वाटत होतें.

नेहमीं आपल्या भावनांचा तोल सावरणारा मी, असा व्याकुळ कां बरें झालों होतों? थोड्या वेळापूर्वी चुरचुरीत गप्पा मारणाऱ्या माझ्या पोटांत अशी खोल ढवळाढवळ कां बरें झाली होती? असें झालें होतें तरी काय?

तसें पाहिलें तर विशेष कांहींच झालें नव्हतें. माझ्या पायाखालच्या भूमीनें एकदम उतरती होऊन पाण्यांत बुडी घेतली होती. नाहीं म्हणायला जमिनीच्या पुढें जाऊन दोन तीन लहानसे खडक पाण्यांत धिटाईनें उतरले होते. आईचा हात धरून ठेवून मुलांनीं पाण्यांत खेळायला उतरावें तसे ते समुद्रांत उतरले होते. लहानशा लाटा फेसाळत त्यांना वेढीत होत्या आणि किनाऱ्यावर येऊन आदळत होत्या आणि सागराचें हिरवें पाणी अथांगपणें समोर पसरलें होतें. क्षितिजाचें भव्य अर्धवर्तुळ व्यापून राहिलें होतें. निळ्या आकाशाच्या विस्ताराशीं स्पर्धा करीत होतें. आणि क्षितिजापाशीं तें आकाशांत आणि आकाश त्यांत विरघळून गेलें होतें.

अनंत सागराच्या तळहातावर मला कोणी तरी ठेवलें होतें. आणि अनंत आकाश मला निरखून पहात होतें. केव्हांहि त्या हाताची मूट वळली असती, आणि ती पुन्हा उघडल्यावर मी त्या तळव्यावर दिसलों नसतों.

त्या एकलेपणात मीं बराच वेळ काढला. आणि मग मला तितक्याच तीव्र-तेनें जाणीव झाली कीं, मी एकटा नाहीं. माझ्या मागें माझ्या देशाचा प्रचंड विस्तार आहे. आकाशांत बुडालेलीं हिमालयाचीं हिमशिखरें आहेत. भगीरथानें तपःसामर्थ्यानें अवनीतलावर आणलेली आणि आपल्या विस्तीर्ण खोऱ्यांत पिकें डुलत ठेवणारी गंगा आहे. अगस्त्यानें वांकवलेला विंध्याद्रि आहे. रामचंद्राची आणि सीतेची पंचवटी आहे. शबरीचें दंडकारण्य आहे. ज्याच्या उन्नत मस्त-कावरून स्वातंत्र्याचे वारे वाहतात असा माझा सह्याद्रि आहे. अनेक साम्राज्यांचे पाळणे ठरलेलीं कृष्णा व कावेरी यांचीं खोरीं आहेत. माझा देश आहे. माझी हजारों वर्षांची सांस्कृतिक परंपरा आहे.

मला जाणवलें कीं, मी एकटा नाहीं. ह्या अनंत सागराच्या विस्ताराकडे पाहून

मी किती क्षुद्र आहें असें मला वाटण्याचें कारण नाहीं. कारण मी जरी क्षुद्र असलों तरी माझ्यामागें माझ्या देशाचा विस्तार आणि पूर्वजांची परंपरा आहे.

माझ्या भावना इतक्या उचंबळून कां बरें आल्या होत्या? सागरांत बुडालेलें तें भूमीचें टोक आणि पुढें पसरलेला सागराचा विस्तार हें दृश्य मोठें भव्य होतें यांत शंका नाहीं. शिवाय त्या स्थानाशीं अनेक स्मृती व कल्पना निगडित झालेल्या होत्या. तेथें अगदीं टोकाला कन्याकुमारीचें देवालय होतें आणि दूर तिकडे हिमालयांत वास्तव्य करणाऱ्या कैलासनाथानें आपलें पाणिग्रहण करावें म्हणून कन्याकुमारी आज हजारों वर्षें तेथें तपश्चर्या करीत होती. तीन समुद्रांच्या संगमानें आधींच पवित्र झालेलें तें स्थान अधिक पुनीत करीत होती. पाण्यानें वेढलेल्या तेथल्या एका खडकावर बसून विवेकानंद ध्यानस्थ राहिले होते आणि तेथेंच त्यांनीं आपल्या जीवनाचें फूल मातृभूमीच्या चरणीं अर्पण केलें असावें. तेथें एक जवळ जवळ पाण्यांत बुडालेला आसनासारखा दगड होता. समुद्र आपल्या लाटांचे हात त्यावरून पुन्हा पुन्हा फिरवून तो साफ करीत होता. त्या दगडाच्या आसनावर बसूनच बहुधा अगस्त्यानें सागराचें हृदय कंपित करणारा पवित्र गायत्री मंत्राचा घोष केला असावा आणि तीन आचमनें करून सगळा समुद्र पिऊन टाकला असावा. पण हीं सगळीं कारणें पुरेशीं नव्हतीं. मला वाटतें कीं, ह्या भारताच्या दक्षिण टोकापर्यंत पसरत जायचें ही माझ्या पूर्वजांची हजारों वर्षांची महत्त्वाकांक्षा होती. अनेक संकटांशीं टकरा देऊन आणि अनेक युद्धें करून त्यांनीं ती महत्त्वाकांक्षा पुरी केली होती. त्या महत्त्वाकांक्षेची स्मृति खोल कुठें तरी माझ्या हृदयांत दडलेली असावी. हें दक्षिण टोंक गांठल्यावर ती स्मृति डिंवचली गेली असावी. माझ्या पूर्वजांची महत्त्वाकांक्षा पुरी केल्याचा आनंद मला मिळाला असावा.

माझ्या हृदयांत अशी खोल कालवाकालव होत होती, आणि मी निश्चलपणें समुद्राकडे पहात होतों. लाटा कुतूहलानें माना उंचावून माझ्या देशाकडे पहात पहात येत होत्या आणि त्याच्या पायाशीं लोटांगण घेत होत्या. पहातां पहातां दूर अंतरावर एक बेट वर आलें. त्यावर सावरकरांची किडकिडीत मूर्ति मला दिसूं लागली आणि त्यांची कविता माझ्या मनांत घुमूं लागली,

“ ने मजसी ने परत मातृभूमीला
सागरा प्राण तळमळला ......”

आपल्या मातृभूमीकरितां ज्यांनीं अनेक हालअपेष्टा सहन केल्या, ज्यांनीं

आपलें जीवन कणाकणांनीं आणि मातीच्या मोलानें वेंचलें, त्या सर्वांच्या स्मृतीनें माझा कंठ दाटून आला. मदनलाल धिंग्राची आटवण झाली, बाबू गेनूची आटवण झाली......माणूस आपल्या देशावर इतकें उत्कट प्रेम कसें करू शकतो, तें मला त्या वेळीं समजलें. कारण त्या क्षणीं मीदेखील माझ्या देशावर फार उत्कट प्रेम करीत होतों. एकांड्या वृत्तीचा मी, माझ्या देशाशीं आणि माझ्या पूर्वजांशीं जोडला जात होतों.

मला एकदम वाटलें कीं, आपण आपल्या देशाला प्रणाम करावा. आपली क्षुद्रता त्याच्या पायांवर वहावी. पण गंमत पहा, जनावेगळे असलें म्हणजे चांगलें-देखील वागायची माणसाला लाज वाटते. लोक मला हसतील, प्रधान मला हसेल, असें मला वाटलें. पण अशा लाजेनें आपली अशी मनापासूनची इच्छा अपुरी ठेवावी हें मला मूर्खपणाचें वाटलें. म्हणून मीं प्रधानला माझी इच्छा सांगितली. त्याच्याहि मनांत तसलेच विचार येत असावेत. कारण त्याला माझी कल्पना पटली. मग आम्ही दोघांनीं बूट काढले आणि शक्य तितकें दक्षिणेला जाऊन आणि उत्तरेकडे पाहून आम्हीं वाढत्या अंधारांत आमच्या मातृभूमीला मनोभावें साष्टांग प्रणिपात केला.

किती हलकें हलकें आणि मोकळें वाटलें मला तसें केल्यावर ! तेथें आम्हीं मावळत्या सूर्याचें दर्शन घेतलें. कन्याकुमारीला सूर्य समुद्रांतून उगवतो आणि समुद्रात मावळतो. तो सूर्योदय आणि सूर्यास्त पहाण्यांत कांहीं विशेष आहे असें मानतात. समुद्रांत होणारा सूर्यास्त मीं अनेक वेळां पाहिला आहे. त्याहून केप कामोरिनचा सूर्यास्त कांहीं वेगळा असेल असें मला वाटत नव्हतें, आणि तसा तो नव्हताहि. पण अनेक लोक वाळूच्या ढिगाऱ्यांवर चढून सूर्यास्त पहायला उभे होते. म्हणून आम्हींदेखील एका वाळूच्या ढिगाऱ्यांवर चढून उभे राहिलों. आकाशांत पश्चिमेला ढगांचे थरांवर थर चढले होते. आणि त्यामुळें इतरांप्रमाणेंच सूर्यास्त दिसेल कीं नाहीं ह्याची आम्ही काळजी करूं लागलों. पण आमचें नशीब शिकंदर होतें. अगदीं खालीं उतरल्यावर ढगांच्या फटींतून नारिंगी सूर्यबिंबाचें आम्हाला दर्शन झालें. त्याच्या भोंवतालचे ढगदेखील नारिंगी रंगानें माखून गेले होते. ढगांच्या त्या गर्दीतून वाट काढीत सूर्यबिंब क्षितिजाच्या कडेवर टेकलें. तेथें तें एकदम मोठें झाल्यासारखें वाटलें आणि मग अगदीं सावकाश पाण्यावर आपली नारिंगी झळाळी टाकीत तें बुडालें.

तेवढ्यांत आमच्या जवळच उभा राहिलेला एक मनुष्य म्हणाला, “ येथें

सूर्य तीनदां मावळतो. तो दोनदां पुन्हा वर येतो आणि खालीं जातो." त्या वेड्या कल्पनेचें आम्हांला हसूं आलें. तरी पण कुतूहल चाळवल्यामुळें आम्हीं सूर्य वर येण्याची वाट पहात उभे राहिलों. पण तेवढा चांगुलपणा सूर्यनारायणानें दाखविला नाहीं !

दाटणाऱ्या अंधारांत आम्हीं केप हॉटेलकडे परतलों. समुद्राचें हिरवें पाणी गर्वाडी रंगाचें झालें होतें. वाळूचे ढीग आतां चमकत नव्हते. साऱ्या वस्तूंवर अंधार फासटला जात होता. साऱ्या आकृती संदिग्ध होत होत्या. लाटांचा अविरत होणारा आवाज अधिकाधिक मोटा होत आहे असें वाटत होतें.

मध्येंच आम्हीं वर पाहिलें, तेव्हां इवलीशी चंद्रकोर तिरप्या ऐटींत आकाशात चढलेली आम्हांला दिसली. ओंठ मुरडून ती हसली. तेवढ्यांत ढगांनीं तिच्याभोंवतीं गर्दी केली. ती बावरली आणि मग आपल्या तेजाचा फेस उधळीत ढगांतून थोडी पुढें पुढें सरकूं लागली.

केप हॉटेलच्या सुखसोयींचा उपभोग घ्यायचा अशा बेतानें आम्ही तेथें परतलों. केप हॉटेलची इमारत प्रशस्त आणि राजेशाही आहे. त्याला सुंदर व्हरांडे व उघड्या गच्च्या आहेत. मोठाल्या खिडक्या असलेल्या प्रशस्त खोल्या आहेत. शरीराचे सर्व प्रकारचे चोचले पुरविणारें फर्निचर आहे. अनेक प्रकारच्या आरामशीर खुर्च्या ! झोंपल्यावर माणूस अर्धा बुडून जाईल असे बिछाने !

हॉटेलभोंवतीं विस्तीर्ण मोकळें आवार आहे आणि त्याच्यापुढें पोहण्याकरितां सुंदर तलाव आहे. हॉटेलच्या दाराशीं तुम्हांला मोटारी नेऊन सोडतात आणि तेथून पुन्हा घेऊन जातात.

इतकें सगळें असूनहि तेथला रहाण्याचा खर्च कमी आहे. जेवण चांगलें मिळतें. पण त्याला पैसेहि जरा जास्त पडतात. त्यामुळें पुष्कळ लोक त्या हॉटेलात रहातात आणि गांवांतल्या खाणावळींत जाऊन जेवतात.

हें हॉटेल नव्हतें तेव्हां प्रवाशांची फार गैरसोय होत असे. इतक्या सुंदर ठिकाणीं चांगलें हॉटेल नसावें ही उणीव एका ॲंग्लो-इंडियन माणसाला जाणवली, आणि त्यामुळें त्रावणकोर सरकारनें हें हॉटेल बांधलें. सरकारच तें चालवतें.

जेवण लवकरच तयार होईल असें बटलरकडून आश्वासन घेऊन आम्हीं खुर्च्यांतून आरामशीरपणें आमचीं अंगें झोकून दिलीं. पण आराम करायची आमची कल्पना कांहीं पार पडली नाहीं. कारण तेथें फारच उकडत होतें. रात्र

झाली होती. पावसाचीं चिन्हें दिसत होतीं—नव्हे, पाऊस थोडा थोडा पडूंहि लागला होता. तरीपण विषुव वृत्ताच्या अगदीं जवळ असलेल्या त्या भागांत फार उकडत होतें. सारखा घाम येत होता. डोकें दुखत होतें. शिवाय केप हॉटेलांत पाण्याची मोठीच गैरसोय होती. तेथें लांबून पाणी आणावें लागत होतें; आणि जें पाणी मिळत होतें, तेंदेखील अपुरें आणि मचूळ होतें. त्यामुळें अडचण पडत होती आणि तोंडाची चव पार बिघडून जात होती. पण मुख्य म्हणजे केप हॉटेलमध्यें विजेचे दिवे नव्हते. पूर्वी केप हॉटेलपुरतीच विजेच्या पुरवठ्याची निराळी सोय होती. पण नंतर विजेचा पुरवठा कन्याकुमारीपर्यंत येऊन पोहोंचला होता आणि त्यांतून केप हॉटेलला वीज मिळावी अशी योजना होती. त्यामुळें केप हॉटेलची वीजपुरवठ्याची स्वतंत्र व्यवस्था बंद करण्यांत आली होती; आणि दुसरीकडची वीज तेथें आणण्याची सोय बरेच दिवस होतच होती ! ही कार्यक्षमता पाहून आम्ही थक्कच झालों !

बटलरनें जेवण चांगलें बनवलें होतें. तो मोठा आदबशीर होता; आणि आम्हीं मागितलेली वस्तू त्याच्याजवळ नसली तर त्याला आपण गुन्हा केल्यासारखें वाटत होतें. थोडी सांबाराची चव असलेलें सूप, चवदार मासे, लुसलुशीत पुडिंग ! आपलें सारें पाककौशल्य त्यानें उपयोगांत आणलें होतें. तें दाखविण्याची त्याला फारशी संधि मिळत नसावी. युरोपियन लोकांच्या शिस्तींत वाढलेला एक मोठा नोकरांचा वर्ग आतां पोरका झाल्यासारखा झाला आहे. त्यांचें तें बड्या साहेबांचें, टापटिपीचें आणि सभ्य रीतीभातीचें जग आतां नष्ट झालें आहे, आणि आमच्या बकाल श्रीमंतांचें जग त्यांना आपलेंसें वाटूं शकत नाहीं.

आमच्याबरोबर एक म्हातारा खिश्चन गृहस्थ जेवायला होता. तो कोणी तरी निवृत्त झालेला बडा अधिकारी होता. त्याचे मुलगे मोटमोठ्या हुद्यावर होते. आणि त्यांच्या कर्तबगारीशिवाय इतर विषयांवर बोलायला तो तयार नव्हता.

रात्रीं घामानें थबथबत अस्वस्थपणें आम्हीं झोप काढली. त्यामुळें सकाळीं उठून सूर्योदय पहाण्याइतका उत्साह दुसऱ्या दिवशीं वाटूं शकला नाहीं. पण म्हणून कांहीं बिघडलें अशांतला भाग नाहीं. कारण जे लोक सकाळीं उठून धावत पळत सूर्योदय पहायला गेले होते ते हिरमुसले होऊन परतले होते. ढगांनीं सूर्याला पार आच्छादून टाकलें होतें.

चहा वगैरे घेऊन आम्ही बाहेर पडलों. कन्याकुमारीचें देऊळ आम्हांला पहायचें होतें. आम्ही बाहेर पडतांच एक भिकाऱ्याचा पोर आमच्या औदार्याची

स्तुति करीत आम्हांला ‘ साहेब ’ म्हणत आमच्यामागें लागला. आणि आमच्याकडून कांहीं प्राप्ति होण्यासारखी नाहीं असें जेव्हां त्याला आढळून आलें तेव्हां आम्हाला शिव्या देत तो पळून गेला.

उकडत इतकें होतें कीं, चार आठ पावलें चालतांच आम्हीं घामानें ओलेचिंब झालों आणि अधिक चालणें अशक्य वाटूं लागलें.

तीन समुद्रांचा जेथें संगम होतो तेथें स्नानाकरितां एक छोटें कुंड बांधलेलें आहे. किनारा आणि समुद्रांतला एक खडक ह्याच्यामध्यें एक अरुंद चिंचोळी जागा निसर्गतःच निर्माण झालेली आहे. तिच्या बाजू थोड्याशा बांधून काढून छोटेंसें कुंड तयार करण्यांत आलें आहे. त्याचें पाणीदेखील फुलें वगैरे टाकून भाविकांनीं खराब केलेलें होतेंच. एक बाई त्या कुंडांत पुन्हा पुन्हा बुचकळ्या मारीत होती. मग किती पुण्य बापडीला गांठीला लावायचें होतें कोण जाणे ! कुंडाजवळच छोटा दगडी मंडप आहे. कुंडांत स्नान करून मगच भाविक लोक कन्याकुमारीच्या दर्शनाला जातात.

कन्याकुमारीच्या देवळाभोंवतीं मोठा उंच तट बांधलेला आहे. आंतलें देऊळ दक्षिणेंतल्या देवळांच्या मानानें लहानसेंच आहे. तेथें दुर्गा, बाणासुराला मारल्यावर कैलासनाथानें आपलें पाणिग्रहण करावें म्हणून, तप करीत बसली आहे. हिमालयांत वास्तव्य करणाऱ्या त्या कैलासनाथाला बहुधा इतक्या दूर चाललेल्या ह्या तपश्चर्येची दाद नसावी. नाहीं तर एव्हांना त्यानें प्रसन्न व्हायला हरकत नव्हती !

हें देऊळ म्हणे परशुरामानें बांधलें. आपला बाप जमदग्नि ह्याच्या आज्ञेवरून परशुरामानें स्वतःची माता रेणुका हिचा शिरच्छेद केला. पित्याच्या आज्ञेचें पालन झालें, पण मातृहत्येचें पातक लागलें. त्याच्या क्षालनार्थ परशुरामानें हें देवालय बांधलें. मूळ देवालय नंतर राजे लोकांनीं वाढवलें आहे. कैलासनाथाच्या प्राप्त्यर्थ तप करणाऱ्या दुर्गेचें देवालय उत्तराभिमुख ठेवणें अधिक उचित झालें असतें. पण तें आहे पूर्वाभिमुख. इकडच्या पद्धतीप्रमाणें ह्या देवालयाला मोठें गोपुर बांधायला कोणी तरी राजांनीं सुरुवात केली होती, पण कुठच्या तरी अडचणीमुळें तें बांधायचें तसेंच राहून गेलें आहे.

देवालयांत प्रवेश करायचा म्हणजे धोतर नेसावें लागतें, असें आम्हांला कळलें, आणि आमच्याजवळ तर धोतर नव्हतें. मग दर वेळेला धोतर नाहीं म्हणून देवालयांत जायचें नाहीं असें करण्यांत अर्थ नव्हता. म्हणून आम्हीं

तेथल्या एका चित्रें विकणाऱ्या माणसाकडे धोतर मागितलें. तो धावत गेला आणि सुदैवानें चांगलें परीटघडीचें धोतर घेऊन आला. तें नेसून मी व प्रधान पाळीपाळीनें देवळांत जाऊन आलों.

देवळांतलें शिल्प ठराविक प्रकारचें होतें. दक्षिणेकडच्या देवळांत तें सर्वत्रच आढळतें. सोंड व सुळे असलेला एक घोड्यासारखा प्राणी आपल्या दोन पायांवर उभा असल्याचें तेथें त्या शिल्पांत दाखवलेलें होतें. दक्षिणेंतल्या देवळां-तील शिल्पात ही आकृति पुन्हा पुन्हा आढळते. हत्ती व घोडा ह्यांच्या अंग वैशिष्ट्याच्या चमत्कारिक मिश्रणातून निर्माण झालेला हा प्राणी कशाचें प्रतीक आहे कोण जाणे! त्याचप्रमाणें त्याचें लिंग खूप लांब दाखविलेलें असतें आणि तें व त्याची सोंड एकमेकांत गुरफटलेलीं असतात. हें सगळेंच मला विचित्र वाटतें.

नेहमींप्रमाणें हनुमान वगैरे इतर देव आत कोरलेले आहेत. आमचे देव एकमेकांच्या देवळात मोठ्या खेळीमेळीनें वावरत असतात. हातांत दीप घेत-लेल्या स्त्रियांच्या आकृती तेथें कोरलेल्या होत्या. त्या मला विशेष आवडल्या. पण एकंदर शिल्प उच्च दर्जाचें आहे असें वाटलें नाहीं.

तें देऊळ सगळें एकदम बांधल्यासारखें वाटलें नाहीं. आधींच्या लहान देव-ळाची मग हळुहळू वाढ करण्यांत आली असावी असें वाटत होतें. दक्षिणेकडच्या पुष्कळ देवळांत असा प्रकार दिसून येतो. त्यांच्यांतील शिल्पांत विविधता येत असली तरी रचनेंत वैगुण्य निर्माण होतें.

अंधारांतून ठेचकाळत आम्ही गाभाऱ्यापर्यंत पोहोंचलों. दिवटीच्या प्रकाशांत देवीचें अर्धवट दर्शन घेतलें. देवीची मूर्ति काळ्या पाषाणाची आहे. तिच्या मस्तकावर, मला वाटतें, एक हिरा आहे. आम्ही दर्शन घेत असतां पुजाऱ्यानें पिंजर, तांदुळ वगैरेंच्या कालवणानें आमचीं कपाळें बरबटवलीं आणि दक्षिणा वसूल केली. बाहेर पडतांना देवीचीं अनेक वाहनें आमच्या दृष्टीस पडलीं. आमचे देव झोपतात, जागे होतात, स्नान करतात, अन्नाचें सेवन करतात, आसनावर बसून फिरतात. तीं जणु जिवंत माणसेंच आहेत अशा कल्पनेनें आमच्या देवळांतले व्यवहार चाललेले असतात. लहान मुलांनीं भातुकली खेळावी तसा आम्ही हा खेळ खेळत असतों. कर्मकांडाचें (ritual) महत्त्व मी मानतों. पण हें सगळें हास्यास्पदच वाटूं लागतें.

ह्या देवळाची व्यवस्था त्रावणकोर संस्थानानें नेमलेल्या तीन विश्वस्तांच्या

मार्फत चालते. देवालय खाजगी मालकीचें असण्यापेक्षां हें पुष्कळ बरें. देवळें खाजगी मालकीचीं असणें ही प्रथा मला अत्यंत अयोग्य व घाणेरडी वाटते. ती ताबडतोब बंद होणें इष्ट आहे.

देवळाच्या बाहेर एक पंड्याजी भेटले. ते चांगले इंग्रजी बोलत होते. आमच्याकडून कांहीं प्राप्ति होत नाहीं असें पाहून त्यांनीं आमचीं नावें लिहून घेतलीं, आणि कुटुंबासह उत्सवाच्या वेळीं येण्याची शिफारस केली. आमची सोय करण्याचें आश्वासन दिलें.

कन्याकुमारीला म्हणे एक चर्च आहे. त्याचें नांव 'Star of the East' असें आहे. तें नांव मला आवडलें. Star of the East! हा तारा पहायला मी उत्सुक होतों. पण मोटारची वेळ झाली होती. तेव्हां आम्ही पळत पळतच केप हॉटेलकडे परतलों. घामाच्या चिकचिकाटांत अस्वस्थ होत थोडा वेळ तात्कळल्यावर आमची मोटार निघाली.

पंधरा दिवस आम्ही सारखे दक्षिणेला चाललों होतों, तरी आमचा देश संपला नव्हता! आपला देश केवढा अवाढव्य आहे तें आम्हांला इतके दिवस पुन्हा पुन्हा जाणवत होतें. त्यांतल्या विविधतेनें आम्ही थक्क होत होतों. आतां मात्र दक्षिणेकडे जाणें संपलें होतें. आतां आम्ही उत्तरेकडे निघालों होतों. घराच्या दिशेनें चाललों होतों.

त्रिवेंद्रमला परततांना प्रवासांत विशेष असें कांहींच झालें नाहीं. फक्त बरोबर पेट्या, बोचकीं, फणस, बरण्या आणि तुपाची लोटी घेऊन गाडींत चढलेल्या एका घट्ट अंबाड्याच्या आणि फाटक्या भांगाच्या बाईनें लक्ष वेधून घेतलें. सारखें ती आपल्या सामानाला संभाळीत होती, आणि इतर सर्व लोक चोर आहेत अशा कल्पनेनें त्यांच्याकडे पहात होती.

## : १५ : मदुरा

त्रिवेंद्रमला परतल्यावर आम्हीं जेवणखाण उरकून विश्रांति घेतली. जेवण नेहमींसारखेंच होतें—सांबार, भात वगैरे. त्याचें वैशिष्ट्य म्हणजे पुन्हा पुन्हा पानांत पडणारी टॅपिओकाची भाजी !

मग आम्ही पद्मनाभस्वामीचें देवालय पहायला मोठ्या तयारीनिशीं निघालों. प्रधाननें बॅगेंतून आपलें धोतर घेतलें. मीं वाटेंत एक खरेदी केलें. तेथें जाऊन एकेकानें धोतर नेसून आंत जायचें आणि दुसऱ्यानें कपडे घेऊन बाहेर उभें रहायचें अशी आमच्या मोहिमेची आंखणी होती.

वाटेंत एका चांभाराकडून आम्हीं आमच्या बॅगेची तुटलेली वादी लावून घेतली. दक्षिणेंत चांभार दिसणें मोठें मुष्कील ! कारण कोणी चपलाच पायांत घालीत नसल्यामुळें त्यांच्या दुरुस्तीचा प्रश्नच उद्भवत नाहीं. (लोक अनवाणी चालत असल्यामुळें येथें रस्त्यांत घाण टाकणें, थुंकणें वगैरे प्रकार कमी आहेत असें मुळींच नाहीं.) चांभार सहसा दिसत नाहीं हें खरें असलें, तरी तो भेटल्यावर स्वस्तांत काम करून देतो हें तितकेंच खरें.

आमच्या चांभाराचा संसार रस्त्यावर त्याच्या भोंवतींच होता. त्याचें एक मोठें मूल त्याच्या हत्याराशीं खेळत होतें. दुसरें तान्हें मूल झाडाला दोरीनें बांधलेल्या झोळण्यांत ठेवलेलें होतें. त्याची बायको कुठें तरी जवळपासच होती; पण आम्हांला दिसत नव्हती. चांभार मोठा प्रेमळ दिसला. कारण त्याच्या अडमडणाऱ्या पोराच्या पाठींत धपाटा मारावा असें मला दोनदां वाटलें, पण तो मात्र मुळींच रागावला नाहीं.

त्याच्याकडून एक गरीब माणूस चपला दुरुस्त करून घेत होता. आपल्या चपलांवर बापड्याचें फार प्रेम दिसलें. त्यांच्याकडे बोट दाखवून तो चांभाराला अनेक लांबलचक प्रश्न विचारीत होता. चांभार नुसतें हुंकारावरच भागवत होता. चपला दुरुस्त झाल्यावर त्यानें त्यांचें बारकाईनें निरीक्षण केलें आणि मग चांभाराजवळचें पॉलिश घेऊन आपणच तें चपलांना फासटूं लागला. तें पाहून व्यंकटेश माडगूळकरांच्या ‘ वहाणा ’ ह्या गोष्टीची आठवण झाली.

बॅग रिपेअर करण्याचें कौशल्याचें काम मिळाल्यामुळें चांभारदादा खूप

दिसले. आम्हांला काय पाहिजे होतें तें भाषेच्या अडचणीमुळें आम्हांला सांगतां येत नव्हतें. पण त्यानें स्वतःच्या बुद्धीनें बरोबर आम्हांला हवें तसें काम करून दिलें.

मग आम्ही पद्मनाभस्वामीच्या देवळाकडे गेलों. तेथें वातावरण एकंदर उत्सवाचें दिसलें. देवळांत जाणाऱ्या लोकांची गर्दी झाली होती. दाराजवळ अनवाणी शिपाई बंदूक घेऊन उभा होताच. तो दोन दोन मिनिटांनीं 'प्रेझेंट आर्म्स' करीत होता. प्रधाननें त्याचें कारण त्याला विचारल्यावर तो मला म्हणाला, "पुजारी देवांना प्रदक्षिणा घालीत आहे. त्याची प्रदक्षिणा संपली कीं मला 'प्रेझेंट आर्म्स' करावें लागतें."

उभ्या उभ्या, सर्वांच्या देखत कपडे बदलण्याचा समारंभ उरकून मीं पहिल्यानें आंत गेलों. मग प्रधान जाऊन आला.

तें आखूड धोतर मीं नुसतेंच गुंडाळलें होतें. त्यामुळें माझे पाय अडकल्या-सारखे होत होते. गोणत्यांत पाय घालून धावण्याची एक शर्यत असते. तिच्यांत मी भाग घेत आहें असें वाटत होतें. शिवाय तें सुटण्याची धास्ती वाटत होतीच. लहानपणीं आईनें मला पितांबर नेसवून लग्नाच्या पंक्तींत पाठवलें होतं आणि ऐन पंक्तींत तो पितांबर सुटून खालीं पडला होता. तेव्हांपासून धोतर ह्या गोष्टीची मीं फार धास्ती घेतली आहे.

आंत कुठें प्रवेश करायला परवानगी आहे आणि कुठें बंदी आहे तें समजत नव्हतें. आणि त्याबाबत तेथें कोणाला विचारतां येत नव्हतें. कारण इंग्रजी व हिंदी ह्यांचें सर्वांनाच अज्ञान होतें. त्यामुळें सारखें गोंधळल्यासारखें होत होतें.

ह्या एकंदर कारणांमुळें देऊळ बघण्यांत माझें मन रमलें नाहीं. कधीं एकदां तेथून बाहेर जातों असें वाटत होतें.

देवालयाच्या चौफेर अनेक खांबांचा केवढा तरी मोटा दगडी मंडप आहे. ह्या मंडपानें वेढलेल्या भागांत आणि आसपासहि आपापल्या गाभाऱ्यांत निरनिराळे देव आहेत. मध्येंच छोटे दगडी मंडप आहेत. ह्या मोठ्या दगडी मंडपांत ठिकठिकाणीं पणत्या लावण्याचें काम मोठ्या जोरांत चाललें होतें. ह्या पणत्यांच्या काजळीमुळें तेथल्या शिल्पाची झालेली खराबी मला दिसत होती. पण शिल्पाचें महत्त्व त्या भाविकांना फारसें वाटत नसावें. शिवाय त्या अनेक खांबांवर अनेक पणत्या तेवूं लागल्या म्हणजे दृश्य मोठें सुंदर दिसत असावें.

त्या मंडपांतल्या खांबांवरचें शिल्प पाहून आम्ही चकित झालों. घटासारखे स्तन असलेल्या व मुरडून आपले पुष्ट नितंब दाखवीत शृंगारिक हावभाव करणाऱ्या स्त्रियांच्या आकृती आम्हीं आधीं कांहीं देवळांत पाहिल्या होता. पण येथील शिल्प विलक्षणच उत्तान स्वरूपाचें होतें. येथें पुरुष स्त्रियांना बिलगले होते, त्यांचीं चुंबनें घेत होते, त्यांचे स्तन हातांत पकडत होते. त्यांचीं इंद्रियें उद्दीपित झालेलीं दाखवलीं होतीं, आणि संभोगाचे अनेक प्रकार तेथें अनिर्बंधपणें चित्रित केलेले होते.

मराठी साहित्य सोंवळ्यांत गुंडाळून ठेवूं पहाणाऱ्या आणि स्वतःला उद्दामपणें संस्कृतिसंरक्षक म्हणविणाऱ्या आपल्याइकडच्या काहीं लोकांनीं जर आमच्या संस्कृतीचा हा विलास पाहिला असता, तर खात्रीनें ते झीट येऊन फटाफट पडले असते.

आमचा धर्म ऐहिक जीवनाकडे पाठ फिरविणारा आहे असें समजलें जातें. पण आमच्या देवळांतलें शिल्प पाहिलें म्हणजे हें खोटें वाटूं लागतें. येथें तर ऐहिक जीवनाचा मोठा गौरव केलेला आहे. इंद्रियांचीं सुखें मिळविणें कमीपणाचें आहे असें कुठेंच दर्शविलेलें नाहीं. तपश्चर्या करणारे मुनी आणि कामातुर झालेले स्त्री-पुरुष जवळ जवळ कोरलेले आहेत. सभ्यतेचे आडपडदे येथें मुळींच पाळलेले नाहींत. (आणि कलेंत ते पाळूं पहाणें मूर्खपणाचेंच आहे.) जीवनांतलीं सुखें अनुभवतच परमेश्वराच्या जवळ जायचें, असेंच जणु ह्या देवळातून सुचविलेलें दिसतें.

पण पद्मनाभस्वामीच्या देवळातील या उत्तान कामचेष्टेच्या चित्रणामागें आणखीदेखील कारणें आहेत. स्त्रीपुरुषाचें परस्परांविषयींचें आकर्षण आणि त्यातून निर्माण होणारें नवें जीवन ही गोष्ट माणसाला मोठी अद्‌भुत वाटावी, हें नैसर्गिक आहे. आणि स्त्रीपुरुषसंबंधांतून आपला वंश पुढें चालू रहतो हें त्याला फार महत्त्वाचें वाटणारच. त्यामुळेंच आपल्या पूर्वजांना लैंगिक आकर्षण दैवी व पवित्र वाटलें असावें. ह्यात कांहीं हिणकस वा घाणेरडें आहे अशी त्याची कल्पनाच नसावी. शिवाय धार्मिक उन्माद व लैंगिक उन्माद ह्यांचें फार जवळचें नातें आहे. ह्यामुळें अशा प्रकारच्या शिल्पाला देवळात स्थान मिळालें असावें.

त्या प्रचंड मंडपाचा एक भाग लोखंडाची जाळी मारून बंद केलेला होता. त्यांत असंख्य पोरें रांगेनें बसलीं होतीं आणि भयंकर गलका करीत होतीं.

उत्सवानिमित्त बहुधा त्यांची तेथें जेवणाची सोय केलेली असावी. अन्नविषयक निर्बंधांच्या चौकटींत हें कसें काय बसत होतें कोण जाणे!

ह्या देवाल्यांत इतर अनेक देव असले तरी तीन मुख्य देव आहेत. सोंवळ्याओंवळ्याच्या भानगडीमुळें, आणि स्वतःचा अपमान करून घ्यायची इच्छा नसल्यामुळें, त्यांपैकीं कुठल्याच देवाचें मला नीटसें दर्शन घडलें नाहीं. आणि तशी विशेषशी इच्छाहि झाली नाहीं. तेथें एका छोट्या मंडपांत एक विदूषकासारखा दिसणारा मनुष्य मल्याळी भाषेंत कांहीं तरी बडबडत होता आणि त्याच्याभोंवतींचे लोक तें भाविकपणें ऐकत होते. बहुधा तो पुराण वगैरे सांगत असावा.

मीं बाहेर पडल्यावर प्रधान आंत गेला. तो आपल्याइकडच्यासारखें धोतर नेसला होता. त्यामुळें तो अधिक सुखानें हिंडूं शकला. एक प्रसंग सोडल्यास त्याचें भटकणें छान झालें.

प्रधानचे केसांचे काट बरेच खालीं आहेत. तो काळसर काचांचा चष्मा लावतो. शिवाय तो हिंदुस्थानींत बोलत होता, हेंदेखील तो अहिंदु ठरण्याचें कारण असावें. ह्यामुळेंच बहुधा त्याला पाहून तेथला एक पुजारी म्हणाला, "हिंदू इल्ला." (हा हिंदू नाहीं.)

तें ऐकून प्रधान घाबरून गेला. कारण आपण हिंदु आहोंत हें पटवून देणें भाषेच्या अज्ञानामुळें अशक्य होतें. पण सुदैवानें ती भानगड तेवढ्यावरच मिटली. आमच्या हिंदुत्वाविषयीं घेतलेली ही दुसरी शंका. हिंदी ही अविंधांची भाषा, असा येथें दाट समज असावा.

देऊळ पाहून झाल्यावर आम्हीं धोतरांतून स्वतःची सुटका करून घेतली आणि मग हॉटेलच्या दिशेनें चालूं लागलों.

नंतर रात्रींच आम्हीं त्रिवेंद्रम्हून गाशा गुंडाळला आणि मदुरेला जायला निघालों. त्रिवेंद्रम्विषयीं कांहीं आमचें मत फारसें चांगलें झालें नाहीं. तेथल्या इमारती, तेथले रस्ते, तेथली दिव्यांची सोय ह्यांपैकीं कांहींच आम्हांला विशेष चांगलें वाटलें नाहीं. म्हैसूरच्या तर तें पासंगालाहि पुरणार नाहीं. तेथले लोक तसे खास सज्जन नाहींत. आणि तेथें सिगरेट्स फारच महाग मिळतात. अशा स्थितींत त्रिवेंद्रम्विषयीं आमचें मत कसें चांगलें होणार बरें?

त्रिवेंद्रमला आम्ही स्टेशनवर गेलों ते पावसांत भिजतच; आणि तेथें जो आमच्या मागें पाऊस लागला तो मदुरा सोडीपर्यंत कांहीं मागचा सुटला नाहीं.

त्रिवेंद्रमूला सुरुवातीला आम्ही दोघेच डब्यांत होतों. पण गाडी सुटायच्या वेळेला एक गुजराती आमच्या डब्यांत आला. आरडाओरड करीत, हमालाला शिव्या देत त्यानें डब्यांत प्रवेश केला. आणि तेथें डबा जणुं आपल्याच मालकीचा आहे अशा थाटांत तो वावरूं लागला. डब्यांतले दिवे लागत ना, तेव्हां त्यानें रेल्वे कंपनीची आई माई उद्धरली.

त्या गुजरात्याची आम्हांला गंमत वाटली. आमचें आपसांतलें बोलणें ऐकून तो आमच्याशीं मोडक्या तोडक्या मराठींत बोलूं लागला आणि त्यानें ताबडतोब सिगरेट पुढें करून आमच्याशीं दोस्तीचे संबंध प्रस्थापित केले. त्याच्या खिशांत पैसे बरेच असावे. त्याच्या अंगावर सोनेंहि थोडें नव्हतें. आणि त्याच्या बरोबरच्या सामानांत कांहीं हजार रुपयांचा माल होता. त्यामुळें गाडींत आमची सोबत मिळाली हें त्याला बरें वाटत होतें.

त्याच्या सहवासांत आमचा वेळदेखील बराच मजेंत गेला.

सुरुवातीलाच त्यानें हमालाशीं भांडण केलें. आणि गंमत अशी कीं, आम्हांला जी भाषेची अडचण भासली होती ती त्याला मुळींच भासत नव्हती. तो अस्खलित हिंदींत त्या हमालाला आणि सर्व दाक्षिणात्यांना शिव्या देत होता.

" जंगली लोक लेकाचे. पायांत चपला घालत नाहींत. चार वार कापड पण नसतें लेकांच्याच्या अंगावर. आणि सारखे इल्ला इल्ला करीत असतात. अरे लेको, माणसाच्या भाषेंत बोला. ही काय जबान आहे का मस्करी आहे ? म्हणे इल्ला, इल्ला. लेकाचे मला बनवायला पहाताहेत. बेटयांनो, व्यापाऱ्याचा बच्चा आहें मी. चमडी जाईल पण दमडी नाहीं उगीच सोडणार हातांतून. सगळ्या हिंदुस्थानांत हिंडलोंयू. सगळीकडच्या सोद्यांना हात दाखवलायू. इल्ला इल्ला करून मला फसवाल कीं काय ? "

हें पल्लेदार भाषण चालू असतांना हमाल मध्येंच बोलला कीं, तो उसळून उद्गारायचा, " हात् तेरी बिबी मर गयी ! " त्याच्या भाषणाचें हें पालुपदच होतें. लोकांच्या बायका मराव्या अशी त्याची इतकी उत्कट इच्छा कां होती तें मला कळूं शकलें नाहीं.

हमाल इतकेंच म्हणत होता कीं, बिल्ल्यावर लिहिले आहेत तितके पैसे मला द्या. पण आमचा गुजराती मित्र तें ऐकून घ्यायलाच तयार नव्हता. त्याला स्टेशनमास्तरकडे घेऊन जाण्याची तो धमकी देत होता आणि पुन्हा पुन्हा त्याची बायको मारून टाकीत होता.

अखेर हमालानें आपला बिल्ला काढून दाखवला. तेव्हां त्या गुजरात्यानें तो निरखून पाहिल्यासारखें केलें आणि मग आम्हांला तो म्हणाला, "वाचा वाचा तेच्यावर काय लिवलंय् तें."

तेव्हां आमच्या डोक्यांत प्रकाश पडला कीं, ह्या बेट्याला इंग्लिश मुळींच येत नव्हतें! पुढें प्रवासभर तो आमच्याकडून गाडीचें वेळापत्रक व इतर कागदपत्र वाचून घेत होता.

हमालाशीं चाललेलें त्याचें भांडण मिटल्यावर, त्यानें आम्हांला स्वतः-विषयींची माहिती सांगितली. तो कॉस्टिक सोडा वगैरे रसायनांचा मोटा व्यापारी होता. दिल्लीला त्याची मुख्य कचेरी होती. दक्षिणेंत व्यापार वाढवतां येईल कीं काय तें पहायला तो आला होता. बंगलोर, कोचीन वगैरे ठिकाणीं हिंडून तो पुढें चालला होता. कोचीनपर्यंतचा प्रवास त्यानें विमानानेंच केला होता. पण नीलगिरीवरून जातांना विमान हवेच्या वादळांत सांपडून, त्याच्या भाषेंत सांगायचें म्हणजे, 'उलटें पालटें' झालें होतें. त्यामुळें तो अगदीं घाबरून गेला होता. त्याचें अंग थडथडूं लागलें होतें. अंगावर ब्लँकेट घेऊन-देखील तें थडथडणें थांबेना. अखेर त्यानें एअर हॉस्टेसला बोलावलें. आणि ती त्याच्या छातीवर हात ठेवून त्याच्या शेजारीं बराच वेळ बसून राहिली. (ती कशी बसली होती त्याचें त्यानें विशेष रसभरित वर्णन केलें.) आणि मग त्याच्या छातींतलें धडधडणें थांबलें. त्यामुळें त्यानें विमानांतून प्रवास करून जीव धोक्यांत न टाकण्याचें ठरवलें.

हा एवढ्या वीरश्रीनें बोलणारा माणूस इतका घाबरावा ह्याची आम्हांला मौज वाटली. आम्हीं विचारलें, "तुम्हीं विमानांतून फारसा प्रवास केलेला नाहीं वाटतें?"

तो म्हणाला, "आम्ही तो हमखास एअरनेंच जाते. दर आठवड्याला मी विमानांतून कलकत्ता, गोहत्ती वगैरे ठिकाणीं जात असतों. पण विमान असें कधीं उलटेंपालटें झालेलें आम्हीं पाहिलें नव्हतें बुवा! पण इथले लोक साले अडाणी, तशी हवा पण अडाणी!"

आणि त्यानें सगळ्यांच्या बायका मारून टाकल्या. तो ओठ बाहेर काढून आणि अंगठे हलवून म्हणाला, "काय बी वेपार नाय इकडे. पांच पंचवीस हजाराचा पण माल विकला नाहीं. ह्या लोकांच्या जवळ पायांत घालायला चपला नाहींत;—हे व्यापार कसला करणार?"

त्याचीं ठाम मतें ऐकून आम्ही हसलों.

तो पुढें म्हणाला, "नाहीं म्हणायला कोचीनला व्यापार आहे. तेथें आपले गुजराती लोक पण आहेत. तेथें मीं थोडा माल विकला. पण तेथला व्यापारी लेकाचा म्हणतो कीं, तुमचा भाव ब्लॅक मार्केटचा आहे. तेव्हां मीं म्हटलें, 'पटत असेल तर माल घे. इथें मी आलोंय् तो व्यापार करायला. दानधर्म करायला नाहीं.' "

आपण नफेबाजी करतों ह्यांत त्याला मुळींच कमीपणा वाटत नव्हता. त्याचा दृष्टिकोन चुकीचा असला, तरी सडेतोड होता. व्यापार करायचा तो नफ्याकरितां. त्याच्या बापजाद्यांनीं तेंच केलें होतें आणि तोहि तेंच करीत होता. आणि आतां नफा सोडून देण्याचा उलटा व्यापार करायला तो तयार नव्हता.

नंतर त्यानें आमची चौकशी केली.

आम्हीं म्हटलें, "आम्ही व्यापारी कॉलेजांतले प्रोफेसर आहोंत. पण आम्हांला व्यापार मात्र करतां येत नाहीं."

तें ऐकून तो हसला. स्वतःवर खूष झाला. आम्ही प्रवास कशाला करीत होतों असें त्यानें विचारलें. तेव्हां आम्हीं म्हटलें, "आम्ही दक्षिण हिंदुस्थान पहाण्याकरतां निघालों आहोंत. दक्षिणेंत पहाण्यासारखें पुष्कळ आहे." तो अंगठा हलवीत म्हणाला, "कुच नहीं. ह्या दक्षिणेंत बाजार, व्यापार वगैरे फारसा दिसत नाहीं."

जेथें व्यापार पुष्कळ तें ठिकाण चांगलें अशी त्याची व्याख्या दिसली. त्यामुळें अधिक फोड करण्याच्या दृष्टीनें आम्हीं म्हटलें, "नाहीं, नाहीं. आम्ही म्हणत होतों कीं हा भाग सुंदर आहे."

तेव्हां तो म्हणाला, "सुंदरबिंदरची तो तुमी वार्ताच सोडून द्या. खरी beauty आपल्या मुंबईत आहे. काय फॅशन! काय कपडे! आणि आतां तर पंजाबी आणि सिंधी पोरी आल्यामुळें तर आणखीनच मजा आली आहे. दिल्लींत पण ब्यूटी आहे. फर्स्ट क्लास छोकऱ्या आहेत तिथें!"

सौंदर्य म्हणजे स्त्रियांचा आकर्षकपणा अशी त्याची व्याख्या होती. इतकेंच नव्हे तर त्यापलीकडे कांहीं सौंदर्य असेल ह्याची त्याला कल्पनाच नव्हती. किती भयंकर संकुचित होतें त्याचें अनुभवाचें विश्व! यशस्वी व्यापारी होण्याकरितां एवढी मोठी किंमत देणें अवश्य आहे असें मला वाटत नाहीं.

आम्हांला आमच्या बोलण्याचें पुन्हा एकदां स्पष्टीकरण करावें लागलें.

आम्हीं म्हटलें, "त्या अर्थानें नाहीं आम्हीं सुंदर म्हटलें. येथलीं देवालयें छान आहेत. सृष्टिसौंदर्याची येथें विपुलता आहे."

आमचें हें बोलणें त्याला वेडेपणाचें वाटत होतें. तो म्हणाला, "देवळांत-बिवळांत आमी नाय बाबा जाते. कुठच्याहि गांवांत गेलों कीं मी तेथला बाजार पहातों आणि पोरी बघतों."

त्यानंतर तो विशेष रंगांत आला. आणि आपण बंगलोरला चाळीस रुपये देऊन एका सुंदर पोरीबरोबर एक रात्र कशी काढली व त्या रात्रींत तिनें बिअरच्या सात बाटल्या कशा खलास केल्या तें तो सांगूं लागला. तो फार वहावत चालला तेव्हां आम्हीं विषय बदलला.

मग शाल पांघरून तो झोंपीं गेला, आणि आम्हीहि त्याच मार्गाला लागलों.

सकाळीं उठल्यावरदेखील त्यानें आमची बरीच करमणूक केली. अगदीं गाडी सुटतांना तो तांब्या घेऊन खालीं उतरायचा आणि तो स्टेशनवरच्या नळावर भरून धवात्या गाडींत चढायचा. मासिकें वगैरे विकणाऱ्यांना तो बोलवायचा आणि तीं सगळीं इंग्रजी असल्याबद्दल त्यांना शिव्या द्यायचा. सगळ्यांशींच तो दादागिरी करीत होता. आणि सगळ्यांच्याच बायका फटाफट मारून टाकीत होता. आमच्या दृष्टीनें आम्हांला तेथील भाषा येत नव्हती ही अडचण होती. पण त्यानें ती फायद्याची बाब केली होती. आपली शिव्या देण्याची हौस तो मनसोक्तपणें पुरवून घेत होता.

व्यापारी असला तरी तो उदार दिसला. कारण आम्हीं कांहीं खाल्लें-प्यायलें तर त्याचे पैसे तो स्वतः देत होता. आम्हांला अजिबात खिशांत हात घालूंच देत नव्हता.

ही सगळी मजा चाललेली असतांना त्याचा एक डोळा व्यापारावर होता. कुठचेंहि स्टेशन आलें कीं, तेथें गिरण्यांच्या चिमण्या, कारखाने अगर वखारी दिसतात कीं काय तें तो निरखून पाही. मालाच्या किती वाघिणी तेथें आहेत तें पाही. आणि त्यावरून तेथें कसला व्यापार चालला असावा आणि तेथें उतरून कांहीं फायदा होण्यासारखा आहे का याचा अजमास बांधत असे.

आमच्यावर तो खूप झालेला दिसला. कारण मदुरा स्टेशन आल्यावर आम्हीं सर्वांनीं एकत्रच उतरावें असा तो आग्रह करीत होता. पण आम्हीं त्याला टाळलें. तेवढ्यांत त्या गर्दीत उत्तरेकडचा एक व्यापारी त्यानें अचूक हेरला. त्याच्याकडून हवी ती माहिती काढून घेतली आणि मग टांग्यांत बसून तो निघून

गेला. प्रवासांत भेटलेल्या इतर अनेक माणसांप्रमाणें आमच्या जीवनाच्या कक्षेबाहेर तो निघून गेला.

मदुरेचें रेल्वे स्टेशन मोठें व सर्व सुखसोयींनीं सज्ज असें आहे. त्यावरून मदुरा शहराविषयीं आम्हीं चांगली कल्पना बांधली. पण बाहेर पडल्यावर ती खोटी ठरली. कारण त्या शहरांत रस्त्यांत चिखल झाला होता आणि पाणी तुंबलें होतें. रस्ते अरुंद व वेडेवांकडे होते. बोळकंड्या अनेक होत्या आणि परस्परांना खेटलेल्या इमारती जुनाट व अस्वच्छ होत्या.

पण ह्या सर्व गोष्टींतून मीनाक्षीच्या देवालयाचीं भव्य गोपुरें वर आकाशांत चढलीं होतीं आणि आमचीं भटकणारीं मनें पुन्हा पुन्हा आपल्याकडे खेंचून घेत होतीं. तीं पुरातन गोपुरें हेंच त्या जुनाट शहराचें वैभव होतें.

एका भिकार गलिच्छ हॉटेलांत आम्हीं मुक्काम ठोकला. त्यांतल्या त्यांत तें हॉटेल चांगलें असें आम्हांला कोणीं सांगितलें होतें. पण तेथें गेल्यावर रेल्वे रिटायरिंग रूममध्यें उतरलों असतां तर बरें झालें असतें अशी चुटपुट आमच्या मनाला लागली. दोन दिवसांचाच प्रश्न असल्याकारणानें आम्ही तसेच तेथें राहिलों. पण तेथें खालीं तयार होत असलेलें जेवण पाहून नुसती शिसारी आली. तेथें जेवायला आम्ही धजलोंच नाहीं. स्टेशनवर जाऊनच आम्ही जेवत असूं.

दुपारीं आम्ही बाहेर पडलों. पाऊस पडत होता. चिखल झाला होता. पाणी तुंबलें होतें. पण भिजत भिजत आणि तुंबलेलें पाणी चुकवीत आम्ही तेथें फिरलों. भिजण्याची आम्हांला मौज वाटत होती आणि स्वतःच्या कपड्यांची मुळींच काळजी वाटत नव्हती.

आम्ही असे भिजत होतों. शेतीचा हंगाम सुरू झाल्याचें आम्हीं वाटेंत गाडींतून पाहिलें होतें. त्यावरून त्या भागांतला पावसाळा सुरू झाला असावा असा आम्हीं कयास बांधला. पण तेथल्या लोकांनीं आम्हांला सांगितलें कीं, खरा पाऊस अजून सुरू व्हायचा आहे. ह्या नुसत्या सुरुवातीच्या सरी आहेत. पावसाच्या सरी दोन दोन दिवस पडूं शकतात हा शोध आम्हांला तेव्हां पहिल्यानेंच लागला.

प्रथम आम्हीं तिरुमल नायकाचा राजवाडा पहायला गेलों. विजयनगर पडल्यानंतर दक्षिणेंत हें नायक घराणें कांहीं काळ राज्य करीत होतें. मदुरा व त्रिचनापल्ली येथून त्यांचा कारभार चालत असे. त्यांच्यापैकीं तिरुमल नायक हा

सर्वांत कर्तबगार राजा होता. १६२३ ते १६५९ या काळांत त्यानें राज्य केलें. त्याच्या कारकीर्दींत अनेक उत्तमोत्तम देवालयें बांधलीं गेलीं अगर त्यांची वाढ करण्यांत आली.

तिरुमल नायकाचा हा राजवाडा पाहतांच त्याच्या भव्यतेनें आम्ही स्तिमित झालों. आमच्या प्रवासांत आम्हीं अनेक भव्य बांधकामें पाहिलीं होतीं. पण ह्याची भव्यता निराळी व वैशिष्ट्यपूर्ण होती. त्याची रचना व बांधकामाची पद्धतहि आम्हांला अगदीं वेगळी वाटली.

आम्हीं पाहिलेलीं देवळें व इतर बांधकामें बहुधा दगडाचीं होतीं. तीं सर्वत्र शिल्पाकृतींनीं नटलेलीं होतीं. त्यांचा एक कोपराहि असा नव्हता कीं, जेथें शिल्पानें सजावट केलेली नव्हती. त्यांच्या रचनेंत कमानींचा व घुमटांचा उपयोग फारसा केलेला आम्हांला आढळला नव्हता आणि त्यांच्या कुठच्याहि एका मजल्याची उंची फारशी नव्हती. पण तिरुमल नायकाचा हा वाडा माती व विटा यांनीं बांधलेला आहे. शिल्पानें तर तो अजिबात नटवलेला नाहीं. नुसत्या भव्यतेवर आणि कमानी व घुमट यांच्या कुशल योजनेंत त्याचें सौंदर्य सांठविलेलें आहे.

त्याच्या अतिशय उंच अशा दरवाज्यांतून आंत प्रवेश करतांना भव्यता नजरेंत घुमते. आंत केवढें तरी मोठें चौकोनी आवार आहे आणि त्याच्या सभोंवतीं रांगेनें प्रचंड वाटोळे खांब आपल्या मस्तकावर तो भव्य राजवाडा घेऊन उभे आहेत. त्या उंच दरवाज्यांत घुमणाऱ्या भव्यतेचे पडसाद त्या खांबा-खांबांतून उमटतात. त्या खांबांच्या आंतल्या बाजूनें एक रुंद कॉरिडॉर त्या आवाराच्या भोंवतीं फिरतो. मग चौफेर पायऱ्यांनीं वर उंच चौथऱ्यावर चढतां येतें. दरवाज्याच्या बाजूला व त्याला जोडून असलेल्या दोन्ही बाजूंना वाड्याचीं अरुंद दालनें आहेत. पण दरवाज्याच्या बरोबर समोर आवार ओलांडून पायऱ्या चढून वर गेल्यावर एक मोठें आंत खोल गेलेलें चौरस आकाराचें दालन आहे. त्या दालनाच्या समोर वाडा डोक्यावर घेणाऱ्या दोन माणसांच्या प्रचंड आकृती आहेत, आणि वरच्या घुमटाकृती छतावर कोरीव काम केलेलें आहे. त्या दालनांत मध्यभागीं तिरुमल नायक विराजमान होत असेल. त्याच्या मागें व दोन्ही बाजूंस मोठे मानकरी बसत असतील आणि पुढें पायऱ्यांवर, भोंवतालच्या कॉरिडॉर-मध्यें आणि समोरच्या आवारांत सगळा दरबार भरत असेल. ते प्रचंड खांब, त्या दरबारी माणसांना तिरुमल नायकाच्या सामर्थ्याची ग्वाही देत असतील. आणि त्यांच्या मस्तकावर आधारलेलें वैभव पाहून ते दिपून जात असतील.

ह्या दर्शनी भागाच्या मागच्या बाजूला कांहीं दालनें आहेत. त्यांतलें एक वर वर्णन केलेल्या दरवाज्याच्या जागेसारखेंच पण लहान प्रमाणावर बांधलेलें आहे. जिना चढून वर गेल्यावर खांबांची आणि त्यांच्यावरच्या कमानींची गर्दी आहे. आणि त्यांतून चिंचोळ्या वाटांनीं इकडून तिकडे जातां येतें. त्याच्याहि वर म्हणजे छपरावर जाण्याकरितां जिने आहेत. तेथें गेलें म्हणजे उंच-सखल असे राजवाड्याचे निरनिराळे घुमट आहेत. त्या उंच ठिकाणाहून भोंवतालचें दृश्य दूरपर्यंत दिसतें. दृष्टीच्या टप्प्यांतले सगळे अडथळे दूर झालेले असतात. आणि मीनाक्षीचीं गोपुरें आकाशांत उंच गेलेलीं दृष्टीस पडतात.

हा सगळा वाडाच इतका निराळा आहे कीं, तो कुठच्या तरी परक्या बांधकामाच्या पद्धतीनुसार मुद्दाम बांधण्यांत आला असावा. ती न नटवलेली निराळीच भव्यता पाहून, तिरुमल नायकाच्या कलादृष्टीचें कौतुक करावेंसें वाटतें.

वाड्याची मीं जितकी स्तुति केली, तितकीच वाड्याच्या सध्यां होणाऱ्या उपयोगावर टीका करणें प्राप्त आहे. सध्यां तेथें पार्टिशनें घालून तयार केलेल्या जागांत म्युनिसिपालिटीच्या कामल्या कचेऱ्या आहेत. त्या भव्य वाड्याला लावलेलीं तीं लाकडीं पार्टिशनें फार विद्रूप दिसतात. तेथें कारकुनांनीं फाइलींत डोकें खुपसून बसायचें हेंदेखील कांहीं तरीच वाटतें. त्या वाड्यांत दोन कोर्टेंहि बसतात. तिरुमल नायकाच्या वाड्यांत न्यायदान करणें हें उचित असलें, तरी त्या कोर्टांमुळें तेथलें वातावरण अधिक रुक्ष झालें आहे. शिवाय वाडा मोटा असला तरी त्यांत बंद दालनांचा अभाव असल्यामुळें जजसाहेब जिन्यालगतच बसतात आणि मधल्या सुटींत ते आपल्या या जागेत येऊन बसले असले कीं आमच्यासारख्यांना ताटकळत थांबावें लागतें. जजसाहेब कोर्टांत जाऊन बसले कीं मगच त्यांच्या खोलींत असलेल्या जिन्यावरून वर जातां येतें.

अर्ज लिहून देणारे लोक, वकील, अशील, शिपाई, कळकट पार्टिशनें आणि पिवळ्या फाइली ह्यांच्या गजबजाटानें त्या वाड्यांतलें वातावरण पार बिघडून गेलें आहे. त्या गजबजाटापासून दूर जाऊन आम्ही त्या वाड्याच्या उंच छपरावर जाऊन बसलों. पावसांत भिजत आणि उन्हांत वाळत तेथें वेळ काढला. सिगरेटी ओढल्या. वाड्याजवळच्या एका चर्चचें सौंदर्य निरखलें. मीनाक्षीच्या गोपुरांकडे पाहिलें. स्वतःच्या पूर्व जीविततापासून मी त्या क्षणांपुरता तरी तोडला गेलों. आणि मी मुक्त झालों आहें कीं हरवलों आहें तें मला समजेना.

त्या छपरावरून उतरून आम्ही एका झटक्यांत बसलों आणि तेथील मोठा

तलाव पहायला गेलों. तिरुमल नायकाचा हा वाडा बांधण्यासाठी माती खोदून म्हणे हा तलाव निर्माण करण्यांत आला. तिरुमल नायकाचा वाडा शहरांतच असल्यामुळें त्याची भव्यता आणि सौंदर्य नीट नजरेंत भरत नाहीं. पण हा विस्तीर्ण तलाव मात्र गांवाच्या बाहेर, वनश्रीच्या कोंदणांत बसलेला आहे. तेथलें वातावरण निवांत आहे. दूरवर निळया डोंगरांची एक छोटीशी रांग आहे. तेथपासून वृक्षांच्या झुबक्यांत आणि शेतांच्या चौकोनांत अनेक छटा लेवून, तलम हिरवळ पसरलेली आहे. (निदान आम्हीं पाहिलें तेव्हां ती पसरलेली होती.) जवळ नजर आणावी तसतसे माड आणि इतर वृक्ष परस्परांपासून अलग होतात. तलम हिरव्या पार्श्वभूमीवर त्यांच्या खोडांचा काळा जूनपणा नजरेंत अधिकच भरतो. मग नजर त्याच्या हिरव्या पर्णसंभाराच्या दिशेनें वर चढते आणि तेथून त्या विस्तीर्ण तलावाच्या संथ हिरव्या पाण्यांत अलगदपणें तेलाच्या थेंबासारखी पडते—त्याच्या पृष्ठभागावर सर्वत्र पसरते.

भोंवतीं फिरलें तर मैलाचा तरी फेरफटका होईल इतका ह्या तलावाचा विस्तार आहे. तलाव चारहि बाजूनीं बांधून काढलेला आहे आणि आंत उतरायला तेथें पायऱ्या केलेल्या आहेत. ह्या हिरव्या जलाशयाच्या मध्यभागीं एक छोटें हिरवें बेट आहे. त्याच्यावरील झाडांच्या गर्दीतून तेथें असलेल्या क्रीडामंदिराचा कळस डोकावतो. आणि त्याच्या चारहि टोकांना असलेले छोटे दगडी मंडप त्याच्या आकाराचा सुबकपणा मनावर अधिकच ठसवतात. पाण्याच्या पृष्ठभागावर विसांवलेली त्या बेटाची सांवली जरा हलत होती.

तेथल्या एका होडींत बसून आम्ही मधल्या बेटावर जायला निघालों. ती नाव तिरुमल नायकाच्या काळांतीलच असावी! तिची उंच बांकदार आणि नक्षीदार नाळ तरी तसें सुचवीत होती. त्या नावेंत बसून आम्ही भूतकाळांत जात होतों. जातांना वाटेंत बोटीची नाळ फिरली; पण मला वाटलें कीं तें बेटच हललें.

त्या बेटावरच्या झाडाझाडांतून आम्ही हिंडलों. त्याच्या कोपऱ्यावर असलेल्या मंडपांत उभे राहिलों. वाटत होतें कीं, पाण्यांत उडी मारावी आणि मनसोक्त पोहावें. पण तसें आम्हीं केलें नाहींच.

मधलें क्रीडामंदिर बरेंच उंच आहे. त्याच्यावर ठराविक प्रकारचें शिल्प आहे. मात्र त्यांत कांहीं गेरूसारख्या रंगानें रंगविलेले पुतळे आहेत. तें पाहून पहिल्यांदा तीं खरोखरचीं माणसें आहेत कीं काय असा भास झाला. वर

चढायला तेथें लाकडी शिड्या आहेत. त्यांचा उपयोग करून आम्ही सगळे मजले चढत गेलों. झाडांच्या शेंड्यांच्या फटींतून पलीकडचें दृश्य पाहिलें.

' आम्ही खालीं उतरून मोठ्या अनिच्छेनें परतणार, तेवढ्यांत पावसाची मोठी सर आली. मी एका मंडपांत आश्रयाला धावलों. प्रधान दुसरीकडे पळाला. त्या तलावांतल्या बेटावरच्या एकांतांत, भोंवतालीं पावसाचा पडदा लावून, त्या मंडपांत उभें रहायला फार गंमत वाटली.

पाऊस थांबेना तेव्हां आम्हीं नावाड्याला हांक मारली आणि पावसांतून भिजतच आम्ही नावेंतून परतलों—पावसाच्या तिरप्या रेघांनीं शेडिंग केलेलें हिरवें दृश्य पहात आणि पावसाच्या थेंबांनीं तलावांत फुलणारीं फुलें नजरेनें वेंचत!

नंतर मीनाक्षीच्या देवळाला पहिली आणि धावती भेट देऊन आम्ही स्टेशनवर गेलों. पायांतले ओले बूट काढले. अंगावरचे कपडे वाळूं दिले. आरामशीरपणें कडकडीत चहा घेतला. मग बराच वेळ सिगरेट ओढीत आराम केला आणि अखेर जेऊन हॉटेलमध्यें अनिच्छेनेंच परतलों.

मदुरेमध्यें आम्हांला एक विचित्र अनुभव आला. जेव्हां जेव्हां आम्हीं नोट देऊन तेथें कांहीं वस्तू घेतली तेव्हां बाकीचे पैसे आम्हांला सगळे चिल्लरीच्या रूपानेंच मिळाले. एकदां आम्हीं दहा रुपयाची नोट मोडली तेव्हां आम्हांला इतक्या आणेल्या आणि चवल्या मिळाल्या कीं, आम्हीं अक्षरशः ती चिल्लर भाजीप्रमाणें रुमालांत बांधून हिंडत होतों. नोटा आणि चिल्लर ह्यांच्या पुरवठ्याचें जें योग्य प्रमाण असतें, त्यांत कांहीं तरी मोठा बिघाड त्या वेळीं मदुरेंत झाला असावा!

## : १६ : देवालयें

मीनाक्षीचें देवालय नायक राजांनींच बांधलेलें आहे. दक्षिण भारतांतील शिल्पाच्या व वास्तूच्या उतरत्या काळांत जरी हें बांधलें गेलें असलें तरी त्याचा विस्तार, त्यांतील भव्यता आणि त्याच्या शिल्पाकृतींतील विविधता ह्यामुळें त्याला विशेष महत्त्व आहे. आणि अनेक भाविकांच्या मनांत त्याच्या-विषयीं ज्या भावना आहेत त्यांमुळें त्याचें महत्त्व अधिकच वाढलेलें आहे.

ह्या देवालयाचा विस्तार अफाट आहे. त्याच्या बाहेरच्या उंच भिंतींच्या सभोंवतालीं फिरलें तर सुमारें एक मैलाचा फेरफटका होतो. हें देऊळ नाहीं. एक गांवच आहे. एवढें प्रचंड देवालय एकदम बांधलेलें असणें शक्यच नाहीं. सुरुवातीला लहान असलेल्या देवळाच्या भोंवतीं मंडप उभारून, इतर देवतांचे गाभारे बांधून, तर कुठें तलाव खोदून त्याचा विस्तार वाढवण्यांत आलेला आहे. आंतल्या भिंतीच्या आणि गोपुराच्या बाहेरच्या बाजूला आणखी एक भिंत आणि आणखी उंच गोपुरें बांधण्यांत आलेलीं आहेत. त्या दोन भिंतींच्या मधली जागा मंडपांनीं, दालनांनीं आणि छोट्या गाभाऱ्यांनीं भरून गेली आहे. कांहीं ठिकाणीं मोकळ्या जागा आहेत. तेथें वृक्ष वाढले आहेत.

ह्या देवालयाचें मुख्य वैशिष्टय म्हणजे त्याच्या सभोंवतालीं व आंत अस-लेलीं अनेक गोपुरें. हीं सगळीं मिळून कांहीं तरी दहा बारा असावीं. ह्यांतलीं अगदीं वाटेवरचीं गोपुरें तर प्रचंडच आहेत. त्यांची उंची दीडशें ते दोनशें फूट असावी. पायऱ्यापायऱ्यांनीं उंच व निमुळतें होत जाऊन आकाशाला भिडणारें हें प्रचंड व बांधेसूद बांधकाम आणि त्याच्या बाजूंवरचें शिल्पाकृतीचें जंगल पाहून मन थक्क होऊन जातें. आणि त्याला जन्म देणाऱ्या अपूर्व श्रद्धेचें आणि कल्पनेचें अजब वाटत रहातें.

ह्या गोपुरांतून आंत प्रवेश केला म्हणजे बांधकामाचें व शिल्पाचें एक जंगलच लागतें. त्यांत माणूस गोंधळून जातो, वाट चुकतो. देवालयाच्या एकंदर रचनेची समग्र अशी कल्पना त्याला येऊंच शकत नाहीं. आणि तसें पाहिलें तर आंतल्या बांधकामांत फारशी संगति अगर एकवाक्यता असलेली दिसत नाहीं. निदान माझ्या तरी ती ध्यानांत आली नाहीं.

ह्या व इतर देवालयांच्या रचनेविषयीं एक गोष्ट जाणवते. सर्वसाधारणपणें एखाद्या मोठ्या बांधकामाची अगर इमारतीची रचना अशी असते कीं, त्याच्या मधला भाग अगर मागचा भाग सगळ्यांत उंच आणि भव्य असतो. त्या भव्यतेला आधारभूत होण्याचें, पायरीपायरीनें अगर एकदम तिच्याकडे लक्ष वेधण्याचें आणि तिला एकंदर चौकट पुरविण्याचें काम इमारतीचे अगर बांधकामाचे इतर भाग करीत असतात. पण ह्या व इतर देवळाच्या बाबतींत उलटा प्रकार आहे. ह्या देवालयांचे सर्वांत भव्य भाग म्हणजे त्यांचीं प्रवेशद्वारें असलेलीं गोपुरें! एकंदर देवालयाच्या रचनेंत तीं च एकदम सुरुवातीला एकांडेपणें अगर परस्परांत असलेल्या संगतीनें उभीं असतात. त्यांच्या मानानें देवालयाचा आंतला व मुख्य भाग उंच असा नसतोच. बाहेरून पाहिलें तर तें एक सपाट छप्पर असतें अगर छोटासा कळस असतो. प्रवेशद्वार असें भव्य आणि आतला भाग त्या मानानें नजरेंत न भरणारा ही गोष्ट विसंगत वाटते.

मीनाक्षी म्हणजे पार्वती आणि शिव ह्या दोघांच्या दोन मुख्य गाभाऱ्यांच्या भोंवतीं ह्या देवालयाची रचना झालेली आहे. आपल्याकडे विठोबा व रखुमाई अगर राम व सीता जशीं एकत्र नांदतात, तशीं ह्या मदुरा पद्धतीच्या देवालयात नांदत नाहींत. त्यांना वेगवेगळे गाभारे लागतात. ह्या दोन्ही देवळांचे कळस एकंदर सपाट, दगडी छपराच्या वर आलेले आहेत व त्यामुळें ते उठून दिसतात. पण गोपुरांची भव्यता त्यांना मारक ठरते.

ह्या दोन गाभाऱ्यांच्या भोंवतीं देवालयाची रचना कशी झालेली आहे तें सांगणें माझ्या आवाक्याबाहेरचें आहे. कारण तेथें दोनदां जाऊन आणि बराच वेळ खर्च करूनदेखील मला त्या रचनेचा पत्ता लागला नाहीं.

पूर्वेच्या बाजूचें गोपुर हें देवालयाचें प्रमुख प्रवेशद्वार. त्यातून आंत गेलें कीं मोठ्या, दगडी खांबांनीं सावरलेल्या दालनात बाजार आहे. अनेक दुकानदार कापड, भांडीं वगैरे अनेक प्रकारचा माल तेथें मांडून बसलेले असतात. नारळांचा मोटा ढीग तेथें अपरिहार्यपणें विक्रीला असतोच. आणि दोन पैसे घेऊन चपलाची रखवालदारी करायला तयार असलेला एक मनुष्यदेखील तेथें उभा असतो. त्याच्याजवळ चपला देणें सुरक्षितपणाचें असलें तरी एक धोका असतोच. ज्या गोपुरांतून आपण आंत प्रवेश करतों, तें एकदां आंतल्या भागात प्रवेश केल्यावर पुन्हा सांपडणें फार कठीण असतें. दिशा व वाटा

ह्यांचा आंत कांहींच पत्ता लागेनासा होतो आणि मग प्रत्येक गोपुरांत आपल्या चपला शोधीत एक मैलाचा तरी फेरफटका करावा लागतो.

तरी सुदैवानें येथें आंत प्रवेश करतांना कपडे काढून धोतर नेसावें लागत नाहीं. त्यामुळें आपल्या चपला व कपडेदेखील आपल्याला सांपडत नसल्याचा प्रसंग येत नाहीं.

चपला त्या माणसाच्या स्वाधीन करून पुढें सरकलें कीं, त्या बाजाराच्या गलक्यांतून मार्ग काढावा लागतो. देवाच्या दारांत बाजार ठेवण्याची आपली पद्धत जुन्या काळांत व्यावहारिक दृष्ट्या सोयीची असली, तरी आतां तिचा उपयोग राहिला आहे असें मला वाटत नाहीं. आणि व्यावहारिक सोय बाजूला ठेवली तर देवाच्या दर्शनाला जातांना खरेदीविक्रींत मन गुंतविणें अतिशय अनुचित वाटतें.

बाजारांतल्या दुकानदारांना चुकवून पुढें सरकलें कीं, नवखा मनुष्य कितीहि काळजीपूर्वक गेला तरी वाट चुकून गोंधळांत पडतो. शिल्पाच्या व बांधकामाच्या तो जंगलांतच सांपडतो. दोन दोन तीन तीन बाजूंना वाटा फुटतात. लहान लहान गोपुरांतून तो अधिकाधिक आंत जातो. लांबलचक अरुंद मार्गांनीं चालतच रहातो. आणि त्या मार्गावरचे असंख्य खांब मोजण्याचा प्रयत्न केला तरी चुकायला होतें. असंख्य खांबांनीं सांवरलेल्या मोटमोठ्या दालनांत तो गोंधळून इकडे तिकडे फिरत रहातो. आपण कुटच्या आणि किती देवांचें दर्शन घेतलें त्याची मोजदाद रहात नाहीं. तो सोन्याचे खांब पहातो. अधिकाधिक आंत जाऊन तो गाभाऱ्याजवळ पोहोंचतो आणि दर्शन घेऊन मागें फिरतो. कुठची तरी पालखी लटपटत खांद्यावरून घेऊन आरडाओरड करीत लोक त्याच्या समोरून इकडून तिकडे जातात. मध्येंच त्याला मोकळ्या जागा लागतात. मध्येंच एक तलाव लागतो. मग कांहीं वेळानें त्याला असा संशय येतो कीं, आपण ह्या ठिकाणीं थोड्या वेळापूर्वीच तर आलों नव्हतों? हा संशय खरा असूं शकतो आणि खोटाहि असूं शकतो. अशा संशयांत असतांना पहाणारा बाहेर पडण्याचा प्रयत्न करतो. आणि मग नशिबाप्रमाणें कमीअधिक चकरा खाऊन तो बहुधा चुकीच्या गोपुराजवळ येऊन पोहोंचतो.

ह्या देवालयांत फिरतांना मनुष्य दगडाच्या विश्वांत असतो. त्याच्या पायाखालीं दगडाची फरसबंदी असते. डोक्यावर दगडाचें छत असतें. आणि तें छत सांवरणारें, दगडी खांबांचें जंगल त्याच्याभोंवतीं असतें. दगडाच्या शिल्पाकृती तो पहातो. दगडाच्या ह्या बांधकामामुळें मनावर एक विशिष्ट परिणाम होतो. एखादा

पर्वत अगर एखादी नदी यांचें अस्तित्व जसें शाश्वत स्वरूपाचें वाटतें तसें हें देवालयहि शाश्वत स्वरूपाचें वाटतें. पांढऱ्या संगमरवरी दगडानें असा परिणाम होत नाहीं. पण ह्या देवालयांत वापरलेल्या दगडानें मात्र असा परिणाम होतो. आणि मग हें देवाचें घर आहे हें पटतें.

खांब, असंख्य खांब हें या देवालयाचें वैशिष्ट्य आहे. ह्या असंख्य खांबांच्या न संपणाऱ्या रांगा आणि इतर अनेक कौशल्यपूर्ण रचना येथें केलेल्या आहेत. हे खांब जसे अनेक आहेत तसे त्यांचे आकारहि अनेक आहेत. ह्या आकारांचें वर्णन शब्दांत कसें करावें तें कळत नाहीं. ह्या प्रत्येक खांबावर विविध शिल्पाकृती आहेत. नुसतीच नक्षी, निरनिराळे प्राणी आणि पुराणांतले स्त्रीपुरुष ह्या शिल्पांत दिसतात. खांब अनेक असले तर आमच्या देवांच्या जीवनांतले प्रसंग त्याहूनहि जास्त आहेत. ह्या देवालयांतील सगळेंच शिल्प चांगलें आहे असें मला वाटलें नाहीं. पण मुख्य गाभाऱ्याच्या पुढच्या दालनांतलें व तलावा-भोंवतींच्या मंडपांतलें शिल्प मला विशेष आवडलें. त्यातल्या कांहीं आकृती फारच रेखीव, टसटशीत आणि जीवनानें रसरसलेल्या वाटतात.

आपल्या देवळांतल्या खांबांच्या बुडांशीं पुष्कळदां विद्रूप अशीं माणसें कोरलेलीं असतात. तीं जणु कांहीं त्या खांबांच्या वजनाखालीं चिरडलीं गेलीं आहेत असें दाखवलेलें असतें. ज्यांना आपण राक्षस म्हणतों ते हे लोक असावे हें उघड आहे. पण राक्षस ही जमात खरोखर कोणती होती ? त्यांना जिंकणें आणि चिरडणें ह्या गोष्टीचें आपल्या पूर्वजांना एवढें महत्त्व कां वाटलें असावें ? कीं त्या विजयाची स्मृति परंपरेनें आपल्यापर्यंत चालत आलेली आहे ? राक्षस हें आतां एक प्रतीक झालें आहे. खांबाखालीं चिरडल्याप्रमाणें दिसणाऱ्या ह्या राक्षसांची मला तर दया आली. ते जर जिंकले असते तर त्यांनीं आपल्या पूर्वजांचीं अशींच चित्रें त्यांच्या देवालयांत काढलीं असतीं. एकंदरींत जो बलिष्ठ तो देव आणि जो दुबळा तो राक्षस !

हे असे खांब पाहून खरोखरच कंटाळा यावा. पण त्यांच्या रचनेंतील, आकारांतील व त्यांच्यावरील शिल्पांतील विविधतेमुळें तसें होत नाहीं. शिवाय नुसत्या भिंतींकडे पहाण्यापेक्षां खांबाच्या ओळींकडे पहाणें अधिक सुखदायक वाटतें. हे खांब कंटाळवाणे वाटत नाहींत, तर उलट देवालयाची भव्यता आणि विस्तार मनावर ठसवितात. त्या एवढ्या मोठ्या विस्ताराची. वैभवपूर्ण आणि विपुल अशी सजावट करतात.

अनेक दिव्यांनीं उजळलेले आणि आंत दूरवर गेलेले मुख्य गाभारेदेखील परमेश्वराची गूढता व पावित्र्य ह्यांचीं प्रतीकेंच वाटतात आणि बाहेरच्या भव्यतेतर मांगल्याचें लेणें खोदतात.

ह्या देवालयांतील अनेक दालनें व कॉरिडॉर्स आपल्या परीनें सुंदर आहेतच. पण त्यांत जो एक तलाव आहे, त्यानें त्याच्या सौंदर्याची विशेष खुलावट केलेली आहे. ह्या लांबट चौकोनी तलावाच्या चारी बाजूंना पायऱ्या बांधून काढलेल्या आहेत. आणि त्याच्या सभोंवार सुंदर शिल्पानें नटलेल्या खांबांचा मंडप आहे. ह्या मंडपाच्या कोंदणांत तो तलाव एखाद्या हिऱ्यासारखा वाटतो. दगडांच्या ह्या विश्वांत पाण्याचा हा चौकोन निराळीच नाजुक शोभा निर्माण करतो. त्याच्याजवळ एक उंच गोपुर आहे. त्या भव्य गोपुराची पार्श्वभूमि ह्या तलावाची नाजुक शोभा खुलवते. आणि त्याची छाया ह्या तलावांत पडून थरथरली म्हणजे स्थिरता व चंचलता, भव्यता व नाजुकपणा ह्यांचें सुंदर मिश्रण होतें.

शंकर आणि पार्वती हीं मुख्य दैवतें सोडल्यास त्या देवालयांत अनेक देव-देवता आहेत. ठिकठिकाणीं उंचसे चौथरे बांधलेले आहेत आणि त्यांवर देव व मुनी रांगेनें बसलेले आहेत. लोखंडी गराद्यांची चौकट संरक्षणार्थ त्यांच्याभोंवतीं ठेवलेली आहे. त्या गराद्यांच्या आड ते घाऊक प्रमाणावर बसलेले देव मोठे केविलवाणे दिसतात. त्यांच्या नांवांची गल्लत होऊं नये म्हणून त्यांच्या नांवांच्या त्यांच्या त्या तुरुंगांवर पाट्या लावलेल्या आहेत. त्यामुळें ‘ इयत्ता सहावी ब ’ वगैरे पाट्या असलेल्या एखाद्या शाळेची आठवण तें दृश्य करून देत होतें. त्या बंदिस्त जागेंतल्या पुष्कळशा देवांच्या निरनिराळ्या आरत्या, पूजा वगैरे चाललेल्या होत्या. त्यांच्या भक्तांचा स्वतंत्र वर्ग त्यांच्या दर्शनाला जात होता. आणि हे देव अपुरे होत होते म्हणून कीं काय, एखाद्या खांबावरच्या शिल्पाकृती-पुढें दिवटी तेवत ठेवून अगर इतर मार्गांनीं तिचें महत्त्व वाढविण्याचा प्रयत्न बैरागी करीत होते. देवांची ती गर्दी आणि ठिकठिकाणीं उभारलेल्या लोखंडी गजांच्या चौकटी ह्यांनीं त्या देवालयाची भव्यता व सौंदर्य ह्यांना उणेपणा येतो. हें देवालय नसून देवांचा Zoo आहे कीं काय असें वाटूं लागतें. ह्या असंख्य देवांच्यापुढें नमस्कार करून आपली हजेरी रोज लावणारे भक्त आम्हांला दिसले. त्यांच्या श्रद्धेचें आणि नियमाचें कौतुक वाटल्याशिवाय रहात नाहीं !

ह्या देवळाचीं तीं गोपुरें, तेथला तो तलाव आणि तें शिल्प पाहून, मनुष्य

आपल्या हातांतला कॅमेरा घेऊन साहजिकच पुढें सरसावतो व फोटो घेऊं पहातो. पण त्यानें कॅमेरा सरसावला कीं तेथला एखादा शिपाई पुढें धावतो आणि त्याला अडवून म्हणतो, " फोटो काढायचा असेल तर पहिल्यानें परवानगी घेऊन या."

पण परवानगी कुठें मिळते ह्याबद्दल जर तुम्हीं चौकशी केलीत तर त्याला नीटसें उत्तर कोणाकडून मिळत नाहीं. कोणी म्हणतो कीं, देवळाच्या दाराशींच मिळते; कोणी म्हणतो कीं, बाहेर कुठें तरी ऑफिस आहे; तर कोणी म्हणतो कीं, अमक्या त्या माणसाला भेटा. मग एखाद्या तामिळी माणसानें तुमच्या-करितां रदबदली केली कीं शिपायाला दया येते. तो म्हणतो, " साहेब! मी बघत असतांना तुम्हीं फोटो काढलेत तर मी तुम्हांला अडवणारच. पण माझी पाठ फिरलेली असतांना जर..."

तुम्ही हसतां. तो मात्र हसत नाहीं. तो पुन्हा आपण नियमाप्रमाणेंच वागणार असें सांगतो. पण पाठ फिरलेली असतांना कोणीं कांहीं गुन्हा केला तर त्याला त्याचा काय इलाज?

त्या एवढ्या मोठ्या देवळांत माणसांची नेहमींच गर्दी असते. तेथल्या असंख्य देवांना भाविकांची कमतरता कधींच पडत नाहीं. पण येथें गर्दी असते ती मात्र नुसती भाविकांची नव्हे. ह्या देवालयाचा धर्मशाळा म्हणूनहि उपयोग केला जातो. एखाद्या खांबाच्या अगर चौथऱ्याच्या आडोशाला आरामांत हात उशाला घेऊन झोंपलेले अनेक लोक तेथें दिसतात. भिकारी तर सारखी अडवणूक करीत असतात. आणि रिकामटेकड्या लोकांचीं टोळकीं देवाचिये द्वारीं थट्टामस्करी आणि कुटाळक्या करीत बसलेलीं पाहिलीं म्हणजे चमत्कारिक वाटतें. एके ठिकाणीं तर जुगारहि खेळला जात असावा असा मला संशय आला. असें असल्यामुळें देवळांत पोलीस फिरत असावेत हें योग्यच होतें. एकदां वाटतें कीं, ह्या सगळ्या रिकामटेकड्या, उडाणटप्पू आणि अपंग व भिकारी लोकांना तेथील अधिकाऱ्यांनीं देवळांतून हाकून द्यावें आणि तेथलें वातावरण शांत आणि पवित्र असें करावें. पण नंतर वाटतें कीं, हे बापडे लोक जाणार तरी कुठें? देवाच्या घरांत त्यांना आसरा मिळावा हें योग्यच आहे. नव्हे, त्या घरावर त्यांचा विशेष हक्क आहे. शिवाय मन शुद्ध करून देवळांत जाणाऱ्यांच्या नजरेस हे पडले तर त्यांना ह्यांच्याविषयींच्या आपल्या जबाबदारीची जाणीव होईल. आणि तसें पाहिलें तर देवानेंच ह्यांना निर्माण केलें! आपण

काय निर्माण केलें आहे तें त्याला कळलें तर तें कांहीं वाईट होणार नाहीं.

अखेर फिरून फिरून दमलेला आणि भागलेला, शिल्पकलेच्या विविध आणि विपुल दर्शनानें तृप्त झालेला—नव्हे, विटलेला—माणूस त्या देवालयांतून बाहेर पडतो. त्याची रसिकता आणि आश्चर्य करण्याची शक्ति संपलेली असते. त्याचा जीव नुसता उबून जातो. त्या भव्यतेपासून, विपुलतेपासून आणि श्रद्धेपासून दूर पळावें असें त्याला वाटूं लागतें. पुन्हा आपल्या नेहमींच्या लहान जगांत परतावें अशी त्याला उत्कंठा लागते. ज्यावर शिल्पाकृति नाहीं असा एखादा नगरपालिकेचा दिव्याचा खांब पाहिला तरी त्याला बरें वाटतें. नुसतें आकाश, नुसतीं झाडें, नुसता स्वच्छ सूर्यप्रकाश ह्यांनीं त्याच्या मनाला प्रसन्नता वाटूं लागते.

एका कल्पित विश्वांतून तो बाहेर पडलेला असतो. आपल्या मनांतलें त्या देवालयाचें प्रतिबिंब तो मोडून टाकतो. अखेर तो भव्य असला तरी भातुकलीचाच प्रकार आहे असें त्याला वाटूं लागतें.

आणि तरी तो आश्चर्य करीत असतो. देव आणि धर्म ह्यांच्या कल्पना माणसानें कां निर्माण केल्या ? त्या कल्पनांवर त्यानें इतकी दृढ आणि आर्त श्रद्धा कां ठेवली ? प्रचंड शिलांच्या राशी त्यानें हलवल्या. अविश्रांत मेहनत करून त्यांतून देवालय उभारलें. त्या देवालयाचा कोपरान् कोपरा—मग तो अंधारांत लपलेला असो, अगर लोकांच्या दृष्टीला न पडण्यासारखा असो—शिल्पाकृतींनीं झांकून टाकला. कशाकरितां केलें त्यानें हें ? असें करून त्याला कोणतें खोल समाधान लाभलें ? आणि ह्याला भातुकलीचा खेळ म्हटलें तर जीवनाचा बराचसा भाग म्हणजे भातुकलीच आहे असें नाहीं का म्हणावें लागणार ? अशी भातुकली माणूस खेळूं शकतो हें त्याचें वैशिष्ट्य नव्हे काय? ह्याच्यांतच त्याचा मोठेपणा नाहीं का ?

ह्या प्रश्नांचीं उत्तरें जो तो आपल्या बुद्धीप्रमाणें व वृत्तीप्रमाणें देईल; पण हे प्रश्न मीनाक्षीचें देवालय मनांत उत्कटतेनें निर्माण करतें ह्यांतच तें बांधणाऱ्यांचा मोठा विजय आहे.

मीनाक्षीचें देवालय आम्हीं दोनदां पाहिलें. दुसऱ्या दिवशीं तें पाहून झाल्यावर आम्हांला आणखी कांहींच करायचें नव्हतें आणि आपली त्रिचनापल्लीला जाणारी गाडी तर संध्याकाळीं सुटायची होती. आणि आमच्या त्या हॉटेलांतल्या भिकार खोलींत बसण्यापेक्षां, स्टेशनच्या वेटिंग रूममध्येंच आरामशीरपणें वेळ काढणें बरें असा विचार करून आम्ही सामान घेऊन

स्टेशनवरच गेलों. पाऊस अर्थात् पडत होताच. आम्ही पुन्हा पुन्हा भिजलों व वाळलों होतों. स्टेशनवर आम्हीं इंग्रजी पद्धतीचें जेवण घेतलें.

तसें पाहिलें तर इंग्रजी पद्धतीचें जेवण आपल्याला बेचवच लागतें आणि महागहि पडतें. पण प्रवासांत आम्हीं बहुतेक त्याच पद्धतीचें जेवण घेतलें. त्या पद्धतीच्या हॉटेलमधलें वातावरण नेहमीं प्रसन्न असतें. पाकगृहांत नसली तरी निदान बाहेर तरी परीटघडीची व चकचकीत स्वच्छता असते. बोलण्या-वागण्याचे कांहीं नियम तेथें सर्वत्र चालत असतात आणि तेथील वेटर कांहीं एका विशिष्ट शिस्तीनें व अदबीनें वागत असतात. जेवणाचें तें एक दुकान आहे असें वाटत नाहीं आणि म्हणूनच तेथें जेवावेंसें वाटतें.

इंग्रज लोक गेले खरे, पण त्यांच्या कांहीं चालीरीती अजून सुदैवानें आपल्या-जवळ राहिल्या आहेत. त्यांची जपणूक आपण केली तर फार बरें होईल.

दोन दिवस तेथें गेल्यामुळें तेथील एका वेटरशीं आमची थोडी जानपछान झाली होती. जेवण झाल्यावर आम्हीं त्याची जरा चौकशी केली. त्याबरोबर त्याची सारी इंग्रजी शिस्त गळून पडली आणि तो म्हणाला, "काय करायचें, साहेब ? दिवस फार वाईट आहेत. आतां ह्या उतार वयांत मला हें वेटरचें काम करावें लागत आहे. पोटापुरतादेखील येथें पगार मिळत नाहीं. मोठमोठ्या साहेबांकडे कामें केलेलीं आहेत मीं. सगळ्या इंडियांत हिंडलोंय्. विलायतेलादेखील गेलों होतों एका साहेबाबरोबर. फार चांगला होता तो. शिव्या खूप द्यायचा. सारखें 'bloody' आणि 'rascal' म्हणायचा, पण पैसेहि खूप द्यायचा. आतां मात्र सगळे साहेब लोकच गेले येथून. आणि हें काम नशिबीं आलें माझ्या."

विलायतेला जाऊन आलेला हा प्राणी दारिद्र्यांत खितपत होता. साहेब लोकांच्या विश्वांत जगलेला आणि रुळलेला हा माणूस आतां पोरका झाला होता.

त्याला आम्हीं चांगलीशी टिप दिली. आणि मग टिवल्याबावल्या करीत स्टेशनवर वेळ काढला.

पॅसेंजर गाड्या भपकारत, शिट्या वाजवीत आल्या आणि गेल्या. माल-गाड्यांचें शंटिंग पुन्हा पुन्हा चाललें होतें. आमचेंहि स्टेशनवर तसेंच कांहीं तरी चाललेलें होतें. आम्ही दोघे एकमेकांशींहि फारसें बोलत नव्हतों ! काय बोलणार ? विषय सगळे संपून गेले होते.

प्लॅटफॉर्मवर तसें फिरतांना प्रवासाविषयींचा सगळा उत्साह माझ्या मनांतून

निघून गेला. धावपळ करणें, गाड्या पकडणें, हॉटेलें धुंडाळणें ह्या गोष्टींत जें नावीन्य वाटत होतें, धाडसाचा आनंद वाटत होता तो आतां वाटेनासा झाला होता. हें सगळें संवयीचें झालें होतें आणि खरोखर किती कंटाळवाणें आहे तें समजूं लागलें होतें. घरीं जाऊन तंगड्या ताणून एखादें पुस्तक वाचीत बसावें असें वाटूं लागलें. ज्या पुस्तकांना कंटाळून मी बाहेर पडलों होतों तींच आतां मला बोलावत होतीं.

अखेर दुपारनंतर आमची गाडी आली आणि आम्ही त्रिचनापल्लीला निघालों.

वाटेंत पाऊस पुन्हा पुन्हा लागत होता. शेतांनून पाणी सांठलें होतें आणि त्यांतून हिरव्या काड्या डोकावत होत्या. वाटेंत आम्हांला कोडाई कनाल स्टेशन लागलें. तेथून मोटारनें कोडाई कनालला जातां येतें. कोडाई कनाल हें जगांतलें एक उत्कृष्ट हवेचें ठिकाण समजलें जातें. त्या स्टेशनवर पावसांत भिजत, तोंडाला चटके देणारी कॉफी प्यायला गंमत वाटली.

पावसाचें दाटलेलें सौंदर्य त्या भागांत पहायला मिळालें. डोंगरांच्या कुशी-कुशींतून ढग विसांवले होते. पावसाच्या धुक्याची तलम मलमल सर्वत्र पसरली होती. पाऊस तिरप्या रेपांनीं पडत होता. शेतांनून पाण्याच्या चादरी पसरल्या होत्या. ओलावा सर्वत्र निथळत होता. बालकवींची कविता तेथें स्फुरत होती.

रात्रीं आमची गाडी त्रिचनापल्लीला पोहोंचली. मर्ढेकर मोटार घेऊन स्टेशनवर आले होते. त्यांच्याबरोबर त्यांच्या घरीं गेलों.

मर्ढेकर हे अलिप्त आणि अबोल गृहस्थ आहेत. आपल्या स्नेह्यांशीं ते प्रेमळपणें वागतात. पण त्याच्यांत आणि इतरांच्यात निकटपणा निर्माण होऊं शकत नाहीं. स्वतःच्या जीवनाचा बराच भाग त्यांनीं कड्याकुलुपांत बंद करून ठेवला आहे असें वाटतें. अर्थात् ह्याबद्दल तक्रार करण्याचें कोणालाच कारण नाहीं.

एखाद्या बड्या सरकारी अधिकाऱ्याचें घर जसें असतें तसें मर्ढेकरांचें असेल अशी माझी कल्पना होती. पण घरांत प्रवेश करतांच मला आश्चर्याचा धक्का बसला. आम्हीं एखाद्या संन्याशाच्या मठींतच प्रवेश केल्यासारखें आम्हांला वाटलें. घरांत अगदीं मोजकें फर्निचर होतें, आणि दिल्लीहून आलेले सामानाचे पेटारे तसेच न उघडतां पडलेले होते.

जेवण झाल्यावर मर्ढेकरांचा नोकर निघून गेला. आम्ही अंमळ बसलों. मर्ढेकर पाईप ओढीत फेऱ्या घालीत होते.

मीं विचारलें, "फावल्या वेळांत तुम्ही काय करतां ? इकडच्या लोकांशीं तुमची ओळख झाली असेल."

ते म्हणाले, "छे. मी कोणांतच मिसळत नाहीं. ते क्लब आणि तें ब्रिज खेळणें कांहीं आपल्याला मानवत नाहीं."

मीं म्हटलें, "मग काय, नुसते सिनेमा पहातां आणि वाचत बसतां कीं काय ?"

ते म्हणाले, "काय बघायचें त्या सिनेमांत ? ऑफिसांत बराच वेळ काढतों. थोडेंसें वाचतों आणि मग पाईप ओढीत अशा फेऱ्या मारतों. झोंप येईपर्यंत रोज अशा फेऱ्या मारतों."

"असें कसें बुवा चालतें तुमचें ?"

"संवय झाली आहे मला."

आणि पाईप ओढीत ते पुन्हा फेऱ्या मारूं लागले.

दुसऱ्या दिवशीं आम्ही तेथील टेकडीवरचें देऊळ पहायला गेलों. एका टेंगण्याशा टेकडीवर हें देऊळ आहे. ही टेकडी सगळी एका खडकाचीच आहे. आजूबाजूला इतर डोंगर नसल्यामुळें ही टेकडी उठून दिसते, आणि त्यामुळेंच तिला महत्त्व आलेलें असावें.

नेहमींप्रमाणें देवालयाभोंवतीं तटबंदी आहे आणि त्याचें प्रवेशद्वार अगदीं ऐन बाजारांतच आहे. ह्या तटबंद्या पाहून मला असा संशय येऊं लागला कीं, पूर्वींचे राजे ह्या देवळांचा किल्ल्यांसारखा उपयोग करीत असावे. देवळें बांधून पुण्यसंचय व स्वसंरक्षण ह्या दोन्ही गोष्टी साधीत असावे.

देवालयाच्या द्वाराशींच विघ्नेश्वराची मूर्ति आहे. गणपतीला इकडे विघ्नेश्वर म्हणतात. आपण त्याला विघ्नहर्ता म्हणतों. मला वाटतें कीं, पहिल्यानें गणपति हा विघ्नें आणणारा एक शनीसारखा दुष्ट देव असावा. त्याचें रूप तसें पाहिलें तर विचित्र आणि भीतिदायक आहे. पण नंतर तो विघ्नहर्ता झाला असावा. आणि शांत, सुस्वभावी व खादाड देव अशी जी त्याच्याविषयींची आपली कल्पना ती अलीकडेच निर्माण झाली असावी. त्याचें मूळचें भीतिदायक रूप आतां आपल्याला गमतीदार वाटतें.

असो. विघ्नेश्वरापुढून जातांना बूट काढले आणि मग पायऱ्या चढतांना पुन्हा पायांत घातले. ह्या पायऱ्यांच्या बाजूस व वर दगडी बांधकाम आहे. त्यामुळें पायऱ्या चढतांना आजूबाजूचें कांहीं दिसत नाहीं. परमेश्वराकडे जातांना

इतर गोष्टींवरचें लक्ष काढून फक्त त्याचेंच चिंतन करावें लागतें, असें ह्यांतून सूचित केलेलें आहे कीं काय, कोण जाणे ?

मात्र वाटेंत छोटीं छोटीं गवाक्षें आहेत. त्यांतून सूर्यप्रकाशानें न्हालेलें बाहेरचें जग फार सुंदर दिसतें. अंधारातून पाहिल्याशिवाय सूर्यप्रकाशाचें खरें सौंदर्य कळत नाहीं हेंच खरें. ह्या गवाक्षांच्या द्वारें, किती आकर्षक गोष्टींचा त्याग करून माणूस देवाकडे जात आहे याची त्याला आठवण करून दिली आहे. आणि जणुं सुचवलें आहे कीं, ह्या जगाचा लोभ वाटत असला तर अजून मागें फिर. परमेश्वराजवळ जाण्याची कोणावरच सक्ति नाहीं.

पण शहाणा माणूस त्या गवाक्षांतून बाहेर पहात असा निष्कर्ष काढतो कीं, जवळून जितकें जग बरें दिसत नाहीं, तितकें आतां लांबून दिसत आहे. आणि परमेश्वराच्या जितकें अधिक सन्निध जावें तितकें तें अधिक सुंदर दिसूं लागेल. तेव्हां त्यांतलें खरें सौंदर्य समजायचें असेल तर परमेश्वराच्या जवळच गेलेलें बरें. आणि म्हणून तो पुढें चढूं लागतो.

ही आपली कल्पना झाली. खरें म्हटलें म्हणजे गवाक्षांतून बाहेर बघण्याच्या निमित्तानें माणूस अंमळ श्वास घेतो आणि मग पुढें चालूं लागतो.

वाटेंत आम्हांला देवाच्या पालख्या वगैरे सामान ठेवलेलें एक दालन लागलें. पण त्यांत प्रवेश करायचा म्हणजे बूट काढावे लागतील हें कळतांच आम्हीं बाहेरून आंत डोकावूनच समाधान करून घेतलें. देवाचा सरंजाम पाहून देव म्हणजे एक छोटासा संस्थानिक असावा असें वाटलें.

नंतर आम्हांला टेकडीवरचें शंकराचें मुख्य देवालय लागलें. त्याला बगल देऊन (आणि मला वाटतें, बूट काढण्याचा एकदां कार्यक्रम करून) आम्ही वर सटकलों. कारण टेकडीच्या अगदीं वरच्या टोंकाला गणपतीचें देऊळ आहे. शंकराचें देऊळ सोडल्यावर पुढेंच एक खडकांत खोदलेली छोटी गुहा लागते. त्या गुहेंतलें शिल्प अर्धवटच राहिलेलें आहे. इथपासून पुढें पायऱ्यांवर छप्पर नाहीं. त्यामुळें भोंवतालचें सुंदर दृश्य एकदम नजरेस पडतें. परमेश्वराच्या इतक्या सन्निध आल्यावर, भक्तावरचीं बंधनें काढून घ्यायला हरकत नाहीं, असा तर ह्याचा अर्थ नव्हे ? मात्र येथल्या पायऱ्या झिजलेल्या आणि फसव्या आहेत. परमेश्वरप्राप्तीचा मार्ग नाहीं तरी असाच निसरडा असतो.

ह्या ठिकाणाहून आजूबाजूचें दृश्य फारच सुंदर दिसतें. सूर्यप्रकाशांत न्हालेली त्रिचनापल्ली मोठी सुबक आणि शोभिवंत दिसते. पश्चिमेच्या बाजूला कावेरीचें

पात्र पसरलेलें आहे, आणि दूर पलीकडे दुसऱ्या नदीचें पात्र अस्पष्टपणें दिसतें. त्यांत रेतीचीं छोटीं बेटें मधून मधून उमटलेलीं आहेत. कावेरीवरचे दोन पूल तेथून खेळण्यांसारखे दिसतात. आम्हीं पाहिलें तेव्हां तिच्या दोन्ही तीरांवर चौकोनी शेतांत पोसलेलीं पिकें उभीं होतीं. ठिकठिकाणीं झाडें झुपक्यांनीं उभीं होतीं. आणि उन्हानें तें सारेंच दृश्य उजळून निघालें होतें.

वरचें गणपतीचें देऊळ लहानसें आहे. इतक्या उंचावर आहे हेंच त्याचें वैशिष्ट्य ! बूट काढून आम्हीं तें पाहिलें, बूट चढवून खालीं उतरलों आणि पुन्हा खालच्या देवळांत जाण्याकरितां बूट काढले.

खालच्या मोठ्या देवालयांत शंकराचें स्वयंभू लिंग आहे. सहा तोंडांच्या कार्तिकस्वामीची तेथें मूर्ति आहे व दगडाची एक सांखळी आहे. हीं त्याचीं मला आणखी वैशिष्ट्यें वाटलीं. नेहमींप्रमाणें तेथें देवांची आणि मुनींची मोठी फौज आहे. स्वयंपाकघरांतील फळीवरच्या डब्यांप्रमाणें ते मांडून ठेवलेले आहेत.

देवळाचा हत्ती आम्हांला मध्येंच दिसला. त्याच्या माहुताच्या सूचनेवरून त्यानें आम्हांला सोंडेनें गळ्यांतली घंटा वाजवून दाखवली आणि सोंड उभारून सलाम केला. हत्तीनें सलाम केल्यामुळें माझा स्वतःविषयींचा आदर दुणावला. नीटसें आटवत नाहीं, पण मला वाटतें, प्रधाननें हत्तीला प्रतिसलाम केला. हत्तीचा फोटो काढायचें प्रधानच्या मनांत होतें. पण हत्तीला पोज़् घ्यायला लावण्यास आपण एक रुपया घेऊं असें माहुतानें सांगितल्यामुळें तें रद्द करावें लागलें !

बूट चढवण्याचा पुन्हा एकदां कार्यक्रम झाला.

एवढ्या व्यायामानंतर खालीं आल्यावर रसरशीत गरे घेऊन खायची इच्छा व्हावी हें साहजिकच आहे.

दुपारीं आराम केला. मर्ढेकरांच्या घरांत असलेली रामदासांची तसबीर पाहून गंमत वाटली. कुठें रोखठोक व्यवहारी रामदास आणि कुठें नवकवि मर्ढेकर ! रामदासांच्या शिष्यशाखेंत म्हणे मर्ढेकराचे पूर्वज होते. आपल्या शिष्यशाखेंतून पुढें हा ' मूपक कवि ' निर्माण झाला आहे हें कळलें तर रामदास स्वर्गांतदेखील जीव देण्याचा यत्न करील.

संध्याकाळीं मर्ढेकरांच्याबरोबर फिरायला गेलों. शांत एकांत जागीं त्यांनीं मोटार नेऊन थांबविली. तांबड्या माळावर खुरटलेलें गवत कुठें कुठें वाढलें होतें आणि उंच ताड ठिकठिकाणीं उभे होते. एका ढगाचा पंजा सूर्यावर ठेवलेला होता. त्यामुळें सूर्यप्रकाशाचे फवारे नुसते आकाशांतच उंच उडाले

होते आणि ते अंगावर उडून ढग शेंदरी झाले होते. अगदीं मावळतांना सूर्य नजरेस पडला. आपलें म्लान उन्ह त्यानें एकदां त्या तांबड्या माळावर पाडलें आणि मग तो क्षितिजाखालीं बुडाला. उन्ह गेलें आणि ढगांवरची शेंदरी छटा काय ती मागें रेंगाळली.

जरा रेंगाळून आम्हीहि परत फिरलों.

दुसऱ्या दिवशीं आम्ही पुन्हा देवळें बघायच्या मोहिमेवर निघालों. मर्ढेकरांनीं बरोबर दिलेला ड्रायव्हर फार भाविक दिसला. त्यानें मोठ्या आस्थेनें आम्हांला देवळें दाखवलीं. गर्दीमुळें न घडणारें देवाचें दर्शन घेण्याकरितां आम्हांला थांबण्यास भाग पाडलें आणि मुख्य म्हणजे भिकाऱ्यांपासून व देवळांत पैसे काढणाऱ्या इतर लोकांपासून आमचें संरक्षण केलें.

कावेरीवरचा पूल ओलांडून आम्ही पहिल्यानें रंगनाथाचें देऊळ पहायला गेलों. श्रीरंगाचें देवालय केवळ प्रचंड आहे. मीनाक्षीच्या देवालयाहूनदेखील तें मोठें आहे. अर्ध्या चौरस मैलाएवढा त्याचा विस्तार आहे. लहानमोठीं आणि कांहीं अपुरीं राहिलेलीं अशीं मिळून त्याचीं एकवीस गोपुरें आहेत. एकाबाहेर एक अशा सात आवाराचें तें देऊळ बनलेलें आहे. त्यांतलीं जीं बाहेरचीं तीन आवारें आहेत तीं बरींचशीं बाजार व वस्ती यांनींच भरून गेलेलीं आहेत. आंतल्या चार आवारांत देवालयाचे मुख्य भाग आहेत. तेवढ्या भागांतून हिंडायचें म्हणजेदेखील पाय मोडून जातात.

एवढें मोठें देवालय एकदम बांधलें गेलें असणें शक्य नाहीं. तीन चार शतकें त्याचें बांधकाम चाललें होतें. तेराव्या शतकांतले पांड्य राजे, नंतर विजयनगरचे राजे आणि अखेर नायक राजे ह्यांनीं हें देवालय बांधलें. नायक राजांची त्रिचनापल्ली ही दुसरी राजधानी होती. आपल्या राजधानींतल्या या देवळाचा बराचसा भाग त्यांनींच बांधलेला आहे.

ह्या देवालयाचें एक वैशिष्ट्य म्हणजे तें नेहमींप्रमाणें पूर्वाभिमुख नसून दक्षिणाभिमुख आहे.

पहिल्या दोनतीन गोपुरांतून आमची मोटार आंत गेली. तेथल्या आवारांत बाजाराची गर्दी झालेली होती. पुढें मात्र आम्हांला पायींच फिरावें लागलें. तेथेंहि मोटार जाऊं शकली असती तर काय बहार झाली असती! आम्हीं प्रवेश केला त्या द्वाराजवळ दोन मोठ्या प्रणाम करणाऱ्या मूर्ती आहेत. इतिहासांतल्या चित्रांत चंदासाहेबचा जसा पोषाख दाखवतात तसा त्यांचा पोषाख आहे.

आंत देवापुढें लोटांगण घातलेल्या स्थितींत जमिनीच्या फरशीवर दोन बारक्याशा माणसांच्या आकृती कोरलेल्या आहेत. एका रेघेला खालीं दोन पायांचे फाटे फोडून, दोन्ही बाजूंस दोन हातांच्या तिरक्या रेषा चिकटवून वर एक पूज्य काढून, आपण माणसाचें चित्र काढतों ना, तशा त्या आकृती आहेत. शिल्पाच्या त्या भव्य विलासांत, त्या दोन आकृतींनीं माझें लक्ष वेधून घेतलें. त्या काढणाऱ्या शिल्पकाराविषयीं सहानुभूति वाटली.

आंत गेल्यावर देवालयाच्या रचनेविषयीं स्पष्ट कल्पना करून घेण्याचा आम्हीं प्रयत्नच केला नाहीं. खांबांच्या त्या जंगलांतून आम्ही ड्रायव्हरच्या मागोमाग हिंडलों—हिंडलों म्हणण्यापेक्षां फरफटत गेलों. अनेक मंडप व दालनें आम्हीं पायाखालीं तुडविलीं.

'अनन्तशयनम्'च्या मूर्तीचें आम्हाला दर्शन घडलें नाहींच. पहिल्यानें गेलों तेव्हां गाभारा बंद होता आणि नंतर गेलों तेव्हां भाविकांची गर्दी होती. मेंढरांप्रमाणें पुजारी त्यांना आंत सोडीत होते आणि थोड्याच वेळांत बाहेर काढीत होते. आम्हीं स्वतःवर असा अत्याचार करून घ्यावा अशी जरी त्या ड्रायव्हरची इच्छा होती, तरी त्या गोष्टीला आमची तयारी नव्हती. म्हणून आम्हीं त्या गाभाऱ्याचा सोनेरी कळस पाहूनच परत फिरलों. मात्र अनन्तशयनमाचें नाहीं तरी त्याच्या सहचारिणीचें दर्शन आम्हांला घडलें. येथेंहि उर्मट पुजारी लोकांना मेंढरांप्रमाणें आंत सोडीत होते व बाहेर हांकत होते. पण आम्हांला जरा त्यांनीं नीटपणें वागवलें. आम्हांला तीर्थप्रसाद वगैरे दिला व डोक्यावर एक सोन्याची टोपी घातल्यासारखें केलें. मग दक्षिणा घेऊन पुन्हा निराळ्या प्रकारें टोपी घातली.

देवालयाच्या आवारांत एक सूर्यपुष्करिणी व दुसरा चंद्रपुष्करिणी असे दोन तलाव आहेत. पण मीनाक्षीच्या देवळांतला तलाव जशी शोभा वाढवतो, तसें इथें होत नाहीं.

देवालयांत शिल्प पुष्कळ आहे, तें सुंदरहि असावें, पण शिल्प पाहून पाहून आमच्या नजरा मरून गेल्या होत्या. त्यामुळें त्याचें सौंदर्य मनावर फारसें परिणाम करूं शकलें नाहीं. त्रिवेंद्रमच्या पद्मनाभस्वामीच्या देवळांत जशीं उत्तान. शृंगाराचीं व संभोगाचीं शिल्पचित्रें आहेत तशीं येथेंहि आहेत. आणि तेथल्याप्रमाणें येथेंहि त्या आकृतींच्या गुप्तेंद्रियांवर खड्डूनें खुणा केलेल्या आहेत. केवढी रसिकता! केवढी भाविकता!

येथील अश्वमंडपानें मात्र आमच्या मरगळलेल्या नजरादेखील वेधून घेतल्या. ह्यामध्यें दर खांबांत मागच्या दोन पायांवर उभ्या राहिलेल्या घोड्यांवर बसलेल्या स्वारांच्या आकृती आहेत. ते स्वार आपल्या हातांतल्या तरवारीनें शिकार करीत आहेत, लढाई करीत आहेत. एके ठिकाणीं खवळून अंगावर धांवून आलेल्या वाघाच्या कुशींत स्वारानें तरवार खुपसली आहे आणि त्या तरवारीचें टोंक दुसऱ्या बाजूनें बाहेर आलेलें आहे. अशा प्रकारच्या आकृती आम्हीं विजयनगरला पाहिल्या होत्या. हा मंडपदेखील विजयनगरच्या राजांनींच बांधलेला आहे. तेथील आकृतींतून जो उन्मत्त पराक्रम आणि जी जीवनांतील गतिमानता व्यक्त होते ती मला फार आवडते.

श्रीरंगाचें हें देवालय पाहून नंतर आम्ही तेथून एक मैल दूर असलेलें जंबुकेश्वराचें देवालय पहायला गेलों. जंबुकेश्वर म्हणजे शिव. जवळ जवळ असलेलीं हीं देवालयें पाहून शैव व वैष्णव ह्यांचीं देवालयें बांधण्यांत स्पर्धा होती कीं काय असें मला वाटूं लागलें. ह्या स्पर्धेनें परस्परांचीं देवळें फोडण्याचें स्वरूप घेतलें नाहीं हें हिंदु धर्माचें अभिमानास्पद वैशिष्ट्य !

हें देऊळ बरेंच लहान आहे. ह्याला एकाबाहेर एक अशीं चार आवारें आहेत. बाहेरचीं दोन मोकळींच आहेत. आंतल्या आवारांत मात्र मंडप वगैरे आहेत. रचनेच्या दृष्टीनें हें बांधेसूद वाटलें व अधिक सुंदरहि वाटलें. आंतला गाभारा काळ्या पाषाणाचा असून विशेष सुंदर आहे.

पण देवळें पाहून आम्ही इतके हैराण झालों होतों कीं, तें सौंदर्य पहायला आम्ही थांबलों नाहीं. सरळ बाहेर पडून हॉटेलमध्यें चमचमीत खाल्लें. रात्रीं आम्हीं त्रिचनापल्ली सोडली.

## : १७ : मद्रास

गुंटकल सोडल्यापासून आम्हांला गर्दीचा त्रास झाला नव्हता. पण त्रिचनापल्ली ते मद्रास या प्रवासांत गाडी गच्च भरून गेली होती. त्यामुळें प्रधानला अंगाची जुडी करून बाकावर मिळालेल्या जागेंत झोंपावें लागलें. आणि मीं एका फटींत होल्डऑल पसरून अंगाचें अर्धवर्तुळ करून झोंपलों. प्रधानची टणक आणि विचित्र आकाराची उशी डोक्याखालीं होती. त्यामुळें सकाळीं बाकी सगळें शरीर सरळ झालें तरी मान मात्र तिरकीच राहिली !

झोंपहि तितकीशी नीट लागली नाहीं. कारण रात्रीं बराच वेळ एक गृहस्थ गाडींतल्या मुलांना कविता म्हणायला लावून स्वतःची करमणूक करून घेत होता !

सकाळीं आम्ही एगमोर स्टेशनला पोहोंचलों. मद्रासमध्यें मुख्य स्टेशनें दोन. एक साउथ इंडियन रेल्वेचें एगमोर आणि दुसरें एम्. एस्. एम्. चें मद्रास सेन्ट्रल. एगमोर स्टेशनवर बॉम्बे सेन्ट्रलप्रमाणें औदासीन्याची अवकळा आहे. रेल्वे स्टेशन म्हणजे धावपळ व गर्दी ह्यांचें ठिकाण. जीवन तेथें विशेष गतिमान असतें. त्याच्या बांधणीनें औदासीन्य निर्माण करावें हें चमत्कारिक वाटतें. त्या मानानें मद्रास सेन्ट्रलनें बोरीबंदरचा रुबाब बराच उचलला आहे. पण बोरीबंदर तें बोरीबंदर. त्याची रचना, तेथील उजेड, स्वच्छता व लखलखीतपणा आणि चटपटीत वातावरण ह्यामुळें प्रवासाला जावेंसें वाटतें. मन विलक्षण प्रसन्न होतें.

मद्रासला आम्ही मॉडर्न हिंदु हॉटेलमध्यें उतरलों. पण म्हैसूरला ह्या हॉटेलच्या शाखेनें आमची जशी बडदास्त ठेवली होती तशी येथें ठेवली गेली नाहीं. शिवाय सारखें सारखें हॉटेलांत राहिलें कीं तेथल्या वातावरणाची घृणा वाटूं लागते. ह्या खोल्यातून अनेक माणसें राहिलीं असतील, ह्या बिछान्यांत अनेक माणसें झोंपलीं असतील, ह्या ताटांत अनेक माणसें जेवलीं असतील, ही गोष्ट फार तीव्रतेनें जाणवूं लागते आणि त्यामुळें किळस येतो.

प्रातर्विधि उरकून आम्ही शक्य तों लवकर हॉटेलांतून बाहेर पडलों आणि शक्य तों उशिरां तेथें परतलों. बाहेर पडल्यावर नेहमींप्रमाणें आम्ही मद्रास सेन्ट्रलला गेलों. आणि तो मध्यबिंदु कल्पून निरनिराळ्या ठिकाणीं फिरलों. पहिल्यानें आम्ही थिऑसॉफिकल सोसायटीच्या अड्यार येथील छोट्या वसाहतींत

जाऊन आलों. मद्रास सेन्ट्रलपासून तें सहा सात मैल दूर आहे. तेथें जायला बसगाड्या मिळतात. मद्रासमध्यें बसगाड्या पुष्कळ फिरत असतात. पण मुंबईच्या बसगाड्यांप्रमाणें त्या आरामशीर आणि ऐटबाज नाहींत. बसमधलें वातावरण एकंदर घरगुती असतें. कंडक्टरच्या अंगावर युनिफॉर्म नसतो. असला तर तो विलक्षण मळका असतो आणि तोंडानेंच शिटी वाजवून तो ड्रायव्हरला इशारे देत असतो. बसमध्यें किती माणसांनीं चढावें ह्याचा तसा धरबंध दिसला नाहीं. आणि रांगेत उभें रहायची मुंबईची पद्धत तर ह्या लोकांना माहीतच नव्हती. बऱ्याच प्रयत्नानंतर आम्हांला बसमध्यें जागा मिळाली आणि आम्ही अड्यारच्या दिशेनें निघालों.

मद्रास शहरांत आणि मुंबई शहरांत पुष्कळ साम्य आहे. वाटेंत आम्हांला जेव्हां माउंट रोड लागला तेव्हां मुंबईच्या हॉर्नबी रोडची आठवण झाली. दादर, बॅलार्ड पिअर वगैरेंची आठवण करून देणारे इतर अनेक भाग आम्हांला दिसले. पण मुंबईची ऐट व गजबजाट कांहीं मद्रासमध्यें नाहीं. नव्हे, मीं आतांपर्यंत पाहिलेल्या कुठच्याच शहरांत नाहीं. मद्रासमध्यें पार्शी दिसत नाहींत, पण अँग्लो-इंडियन अधिक आहेत. आणि मुंबईत नसलेले रिक्शा मद्रासेंत आहेत. पाय भाजू नयेत म्हणून पायाला गोणपाटाचीं फडकीं बांधून रिक्शा ओढणारीं तीं खंगलेलीं माणसें पाहिलीं कीं पोटांत कसेंसेंच होत होतें. तेथें भिकारी मुबलक होते आणि रस्त्याच्या कडेला अनेकांचे संसार थाटलेले होते. चुलींवर भांडीं चढलेलीं होतीं.

अड्यार हें शहराच्या बाहेर समुद्रकिनाऱ्याजवळ निवांतपणें वसलेलें आहे. तपोवनाचें गांभीर्य, पावित्र्य व सौंदर्य निर्माण करण्याचा तेथें प्रयत्न केलेला आहे. आणि तो कांहीं अंशीं यशस्वी झालेला आहे. मात्र कृत्रिमता मधून मधून डोकावते आणि विरस करते.

आम्हीं थिऑसॉफिकल सोसायटीच्या आवारांत शिरतांच तेथल्या वृक्षराजीनें व शांततेनें आमचीं मनें प्रसन्न केलीं. जरा पुढें पक्ष्यांना पाणी पिण्याकरितां एक कुंड तयार केलेलें होतें. त्यांत कांहीं वावगें नव्हतें. पण त्यावर "हे पक्ष्यांनो! तुम्ही आम्हांला आल्हाद देतां म्हणून..." अशा थाटांत कांहीं तरी लिहिलेलें होतें तें मात्र माझ्या मनाला खटकलें. कृत्रिम वाटलें. मराठी साहित्यांतील बरीचशी उदात्तता अशीच असते.

बाहेर जुन्या बांधकामांतल्या दगडांच्या कमानी उभारलेल्या होत्या. तोदेखील

वातावरण निर्माण करण्याचा प्रयत्न होता असें चटकन् ध्यानांत येत होतें. आणि तसें खास सौंदर्य नसलेल्या त्या कमानी नजरेला खुपत होत्या. ठिकठिकाणीं पाट्या लावून आवारांत काय करावें आणि काय करूं नये तें सांगितलेलें होतें. त्यांत बायकी कांटेकोरपणा दिसत होता.

पहिल्यानें आम्ही तेथील ग्रंथालयांत गेलों. दुर्दैवानें ग्रंथालय बंद होतें. त्यामुळें इमारतीच्या दर्शनी दालनांतच जरा इकडे तिकडे करून आम्ही बाहेर पडलों. तेथें बेझंटबाईंचा एक अर्धपुतळा आहे. त्या पुतळ्यांतूनहि त्या बाईंचें प्रभावी व्यक्तिमत्त्व व प्रामाणिक कळकळ ह्यांची कल्पना येत होती. तेथें असलेल्या दुसऱ्या एका पुतळ्यानें माझें लक्ष वेधून घेतलें. एक छोटी सातआठ वर्षांची मुलगी एका बालकाला घेऊन उभी आहे असा तो पुतळा आहे. त्या मुलाचें वजन त्या मुलीला सहज पेलण्यासारखें नाहीं ही गोष्ट त्या शिल्पकारानें तिच्या शरीराला आलेला बांक, तिच्या झग्याला पडलेल्या सुरकुत्या आणि खांद्यावरून ओढला गेलेला झगा ह्यांच्यांतून व्यक्त केली आहे. पण वजन उचलल्याचा ताण मात्र तिच्या चेहऱ्यावर मुळींच दिसत नाहीं. तिच्या चेहऱ्यावर जबाबदारीची प्रौढ जाणीव आहे आणि माणसाला माणसाविषयीं वाटणारें साधें प्रेम आहे. इतका गोड आहे तिच्या चेहऱ्यावरचा भाव ! तिनें घेतलेल्या मुलाच्या तोंडावर अर्थातच हे जाणत्या माणसाचे भाव नाहींत. त्यानें निरागस विश्वासानें त्या मुलीच्या गळ्यांत हात टाकला आहे आणि तोच भाव त्याच्या गुटगुटीत चेहऱ्यावर आहे. अशी ही शिल्पकृति मोठी सुंदर आहे.

ह्या शिल्पकृतीचें आणखी एक वैशिष्ट्य माझ्या मनावर ठसलें. आतांपर्यंत मीं ज्या हिंदु देवालयांतील शिल्पाकृती पाहिल्या, त्यांत एक प्रकारचा अमानुषपणा होता. त्यांतल्या माणसांतून कांहीं तरी वजा केल्यासारखें वाटत होतें. इथें मात्र गोड स्निग्धता त्या दोन आकृतींच्या चेहऱ्यावर व्यक्त होत होती.

आम्ही थिऑसॉफिकल सोसायटीच्या कचेरींत गेलों. तेथें सोसायटीच्या चिटणीस असलेल्या बाई भेटल्या. त्यांचा आवाज मला तरी व्यक्तित्वहीन वाटला. आणि आश्रमांत वगैरे वावरणाऱ्या माणसांच्या वागण्यांत जी एक अकारण आपुलकी असते ती त्यांच्या ठिकाणीं होती. मला ती आपुलकी कृत्रिम व अनावश्यक वाटली. त्यांनीं आम्हांला आनंदानें सोसायटीचें आवार पहायची परवानगी दिली. आम्ही खालीं उतरून चालूं लागलों तेवढ्यांत, त्या वृद्ध बाईदेखील खालीं उतरल्या आणि टुणकन् सायकलवर उडी मारून

कुठें त्या निघून गेल्या. युरोपियन बाई वृद्धपणींदेखील अशी चपळाई दाखवूं शकते. आमच्या बायका तरुणपणींदेखील चपळाई दाखवायला 'लाजतात'.

सोसायटीच्या आवारांत सर्वधर्मीयांचीं छोटीं छोटीं देवस्थानें आहेत; कारण सर्व धर्म हे परमेश्वराप्रत पोहोंचायला मदत करतात असें सोसायटीचें एक मूलतत्त्व आहे. त्या रम्य तपोवनांत तीं सर्वच देवालयें आपल्या या गंभीर व सात्त्विक सौंदर्यानें खुलून दिसतात. पण बागेंत जशीं झाडें लावावीं तशीं तीं सगळीं तेथें लावलीं आहेत असें मला वाटलें. बहुतेक देवालयें बंद होतीं. पण एक कॅथॉलिक चॅपेल उघडी होती. तेथला तो क्रॉस, त्या उंच तेवत्या मेणबत्त्या, तो विशिष्ट पोशाख केलेला पाद्री! आमचें देवघर याहून काय निराळें असतें! आणि त्या पाद्र्यानें जेव्हां भाविकपणें देवाला दारू offer केली तेव्हां तो प्रकार मला अगदीं नैवेद्य दाखविल्यासारखा वाटला.

चोहोंकडे हिरवळ पसरली होती. आणि वृक्षांच्या छायेंतून आम्ही रस्त्यानें रमतगमत चाललों होतों. त्या दुपारच्या वेळींदेखील तेथें थंड वाटत होतें. थोडा वेळ चालल्यावर आम्हांला एक प्रचंड वटवृक्ष लागला. केवढा तरी होता तो. आणि अनेक पारंब्या जमिनींत रोवून त्यानें स्वतःचा भार सांवरला होता. इतका मोटा वटवृक्ष म्हणे हिंदुस्थानांत इतरत्र कोठेंहि नाहीं. त्या वटवृक्षाच्या पसरलेल्या छायेंत उभे राहून आम्हीं सागराचा गंभीर ध्वनि ऐकला. कुठचा मंत्रघोष तो करीत होता कोण जाणे! पुढें होऊन त्या सागराचें दर्शन घ्यावें असें आम्हाला वाटलें. पण पुढें जायला परवानगी नाहीं अशी पाटी तेथें होती.

नंतर आम्ही दुसऱ्या दिशेनें हिंडलों. तेथें साड्या नेसलेल्या युरोपियन बायका दिसल्या. नुकतेंच तेथल्या लोकांचें जेवण झालेलें दिसत होतें. कारण तात्यास्या सगळे जण स्वतः धुवीत होते. तेथल्या जीवनाचा पेहराव एकंदर हिंदी दिसला, पण आत्मा मात्र पाश्चिमात्य आहे असें वाटत होतें.

तेथें नृत्य व संगीत शाळा आहे. धार्मिक शिक्षण देणारी शिक्षणसंस्था आहे. आणि तेथली झापांची बांधलेली असूनदेखील अतिशय सुंदर दिसणारी झोंपडी पाहून आम्हीं विचारलें, "ही कोणाची झोंपडी?"

"हा रुक्मिणीदेवी अरुंडेल ह्यांचा चित्रें काढण्याचा स्टुडिओ आहे." असें आम्हांला उत्तर मिळालें. झापांतून जर त्या बाई असें सौंदर्य निर्माण करूं शकतात तर त्यांचीं चित्रें किती सुंदर असतील असें गणित (कदाचित् चुकीचें) साहजिकच मनांत मांडलें गेलें.

तपोवनांतदेखील कडकडून भूक लागली म्हणजे मन शांत राहूं शकत नाहीं. आणि अशी तीव्र अशांति वाटूं लागल्यामुळें आम्ही तेथून परतलों आणि मद्रास सेंट्रल स्टेशनवर येऊन जेवलों. जेवण जितकें वाईट होतें, तितके त्याला पैसे अधिक द्यावे लागले.

जेवण झाल्यावर आम्हीं स्टेशनजवळच्याच मूर मार्केटच्या पलीकडे जाऊन, बोटॅनिकल गार्डन पाहिली व नंतर झू बघायला गेलों. मध्यें तलाव व भोंवतीं जनावरांचे पिंजरे अशी झूची रचना आहे. आळशीपणानें आम्ही झूमधून हिंडलों. तेथें एका नोकरानें मांजर हाकलावें तसें वाघाला दुसऱ्या पिंजऱ्यात हाकललें आणि मग त्याचा पिंजरा झाडला. वाघाची ती गरिबी पाहून आम्हांला गंमत वाटली.

जिराफदादा उंच मान करून उभे होते. त्यांची मान फार लांब झाल्यामुळेंच त्यांचें इतर शरीर फार आखूड आलें असावें. त्यानीं मान खालीं करावी म्हणून आम्हीं हरतऱ्हेचे आवाज केले. पण जिराफदादा कानहि वांकडा करीनात. तेव्हां आम्हीं एका झाडाची फांदी खुडून त्यांच्यासमोर धरली. इतक्या उंचावरूनदेखील त्यांना ती दिसली आणि अनपेक्षित चपळाईनें आपली मान खालीं करून त्यांनीं ती प्रधानच्या हातांतून घेतली. क्षणार्धांत ती फांदी फार उंचावर गेली. प्रधानच्या हॅटचेंदेखील तसेंच कांहीं व्हावें अशी एक इच्छा माझ्या मनांत आल्यावांचून राहिली नाहीं. माउसडिअर नांवाचा, उंदीर व हरण ह्याचे अंगविशेष असलेला, एक प्राणी आम्हीं तेथें पाहिला. आम्हांला तरी त्याचें उंदराशींच अधिक साम्य असल्यासारखें वाटलें. ससे व माकडें ह्यांची आपापल्या पिंजऱ्यांतून मोठ्या प्रमाणावर वंशवृद्धि चाललेली होती. आणि हत्ती आपल्या अवजड वाटणाऱ्या सोंडेचा फार नाजुक व कौशल्यपूर्ण उपयोग करून झाडांवरच्या पालवीच्या टिक्षा खुडत होता.

झू पाहून झाल्यावर आम्ही म्यूझियम पहायला गेलों. येथील लाल रंगाची म्यूझियमची इमारत मोठी भव्य आहे आणि तिच्याभोंवतीं विस्तीर्ण पटांगण आहे. हें म्यूझियम फारच मोठें आहे आणि आकर्षक व विविध गोष्टींचा तेथें मोठा संग्रह आहे. तें म्यूझियम सगळें काळजीपूर्वक पहायचें म्हणजे दोन तीन दिवस तेथें घालवणें अवश्य होतें. पण आम्हांला फक्त दोनतीन तासांतच तें बघून घ्यावें लागलें. दाक्षिणात्य शिल्पांचा व कलाकृतींचा तेथें मोठाच संग्रह आहे. शिवाय तेथें दक्षिणेंतल्या आम्हीं पाहिलेल्या देवालयांच्या छोट्या प्रतिकृति

ठेवलेल्या होत्या त्या मला विशेष आवडल्या. त्या पाहून त्या विशाल देवालयांचें समग्र दर्शन एकदम झालें व त्यांच्या रचनेंतलें सौंदर्य प्रतीत झालें. इतिहासपूर्व कालांतील भांडीं वगैरे देखील पहाण्यासारखीं आहेत. आणि त्या ओबडधोबड भांड्यांत सौंदर्य आणण्याचे त्या लोकांचे प्रयत्न पाहून, मला एकदम ते लोक फार जवळचे वाटूं लागले. अर्थात् नुसतें वाटूं लागलें हेंच ठीक होतें. खरोखरच जर एखादा आजच्या जगांतला माणूस त्या लोकांना भेटला असता तर त्यांनीं कदाचित् त्याला खरपूस भाजून खाल्ला असता. आणि स्वतःला भाजण्याकरितां विस्तव तयार होत असतां, त्या लोकांनीं केलेल्या नृत्यांतला कलात्मक आनंद चाखण्याचा प्रसंग त्याच्यावर आला असता!

तेथें एक फार जुन्या झाडाच्या खोडाचा तुकडा ठेवलेला होता. झाड जसें जसें मोठें होतें तसा तसा त्याच्या खोडाचा वाटोळा विस्तार वाढत जातो. आणि ती वाढ होत असतांना त्यावर उमटलेल्या रेषांवरून त्याचें वय ठरवतां येतें. त्या रेषा म्हणजे त्या झाडाच्या वाढीच्या इतिहासाची नोंदच असते. त्या खोडावरच्या रेषांवर त्या म्यूझियममध्यें मानवी इतिहासाची नोंद केलेली होती. अनेक राज्यें निर्माण झालीं व विलयाला गेलीं, अनेक लढाया झाल्या तरी पण हा पुरातन वृक्ष भूमींत मुळें रोवून निश्चलपणें उभा होता. त्याचा विस्तार वाढत होता. कालाच्या विस्तारावर रुंद ढेंग टाकून तो आपलें प्रशस्त जीवन जगला होता, आणि त्याच्या रोवलेल्या पावलाभोंवतीं किती तरी महापुरुष घोटाळले होते.

अशा मनाला चालना देणाऱ्या अनेक गोष्टी तेथें होत्या. पण वेळ थोडा असल्यामुळें मनापेक्षां पायांनाच अधिक चालना दिली गेली.

धापा टाकीत आम्ही म्यूझियममधून बाहेर पडलों आणि बाकावर बसून हवा खाल्ली. कारण दुसरें कांहीं खाण्याची सोय तेथें दिसत नव्हती. तेथें पुरेशी हवा खाल्ल्यावर आम्हीं एक ऑटो-रिक्शा केला व समुद्रकिनाऱ्यावर गेलों.

किनारा दोन्ही दिशांना दूरवर सरळ पसरलेला आहे. चौपाटीवर समुद्र जसा आंत घुसलेला आहे, तसा प्रकार येथें नाहीं. हा खाडीचा किनारा नाहीं. उघड्या समुद्राचा किनारा आहे. येथल्या समुद्राचा आवाज अधिक गंभीर आणि कान भरून टाकणारा वाटतो. निळ्या रुंद लाटांचीं मस्तकें अधिक उन्नत वाटतात आणि वाऱ्याचा झोत अधिक जोरदार असतो. रेक्लमेशनसारखें येथें कृत्रिम बांधकाम नाहीं. येथें वाळूचा रुंद नितळ पट्टा

समुद्राला भिडून दूरवर उलगडत गेला आहे. तो इतका मोठा व रुंद आहे कीं तेथें कितीहि माणसें आलीं तरी गर्दी होण्याची शक्यता नाहीं. उलट मुंबईच्या रेक्लमेशनवर मात्र इतर माणसांपासून कधींच दूर जातां येत नाहीं. आणि त्यामुळें समुद्राच्या सन्निधहि जातां येत नाहीं. बाकी मुंबईच्या माणसांना तें कुठें हवें असतें म्हणा ! तीं रेक्लमेशनवर समुद्राकडे पाठ करूनच बसतात. त्यांना गर्दीचीच हौस ! रेक्लमेशनवर आहे तसा येथेंहि समुद्रकिनाऱ्याच्या कडेनें बांधलेला सुंदर डांबरी रस्ता आहे. त्यावरून मोटारीनें भरधाव जाण्यात न्यारीच गंमत वाटते.

कुठच्याहि सौंदर्याचा भरल्या पोटींच अधिक आस्वाद घेतां येतो हें जाणण्याइतकें मद्रास सरकार चाणाक्ष आहे. त्यामुळें त्या सरकारनें किनाऱ्यावर 'काफे मरिना' नांवाचें छान हॉटेल चालवलेलें आहे. मुंबईच्या हॉटेलांच्या तोडीचें असें तेवढेंच हॉटेल मीं मद्रासला पाहिलें. आम्हीं हॉटेलच्या गच्चीवर जाऊन बसलों आणि चहा व खाद्य पदार्थ मागवले. चीज-सँडविचला चावा घेत आणि चहाचीं चुंबनें घेत, तेथल्या सूर्यास्ताचें सौंदर्य आम्ही न्याहाळत होतों. किनाऱ्यावर वाळूंत मुलें हुंदाडत होतीं. झोपाळयावर झोके घेत होतीं. घसरगुंडीवरून घसरत जात होतीं. हॉटेलजवळच्या पोहोण्याच्या तलावांतलें पाणी लवथवत होतें. लाटा सारख्या घोंगावत होत्या. आणि सूर्य रेंगाळत, गरगरत क्षितिजाखालीं उतरत होता.

पण तेवढ्यांत माझ्या डोक्यावर एकदम पंखांचा फडफडाट झाला आणि माझ्या डोक्यावर कोणीं तरी टपली मारली. मी वर पहातों तों एक घार चपळाईनें वर चढली आणि घिरट्या घालूं लागली. आणि थोड्याच वेळांत लक्षांत आलें कीं, तिच्या आणखी तीनचार मैत्रिणी तेथें घोटाळत होत्या. आकाशांत जाऊन त्या स्वर्गीय दृश्याचें विहंगावलोकन करायचें सोडून, मुंबईकर पाहुण्यांच्या डोक्यावर टपल्या मारण्यांत ह्या मद्रासी घारींचा काय हेतु होता तें मला कळेना. मुंबईच्या घारी कधीं असें माझ्याशीं वागलेल्या नाहींत. त्या घरांवर बसतात; माणसांच्या डोक्यावर बसण्याचा यत्न करीत नाहींत.

त्या घारींच्या हालचाली संशयास्पद वाटल्याकारणानें आम्हीं वेटरला बोलावून खुलासा विचारला. त्यानें सांगितलें कीं, गच्चीवर बसून खाणाऱ्या लोकांच्या बशांतलीं सँडविचेस् पळवायचीं हा येथल्या घारींचा आवडता खेळ आहे. असें कळल्यानंतर आम्हीं स्वतःपुढच्या बशांवर झडप घातली आणि त्या

हातांनीं झाकून ठेवून बकाबंका खाऊं लागलों. आमची ती करुण अवस्था पाहून वेटरला दया आली. आणि त्यानें एका काठीला फडकें बांधून ती आमच्याजवळ उभी करून ठेवली. घारी पळाल्या, पण लोकांची काकदृष्टि आमच्याकडे वळली. आंबुस चेहेऱ्याचे तेथील मद्रासी लोक हसूं लागले. आणि तेथें आलेली एक मद्रासी सिनेमा नटी चक्क मोठ्यानें हसली.

मुंबईत असें झालें असतें तर मला शरमल्यासारखें झालें असतें. पण तेथें मला त्याहि प्रकाराची गंमत वाटली. मी तिच्याहूनहि मोठ्यानें हसलों आणि प्रधानची समजूत घातली, "अरे! नाहीं तर सिनेमा नटी तुझ्याकडे पाहून केव्हां हसणार होती ?"

सूर्य रेंगाळत मावळला आणि आम्ही रेंगाळत खालीं उतरून समुद्राच्या अगदीं जवळ जाऊन एका ओंडक्यावर बसलों. काळोखांत सागराचा ध्वनि अधिकच घुमत होता. हें पार्श्वसंगीत ऐकत आम्ही आकाशाच्या अफाट रंगभूमीवर चाललेलीं अनेक नाटकें पहात होतों. ते प्रचंड, स्फोटक द्रव्यानें भरलेले असंख्य गोलक आणि त्यांना अगतिकपणें नेमल्या मार्गानें जायला भाग पाडणारी नियति ! तो विद्ध मृग, ती आकाशगंगा, तो तेजस्वी शुक्र, तो क्रुद्ध मंगळ, ती सप्तर्षींची बैठक ! काय होता त्या सगळ्या गोष्टींचा अर्थ ?

हा निरर्थक विचार डोक्यांत घोळवीत मी हॉटेलवर परतलों. प्रधान बरोबर होता, तरी एकटें एकटें वाटत होतें. अंथरुणांत पडलों तेव्हां मला एकदम दुःखाचा उमाळा आला. कसलें दुःख होतें तें !

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्ही मद्रास बंदर पहायला गेलों. मद्रास हें कांहीं नैसर्गिक बंदर नाहीं. एखाद्या खाडीचा आडोसा तेथें नाहीं. जमिनीचें टोंक पाण्यांत घुसून तेथें सुरक्षितपणा निर्माण झालेला नाहीं. म्हणून समुद्रांत एक कृत्रिम धक्का बांधून तेथें आडोसा निर्माण करण्यांत आलेला आहे. त्यामुळें बोटी येथें उभ्या राहूं शकतात. पण मुंबईच्या विस्तीर्ण बंदरांत नांगरून पडलेल्या बोटी पाहण्यांत जी मौज वाटते तशी येथें वाटत नाहीं. तेथें समुद्र-किनाऱ्यावर आम्ही थोडा वेळ उभे राहिलों. एक जुन्या बोटीचा तुटका सांगाडा तेथें वाळूंत रुतून बसलेला होता. पाण्यांत गंजत आणि झिजत होता. आणि नुसते दोन ओंडके एकत्र बांधून केलेल्या होडक्यांत बसून कोळी वेगानें समुद्रांत जात होते आणि परतत होते. समुद्रांतल्या रुपेरी पिकानें टोपल्या भरत होत्या.

मोठाल्या कंपन्यांच्या भव्य इमारती त्या बाजूला उभ्या होत्या. त्यांच्या चिरेबंदी

वैभवाचा तो दृश्य दाखला होता. आणि त्या दाखल्याशीं लगट करूनच थाटलेले गरिबाचे अनेक संसार तेथल्या दारिद्र्याची मूक जाहिरात करीत होते. तेथेंच चिरगुटांवर पोरें लोळत होतीं. तुटपुंजा संसार डबऱ्यांत सांठवलेला होता. आणि तात्पुरत्या चुलींवर धुग्कटलेलीं भाडीं चढलीं होतीं. पाऊस नव्हता म्हणून स्वयंपाक चटकन् उरकून घेतला जात होता!

आपल्या दारिद्र्याची त्या माणसाना विशेषशी जाणीव नव्हती. पलीकडच्या इमारतींतील वैभव आणि आपलें दारिद्र्य ह्यांतील विषमता त्यांना समजत नव्हती. हें वैभव आम्हाला कां मिळूं नये असा प्रश्न त्याचीं हृदयें ओरबाडत नव्हता, त्यांच्या भावना चेतवीत नव्हता; आणि म्हणूनच सगळें नीट चाललें होतें. पण जर का हा प्रश्न त्या गरिबानीं स्वतःला विचारला असता, त्यामुळें जर त्यांच्या भावना चेतवल्या गेल्या असत्या, तर ते दरिद्री, निष्कांचन लोक धडाधड जिने चढून त्या इमारतींत घुसले असते. तिथल्या सोफासेटवर लोळले असते. तिथल्या तिजोऱ्या फोडून त्यानीं पैसे सर्वत्र उधळले असते. असें केल्यामुळें त्याच्या दारिद्र्याचा प्रश्न सुटला असता कीं नाहीं कोण जाणे! पण समाजाला एक इष्ट असा धक्का बसला असता. त्याचें आरोग्य सुधारलें असतें आणि मला फार गंमत वाटली असती.

बंदर पाहून झाल्यावर आम्ही मद्रासच्या लोकल गाडींतून जरा भटकून आलों. मुंबईला जशी ह्या गाड्यांची वर्दळ असते तशी मद्रासला नाहीं. गाड्या त्या मानानें थोड्या आणि शिवाय अगदीं लहान! खूप वेगानें, हेलकावे खात त्या पळत असतात. आणि फूटबोर्डावर उभे राहून लोकांना प्रवास करायला लागावा इतकी ह्या गाड्यांतून गर्दीहि दिसली नाहीं. आम्हांला कडकडून भूक लागेपर्यंत वेळ काढायला तो प्रवास हें चांगलें साधन ठरलें.

मग मुंबईच्या हॉर्नबी रोडप्रमाणें दिसणाऱ्या तेथील माउंट रोडवर आम्ही इराणी हॉटेलची नक्कल करणाऱ्या एका हॉटेलांत जेवलों. मग नेहमींप्रमाणें कुठें पान मिळतें का याची चौकशी केली. आणि मुंबई पद्धतीचें पान नेहमींप्रमाणें मिळालें नाहींच. पण निदान मद्रासी पद्धतीचें पान तरी मिळालें. पान कसलें तें! खिरापत खाल्ल्यासारखें वाटलें.

नंतर आम्हीं प्रवासांत जी गोष्ट कटाक्षानें टाळली होती ती केली. आम्हीं एक सिनेमा पाहिला. प्रवास संपुष्टांत आला होता ह्याची सिनेमा पाहून आम्हीं स्वतःला जाणीव करून दिली. माउंट रोडवरचें तें थिएटर भिकारच होतें.

चार आणे नऊ पै अशा प्रकारचे तिकिटांचे दर होते. ते आम्हांला मद्रासी लोकांच्या मनोवृत्तीवर प्रकाश पाडणारे वाटले. मद्रासचे फॅशनेबल लोक आम्हांला थिएटरांत दिसले. फॅशनेबल मुंबईकरांचीच आवृत्ति! पण मुंबई-करांचें पॉलिश नव्हतें.

सिनेमानंतर आम्हीं आणखी एक, आधीं न केलेली गोष्ट केली. आम्ही हौसेनें कॉफी प्यायलों. इंडिया कॉफी हाऊसमधली ती कडवट, चॉकलेटची चव असलेली थंड कॉफी पिऊन कॉफीविषयींचा आमचा राग बराच कमी झाला. "कधीं कधीं कॉफीहि बरी लागते." मीं मवाळपणानें म्हटलें.

"पण चहा तो चहाच!" प्रधान निर्णयात्मक स्वरात म्हणाला.

हॉटेलवर परतताना घाऱ्या डोळ्यांची आणि तरतरीत नाकाची एक पोरगी दिसली. हें चित्पावनी पाणी इकडे कसें आलें असा प्रश्न साहजिकच पडला.

रात्रीं सगळी आवराआवर केली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्ही निघणार होतों. जें एक धावपळीचें, बेछूट जीवन आम्ही जगलों होतों तें आता संपुष्टात येणार होतें. ज्या चाकोरीला, जीवनाच्या ज्या घडणीला कंटाळून आम्ही बाहेर पडलों होतों, तिच्यात पुन्हा आम्ही जाऊन पडणार होतों. नव्हे, तसे पडायला आम्ही चांगलेच उत्सुक झालों होतों! नावीन्य आतां आम्हाला शिळें वाटूं लागलें होतें. एका निराळ्याच चाकोरींत आम्ही अडकलों आहोंत हें जाणवत होतें. परक्या लोकात वावरायचा कंटाळा आला होता. आमची भाषा बोलणारीं माणसें, स्नेहसंबंधानें आमच्याशीं जोडलेलीं माणसें आम्हाला भेटायला हवीं होतीं. आतां घराची ओढ लागली होती.

दुसऱ्या दिवशीं गर्दीत चेंगरून आणि उन्हांत भाजून आम्हीं प्रवास केला. कदन्न खाल्लें आणि अनिर्बंधपणें वागण्याची शेवटची गंमत लुटून घेतली. अंगांत मळका गंजिफ्रॉक व खाली मळकी विजार अशा थाटात गळ्याला रुमाल बांधून स्टेशनवर हिंडलों. ताडगोळे खाऊन पाटलोणीला हात पुसले. गुंटकल स्टेशनवर गाडींतले दिवे गेले तेव्हा सगळ्या लोकाना चिथावून 'We want lights' असा मोठ्यानें गजर करून गार्डला घाबरवून सोडलें.

पण दुसऱ्या दिवशीं दुपारीं पुणें आलें तसे आम्हीं केस विंचरले, कपडे बदलले. अगदीं जंटलमन् होऊन गेलों.

गाडीला किती वेळ लागत होता! मी थकलों होतों. आणि मला घरीं जायचें होतें—घरीं!